भारत-इतिहास-संशोधक-मंडळ-स्वीय-ग्रंथमाला, ग्रंथांक ६१

# गोवळकोंड्याची कुत्बशाही






वा. सी. बेंद्रे

# श्री. वा. सी. बेंद्रेकृत इतर ग्रंथ

१. **साधनाचिकित्सा**—इतिहासशास्त्र व महाराष्ट्रीय ऐतिहासिक साधनांची लेखन-पद्धति व गुणदोष यांवर सांगोपांग चर्चा करणारा पहिलाच ग्रंथ. ... ... किं. ३॥ रुपये.

**केसरी**—......इतिहास लेखनाच्या कलेला इष्ट व अपेक्षित असें वळण लावण्याचा मराठी भाषेत अपूर्व प्रयत्न......संशोधकांना हा एक अमूल्य ठेवा...

*Princ: H. G. Rawlinson*, M.A., C.I.E., I.E.S.—.........should be studied by every aspirant who wishes to take the M.A. in history......an admirable work......

*F. B. P. Lory*, Esqr. M.A., I.E.S., D.P.I., Poona—......most creditable......

*Journal of the Bombay Historical Society.*—...dealt with his subject with such absolute dispassionateness as will do credit to a Langlois or Siegnobos.. all these pitfalls are wonderfully anticipated & solved with surprising ease......

२. **राजारामचरितम्**—अथवा श्रीछत्रपति राजाराम महाराज यांचा जिंजीचा प्रवास. ( मूळ संस्कृत. मराठी व इंग्रजी प्रस्तावनेसह ) ... ... ...किं. १॥ रुपाया.

**ज्ञानप्रकाश**—...चिकाटी...अभिनंदनीय आहे...पुस्तक खरोखरच ऐतिहासिक सामुग्रींत चांगल्या प्रकारची भर घालणारें आहे...परिश्रमशीलतेची प्रशंसा करणें जरूर आहे...

*Sir Jadu Nath Sarkar*, Kt., C.I.E., I.E.S.—......corrects some minute points where previous writers were in the dark..........It is a service to History.........

*Indian Historical Quarterly, Calcutta*—......important discovery and valuable find............the introduction is really useful and interesting...............

*Revd. Father H. Heras, S. J.*—......extremely useful not only for the historians of Maharashtra but for all students of South Indian History...edited with great care and scholarship.........

3. **TARIKH-I-ILAHI**—नवा काळ–...संशोधनकार्यात मोठीच गोष्ट घडून आली...

**महाराष्ट्र**—......इलाहि सनांतील सारीं कोडीं सोडवून दाखविलीं आहेत..........

*Times of India*—...should prove of great use to students of History...for it finally sets at rest a knotty...problem so long...baffling all attempts at solution...

*Hindu*—...The booklet forms an important contribution...........we heartily endorse the opinion of Shams-ul-Ulema Dr. Sir Jiwanjee J. Modi 'that the paper will be of great use to students of the History of Akbar and Jehangir'...........

*Modern Review*—...has done a service to history by publishing his learned paper......Mr. Bendrey's study is a distinct advance on previous efforts...

**4. STENOGRAPHY FOR INDIA** ... ... ... ... ... As. 8

**५. मराठी शॉर्टहँड** व **६. गुजराती शॉर्टहँड** ... प्रत्येकीं किं. २॥ रु.

**7. PORTRAIT OF SHIVAJEE THE GREAT**—...contemporary drawing of 1664 A.D ( Von Valentyn's Collection.) ... ... ... ... Anna 1

सर्वच पुस्तकांवर प्रसिद्ध वर्तमानपत्रें वगैरेचें उत्तम अभिप्राय. मुंबई, मध्यप्रांत व वऱ्हाड, बडोदें, कोल्हापूर इ. सरकारांनीं बक्षिसें वगैरेकरितां मंजुर केलीं आहेत. डेक्कन व गुजराथ व्हर्न्याक्युलर व इतर वाङ्मयोत्तेजक संस्थांनीं बक्षिसें देऊन गौरव केला आहे.

भारत-इतिहास-संशोधक-मंडळ-स्वीय-ग्रंथमाला, ग्रंथांक ३९.

सतराव्या शतकांतील

# गोवळकोंड्याची कुत्बशाही

किंवा

The History of a Late Revolution in the Kingdom of Golcondah
Chapters VI and VII from 'Hadiqat-u'l-Alam' by Mir Alam, and
Some Account of Akana and Madana-Chief Ministers of Golcondah, with
an Historical Sketch of the Qutbshahi of Golcondah by the editor.






संपादक

वासुदेव सी. बेंद्रे,

मुख्य संपादक, श्री छत्रपती संभाजी चरित्र-कार्यालय,
गायकवाडवाडा, पुणें शहर

साहाय्यक

प्रो. भगवत दयाळ वर्मा, एम्. ए.
प्रोफेसर ऑफ पर्शिअन, फर्ग्युसन कॉलेज, पुणें

# निवेदन

प्रस्तुत ग्रंथ कुतुब्शाहीबाबतचा आहे. याचे दोन भाग आहेत. मराठी भागांत संपादक रा. बेंद्रे यांनीं कुतुब्शाहीची एक विश्वसनीय सनावळी बनविण्याचा प्रयत्न केला आहे. दुसऱ्या म्हणजे इंग्रजी भागांत मॅकेंझी कलेक्शनमधून तीन इंग्रजी प्रकरणें छापलीं आहेत. तीं साधन स्वरूपाचीं आहेत.

ग्रंथाचे संपादक रा. वासुदेवराव बेंद्रे हे आपल्या मंडळांतील एक निस्सीम व्यासंगी गृहस्थ आहेत. त्यांनीं मोठ्या परिश्रमानें थेट विलायतेंतून अनेक हस्त-लिखितें आणविलेलीं आहेत. अशीं साधनें हातीं येतांच नेमलेल्या मुदतींतच त्यांचा परामर्श उरकून घ्यावा लागतो; कारण साधनें मग परत पाठवावीं लागतात.

मराठेशाहीचा इतिहास नीट समजण्यास भोंवतालच्या मुसुलमान व इतर सत्तांचे इतिहास आणि त्यांतील घडामोडी याहि बारकाईनें समजावून घेतल्या पाहिजेत. मराठ्यांचा संबंध दक्षिणेंत दूरवर पोहोंचला असल्यानें कुतुब्शाहीचा इतिहास अभ्यासकांस उपेक्षितां येणार नाहीं. परंतु या कुतुब्शाहीबद्दल फारच थोडी सामग्री उपलब्ध आहे. रा. बेंद्रे यांचे शोधांत जेव्हां मॅकेंझी कलेक्शनमधील प्रस्तुत छापलेले ग्रंथ उपलब्ध झाले, तेव्हां त्यांनीं त्या निमित्तानें कुतुब्शाही इतिहासाचा अभ्यास त्यांच्या नेहमींच्या सूक्ष्म चिकित्सक पद्धतीनें व सशास्त्र केला. पुढें मॅकेंझी कलेक्शन मधील हीं प्रकरणें छापण्याजोगीं आहेत असें वाटल्यावरून रा. बेंद्रे यांनीं पुढील तयारी चालविली. परंतु काम मूळच्या संकल्पापेक्षां व अंदाजापेक्षां भलतीकडेच वाढलें. तथापि मागें पाय न घेतां आज ग्रंथ संपूर्णतेला नेण्याचाच प्रयत्न झाला. मंडळांत बरीच सामग्री छापण्यासाठीं जरी पडून आहे तरी कुतुब्शाही इतिहासाच्या विषयाचें नावीन्य लक्ष्यांत घेऊन या ग्रंथास आधीं सवड करून दिली. अभ्यास वाढत चालला तसें रा. बेंद्रे यांचें लेखनहि फुगत गेलें आणि स्पष्टतेसाठीं क्वचित् पुनरुक्ति झालेली पुरवली परंतु अनुक्ति किंवा अल्पोक्ति यांपासून होणारे घोटाळे टाळावे असा त्यांचा कटाक्ष असल्यामुळें एकंदर पृष्ठसंख्या ३५०च्यावर गेली. सशास्त्रतेसाठीं अनिवार्य असलेल्या तळटीपा अनिवार झाल्या म्हटलें तरी चालेल. परंतु रा. बेंद्रे यांचे चिकाटीचे परिश्रम कसे आहेत याची साक्ष मात्र येथें उत्तम पटते.

# सतराव्या शतकांतील
# गोवळकोंड्याची कुत्बशाही

१. उपोद्घात, २. कुत्बशाहीचे संबंध, ३. कुत्बशाही इतिहासाचीं नवीं साधनें, ४. गोवळकोंडा राज्यांतील एका क्रांतीचा इतिहास, ५. जॉन ओव्हिंग्टनची हकीकत, ६. क्रांतीच्या इतिहासाचें महत्त्व, ७. 'हदिकत-अल-अलम्', ८. हदिकत-मधील भाषांतरित विभाग, ९. 'मादण्णा व आकण्णा यांची एक जुनी हकीकत', १०. कुत्बशाही इतिहास-लेखनाचे पूर्व प्रयत्न, ११. कुत्बशाहीची पूर्व हकीकत, १२. सुलतान कुली कुत्बशाहा, १३. जमशीद कुत्बशाहा, १४. सुभान कुली कुत्बशाहा, १५. इब्राहीम कुत्बशाहा, १६. महमद कुली कुत्बशाहा, १७. महमद कुत्बशाहा, १८. हयात बख्श बेगम, १९. अबदुल्ला कुत्बशाहा, २०. मीर जुम्ला, २१. अबुल हसनचें पूर्ववृत्त, २२. अबुल हसन ऊर्फ तानाशाहा कुत्बशाहा, २३. मादण्णा व आकण्णा, २४. सामाजिक रीतिभाती, २५. कुत्बशाही लढाया व युद्धपद्धती, २६. मुरार जगदेव, २७. कुत्बशाहीचे इतर पातशाहींशीं संबंध, २८. कुत्बशाहीचे शिवशाहीशीं संबंध व शिवशाहीवरील परिणाम, २९. कुत्बशाहीचा नाश, ३०. उपसंहार.

**१. उपोद्घात :—** कोणत्याहि प्रसंगाच्या कालाचा विस्मर त्वरित होतो. हा विस्मर होण्यास लागणारा कालावधि प्रसंगांच्या महत्त्वाच्या प्रमाणावर कमी अधिक असतो इतकेंच. स्थलनामांचें अगर व्यक्तिनामांचें विस्मरणहि कालावधीनें होतें. कालाचा विस्मर एका पिढींत झालेला दिसतो तर स्थलनामांचे व व्यक्तिनामांचे तपशील दोनतीन पिढ्यांत विसरले जातात. त्यामुळें ऐतिहासिक प्रसंगांचे तपशील विपर्यस्त होऊं लागतात व शेवटीं ते वस्तुस्थितीला धरून नसलेले आढळून येतात. उदाहरणार्थ, अबुल हसनचा राज्यावर येण्याचा प्रसंग. स्थलकालांचा वास्तविक बोध न झाल्यामुळें त्यांत अगदीं असंभाव्य असा मजकूर इतिहास म्हणून रूढ झाला आहे. स्थलकालांचा बोध जितक्या प्रमाणांत बिनचूक होऊं शकेल तितक्या प्रमाणांत प्रसंगांच्या कार्यकारणभावांची उपपत्ति निर्दोष राहील. तें प्रसंगचित्र सुबोध व वस्तुस्थितीस धरून झाल्यास इतिहासरचनेंत पूर्णत्व व प्रमाणत्व साधेल. जसे

स्थलकालनिर्देशाच्या अभावीं निरनिराळ्या वेळीं व स्थळीं घडलेले अनेक प्रसंग एकाच प्रसंगचित्रांत रेखाटले जातात तशीच कांहीं प्रसंगांची द्विरुक्ति झालेली आढळते. अर्थात् अशा प्रकारचे दोष काढून टाकण्याचाच इतिहासरचनेंत व संशोधनांत मुख्य प्रयत्न करावा लागतो. एकांगी मजकुरांतील स्थलकालांचें दुर्बोधत्वाचें प्रमाण अधिक असतें. हें प्रमाण विरोधी पक्षाकडील अगर संबंधीय माणसें किंवा राज्यें यांचेकडील हकीकतीनें बरेंचसें कमी करितां येतें. उदाहरणार्थ, अबुल हसनची शेवटची हकीकत मोगल सरदार जितकी बिनचूक देतील तितकी ती गोवळकोंड्याच्या लोकांना देतां येणार नाहीं. सारांश, स्वदेशाचा अगर स्वराष्ट्राचा इतिहास लिहितांना शेजारील सर्व राज्यांचा इतिहास फार बारकाईनें तपासणें जरूर पडतें. शिवकालीन मराठ्यांच्या इतिहासास विजापूरची आदिलशाही, गोवळकोंड्याची कुत्बशाही व हिंदुस्थानची मोगलपातशाही यांच्या व कर्नाटकांतील हिंदु राजांच्या इतिहासांचें आणि विशेषतः ऐतिहासिक साधनांचें परिशीलन होणें आवश्यक आहे. तत्कालीन परिस्थिति, अंतर्गत राज्यव्यवस्था, सामाजिक व व्यावहारिक उत्क्रांत्या, राजाराजांचे परस्पर संबंध, राज्यव्यवस्थेचे व आर्थिक बाबींचे परस्परांवर झालेले परिणाम इत्यादि सर्व गोष्टींचा चांगला अभ्यास झाला पाहिजे. वास्तविक दख्खनी शाह्यांच्या सामर्थ्याचा जितका स्पष्ट बोध होईल तितका मराठ्यांच्या चिकाटीचा, सामर्थ्याचा व राज्यकारभारांतील कार्यतत्परतेचा चांगला व बिनचूक कयास बांधतां येईल. अंधश्रद्धा व वृथाभिमान धरून एकांगी वृत्ति ठेवल्यानें स्वदेशाचा इतिहास नुसताच सदोष राहतो असें नाहीं तर त्यांत गौणत्वहि आणलें जातें. उदाहरणार्थ, छत्रपतींची साक्षरता सिद्ध करण्यासाठीं एखाद्या पांड दौंडपांड्याच्या क्षुल्लक निवाड्याची खर्डेघाशी लादण्यांत जसा छत्रपतींच्या कार्यक्षमतेवर अप्रत्यक्षपणें आघात केला जातो, तशीच त्यांच्या राज्यकारभाराची मर्यादा कल्पनातीत संकुचित केली गेल्यानें किंवा सबंध हिंदुस्थान जिंकणारा व सांभाळणारा 'अवरंग' शिवाजीपुढें कःपदार्थ मानल्यानें शिवाजीची योग्यता चिकित्सक माणसास कमी झालेली दिसते. उलट, शत्रुपक्षीय सामर्थ्याचा निखालसपणें बोध करून दिल्यास स्वसामर्थ्यांतील तरतम प्रकार उज्ज्वलपणें लक्षांत येऊं शकतो व अपयश हें शक्ति व बुद्धि मोजण्याचें माप ठरत नाहीं. यामुळें इतिहाससंशोधनाचें व रचनेचें क्षेत्र जसें विस्तृत ठेवावें लागतें, तसेंच तें पूर्वग्रहप्रेरित व भेदाभेदपूर्ण असतां कामा नये. अशा अभ्यासांत संशोधक सोयीप्रमाणें आपल्या अभ्यासांतील दृष्टि व क्षेत्र हीं

विषयकालानुसार संकुचित ठेवतो. त्यामुळें इतर अभ्यासकांस कांहीं गैरसोय होण्याचा संभव असतो; परंतु त्याच्या अभ्यासांतील क्षेत्रमर्यादेमुळें त्याच्या कार्यांत पूर्णत्व व प्रमाणत्व साधलें जातें व एकंदरींत इतिहासलेखनांत प्रगतीच झालेली असते, हें गैरसोयीमुळें क्षुब्ध झालेल्या अभ्यासकांसहि थोड्याशा विचारांतीं व स्वकार्याच्याहि पुनर्निरीक्षणानें सहज समजून येण्यासारखें आहे. प्रस्तुत निबंधांत शिवशाही काला-पुरताच कुत्बशाहीचा इतिहास जरा बारकाईनें परीक्षला जाणार आहे. अर्थात् हातीं आलेल्या साधनांचें मुद्रण तितक्या कालापुरतेंच झाल्याबद्दल क्षमा होणें जरूर आहे.

२. **कुत्बशाहीचे संबंध**:—कुत्बशाहीची स्थापना प्रथम तेलंगणांत झाली. त्यामुळें कुत्बशाहीचा संबंध तेथील लोकांशींच विशेष जडला. बहामनी राज्यांतील आणि विशेषतः निजाम उल्मुल्क हा प्रथम तेलंगण प्रांताचा सुभेदार असल्यानें, सुल्तान कुलीकडे थोडे मराठे लोक होते. बहामनी राज्य मोडण्यास स्वदेशीय मुसलमान व परदेशीय मुसलमान यांच्यांतील भांडण कारण झालें. परंतु कर्नाटकांतील विजयानगरचें राज्य बलवान् असल्यानें आणि हीं सर्व जवळजवळ तुल्यबल राहि-ल्यानें प्रथम कांहीं वर्षेपर्यंत हे इस्लामी शाहा आपापसांत धर्माच्या नांवाखालीं प्रत्यक्ष भांडण्याचें टाळीत असत. राज्यतृष्णा लवकरच वाढूं लागली व हा निर्धार दिवसेंदिवस मत्सरवाढीमुळें सुटत चालला. ते आपापसांत भांडूं लागले. मात्र प्रत्येकजण दुसऱ्याची सत्ता प्रबल होऊं न देण्याची शक्य ती खटपट करी व अशा भांडणांत केलेले तह व मैत्रीच्या अटी मोडण्यांत ते फारशी दिक्कत बाळगत नसत. या लपंडावींत विजयानगरचा चांगलाच उपयोग होत असे. परंतु इब्राहीम कुत्बशाहानें विजयानगरच्या नाशाचा कट करून दक्षिणेंतील हीं राज्यें धुळीस मिळविण्याचा जोराचा प्रयत्न केला. शेवटीं तालीकोटच्या रणसंग्रामांत हिंदु विरुद्ध इस्लामी सत्तेचा निर्णय झाला. अखेरीस हिंदु राज्यें जवळजवळ नाममात्र राहिलीं. त्याचा परिणाम असा झाला कीं, मोठ्या मुसलमानी सत्तांनीं लहान मुसलमानी सत्तांचा सहज नाश केला. राहिलेल्या तीन शाह्या उत्तरोत्तर एकमेकींच्या नाशार्थ प्रयत्न करूं लागल्या. परदेशीय मुसलमानांची संख्या कमीकमी होत चालली. मराठे व हिंदु सरदारांवर विशेष भिस्त राहूं लागली. जयापजयाचा कांटा झुकविण्याचें सामर्थ्य या दक्षिणी सरदारांत राहिल्यानं त्यांनींहि स्वार्थापलीकडे विशेष लक्ष पुरविलें नाहीं. कुत्बशाहीचें क्षेत्र जसजसें उत्तरेकडे व पश्चिमेकडे वाढूं लागलें तसतसा मराठे

सरदारांचा भरणाहि अधिकाधिक होऊं लागला. सतराव्या शतकांत बरेच मोठ्या तोलाचे मराठे सरदार कुत्बशाहींत शिरले. शेवटीं मादण्णाच मुख्य कारभारी झाला. सतराव्या शतकाच्या सुरुवातीस शाह्यांची उलथापालथ करण्याचें सामर्थ्य आलेलें दिसतांच मराठसरदारांनीं या शाह्यांचें जूंहि फेकून दिलें असतें. परंतु विजयानगरच्या राज्यानंतर मोगलपातशाहीचा शह बसूं लागला. मात्र मोगलपातशाहीचा पाय रुजतांच तिनें निजामशाही स्वाहा केली; आणि जर शिवशाहीचा उदय झाला नसता तर राहिलेल्या दोन्हीहि शाह्यांचा निःपात सतराव्या शतकाच्या मध्यावर झाला असता. अशा परिस्थितींत कुत्बशाही व शिवशाही यांचे परस्पर संबंध नेहमीं मित्रत्वाचे राहूं शकले व शिवशाहीची उभारणी करण्यास या कुत्बशाहीची प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष पुष्कळच मदत होऊं शकली. हे संबंध सतराव्या शतकाच्या दुसऱ्या अर्धांतील होत. कुत्बशाहीची या कालांतील प्रवृत्ति सलोख्यानें वागण्याची होती. जेव्हां जेव्हां दक्षिणेंत युद्धप्रसंग उद्भवले तेव्हां तेव्हां ते खंडणी वगैरे देऊन टाळण्याचा प्रयत्न झाला. उघडपणें मदत देतां आली नाहीं तर ती गुप्तपणें दिली गेली. शेजारील राज्यांच्या भांडणांत कुत्बशाहीनें याप्रमाणें तटस्थपणा धारण केल्यामुळें निजामशाहीनंतर दक्षिणी राज्यांतील लढायांचा निकाल बऱ्याच वेळां कुत्बशाहीच्या धोरणावर अवलंबून राहिला व अशा लढ्यांत कुत्बशाहीची प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष मध्यस्थी नेहमीं कोणाहि राजास चढाई करूं देत नसे. हीं राज्यें तुल्यबल राहात. सारांश, या शतकांतील कुत्बशाहीचा इतिहास शिवशाहीच्या इतिहासास अनेक दृष्टींनीं महत्वाचा आहे व याच दृष्टीनें या अभ्यासास लागणारीं ऐतिहासिक साधनें जमविणें, परीक्षणें व प्रकाशित करणें हें शिवशाहीच्या इतिहासरचनेंत व संशोधनांत एक महत्वाचें अंग होऊन राहिलें आहे.

३. **कुत्बशाही इतिहासाचीं नवीं साधनें :—** शिवशाहीच्या आणि विशेषतः संभाजीकालीन ऐतिहासिक साधनांचा शोध करितांना कुत्बशाहीसंबंधीं कांहीं ऐतिहासिक साधनें आढळलीं. त्यांतील पुढील तीन हकीकती अभ्यासकांच्या दृष्टिक्षेपांतून नाहींशा झाल्याचें आढळून आल्यावरून त्या प्रथम सादर करीत आहें. यानंतर आणखी कांहीं साधनें सवडीप्रमाणें प्रकाशित होतील. हीं साधनें उपयुक्त असून महत्त्वाचीं आहेत. परंतु तीं छापतांना त्यांतील शिवशाहीस उपयुक्त असलेला तेवढाच भाग घेतला आहे.

कुत्बशाहीचीं नवीं साधनें :

१. 'The History of a Late Revolution in the Kingdom of Golconda'— 'गोवळकोंडा राज्यांतील नुकत्याच घडलेल्या एका राज्यक्रांतीचा इतिहास' ( पृ. १–२१ ).
२. Chapters VI and VII from "Hadiqat-u'l-Alam"— 'हदिकत–अल–अलममधील सहावा व सातवा भाग' ( पृ. २३-१८५ ).
३. 'Some Account of Akana and Madana, Chief Ministers of Tanashah Badshah of Golconda' – 'गोवळकोंड्याच्या तानाशाहा बादशहाचे मुख्य वजीर आकण्णा व मादण्णा यांची कांहीं हकीकत' ( पृ. १८७–२०३ ).

४. गोवळकोंडा राज्यांतील एका क्रांतीचा इतिहास :— 'गोवळकोंडा राज्यांतील नुकत्याच घडलेल्या एका राज्यक्रांतीचा इतिहास' किंवा "The History of a Late Revolution in the Kingdom of Golconda" ही हकीकत 'जॉन ओव्हिंग्टनच्या इसवी सन १६८९चा सुरतेचा प्रवास' या ग्रंथांत परिशिष्टरूपानें[१] दिलेली आहे. हें प्रवासवृत्त जॅकॉब टोन्सन यानें फ्लीट स्ट्रीटवरील इनर-टेंपलगेटजवळील जजिस हेड येथें इ. स. १६९६ सालीं प्रथम छापून प्रसिद्ध केलें. अठराव्या शतकाच्या सुरुवातीस या ग्रंथाचा फ्रेंच भाषेत एक अनुवाद केला गेला.[२] तो दोन भागांत प्रसिद्ध झाला. त्यानंतर हें पुस्तक अगदीं दुर्मीळ झाल्यामुळें इ. स. १९२९ सालीं प्रिन्सिपॉल एच्. जी. रॉलिन्सन यांनीं इ. स. १६९६ सालीं प्रसिद्ध झालेल्या प्रवासवृत्ताचें लंडनच्या ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेसतर्फे पुनर्मुद्रण करविलें. परंतु या आवृत्तींत शेवटचीं चारहि परिशिष्टें गाळलीं गेलीं. त्यांत हें 'राज्यक्रांतीचें' पहिलें परिशिष्ट व हिंदी चलनपद्धतीचें-'An Account of the Coins of the Kingdoms of India, Persia, Golconda, etc.'–असें तिसरें परिशिष्ट होतें. इ. स. १६९६ची प्रत आतां

१. सहरहू पुस्तकाचीं पृष्ठें ५२५ ते ५५२.

2. Voyages De Jean Ovington - Faits a' Surate, & en d'autres lieux de l' Asie & de l' Afrique. AVEC. L'Histoire de la Re'volution du Royaume de Golconde: & des observations sur les Vers a' Soye. Traduit de l' Anglois. A PARIS.—chez Guillaume Cavelier Fils, Libraire, rue S. Jacques, au Lys d'Or, pre's la Fountaine Saint Severin—M.DCC.XXV.—Avec Approbation & Privilege du Roi.

अगदींच दुर्मीळ झाली असल्यामुळें कुत्बशाहीची समकालीन व महत्त्वाची माहिती देणारें हें ऐतिहासिक साधन पुनर्मुद्रित करणें आवश्यक झालें.

**५. जॉन ओव्हिंग्टनची हकीकत :—** जॉन ओव्हिंग्टन हा इंग्लंडचा रहिवासी. याचा जन्म यॉर्कशायर परगण्यांत डार्लिंग्टनजवळील एका मेल्सन्बी ( Melsonby ) नांवाच्या खेड्यांत इ. स. १६५३ मार्चच्या पूर्वी थोडे दिवस झाला. त्याचें एम्.ए.पर्यंत शिक्षण होऊन त्याला ती पदवी इ. स. १६७८त मिळाली. त्यानें लिहिलेलीं कांहीं पुस्तकें अद्यापि उपलब्ध आहेत. त्याला इंग्लंडच्या बादशहाच्या खास चॅप्लेनचेंहि पद प्राप्त झालें होतें. ईस्ट इंडिया कंपनीचें 'बेंजामिन' नांवाचें जहाज ग्रेव्हसेंडहून ता. ११ एप्रिल १६८९ रोजीं निघालें. या जहाजावर जॉन ओव्हिंग्टनची चॅप्लेनच्या जागीं हंगामी नेमणूक झाल्यानें तोहि त्या जहाजाबरोबर निघाला. हें जहाज मार्गांत निरनिराळ्या बंदरांत मुक्काम करीत करीत शेवटीं इ. स. १६९०च्या २९ मेला मुंबईस आलें. तेथून तें सप्टेंबरच्या तिसऱ्या आठवड्यांत निघून सुरतेस गेलें. सुरतेचा माल उतरल्यानंतर तें जहाज आचिन वगैरे बंदरांकडे निघून गेलें. ओव्हिंग्टन मात्र सुरतेस राहिला. त्याला तेथेंच त्या वखारीवर चॅप्लेन नेमण्यांत आलें. पुढें 'बेंजामिन' जहाज सुरतेस परत आलें व तेथून तें इ. स. १६९३च्या फेब्रुवारींत सुरत सोडून पुन्हां वाटेनें बंदरें करीत करीत ता. ५ डिसेंबर १६९३ रोजीं ग्रेव्हसेंडला पोहोंचलें. ओव्हिंग्टनहि याच जहाजावरून इंग्लंडला परत गेला. सारांश, ओव्हिंग्टन मुंबईस तीन साडेतीन महिने व सुरतेस दोनअडीच वर्षे राहिला. या अवधींत त्यानें जें जें पाहिलें व ऐकलें त्याचा व इतर ठिकाणचा वृत्तांत त्यानें लिहून काढला व तो नंतर त्याचेच हयातींत वर लिहिल्याप्रमाणें इ. स. १६९६त प्रथम प्रसिद्ध झाला. जॉन ओव्हिंग्टन इ. स. १७३१च्या जूनच्या अखेरीस वारला व त्याचा अंत्यविधि ता. २ जुलै रोजीं करण्यांत आला.[३]

**६. क्रांतीच्या इतिहासाचें महत्त्व :—** ओव्हिंग्टनच्या प्रवासवृत्ताबरोबर छापलें गेलेलें हें 'राज्यक्रांती'चें परिशिष्ट ओव्हिंग्टननें लिहिलेलें नसून तें कोणीं व केव्हां लिहिलें हें समजण्यास आज साधन उपलब्ध नाहीं. या हकीकतींत तारीख-

३. इ. स. १९२९च्या प्रतीस प्रि. रॉलिन्सन यांनीं लिहिलेली प्रस्तावना—पृ. IX-XVIII.

सनांचा मुळींच निर्देश नाहीं. ओव्हिंग्टननें जो कांहीं थोडासा प्रास्ताविक खुलासा केला आहे तोहि अपुरा आहे. ओव्हिंग्टन लिहितो कीं, "ही क्रांतीची व इतर हकीकत सुदैवानें जर माझ्या ग्रंथसमाप्तीपूर्वी हातीं आली असती तर तिचा मला या प्रवासवृत्तांत ठिकठिकाणीं उपयोग करितां आला असता. परंतु हे कागद माझा प्रवासग्रंथ छापून झाल्यानंतर माझ्या हातीं आले. त्यांतील माहिती माझ्या विपयास धरून होती. ती फार महत्त्वाची व नवीन असल्याचें आढळून आलें. अर्थात् अशी माहिती परिशिष्टरूपानें देणें योग्य असें वाटल्यावरून ती या ग्रंथास जोडीत आहें. हें टिपण (Memoirs) डॅनिअल शेल्डननें मजकडे पाठविलें व त्याचा पूर्णपणें उपयोगहि करूं दिला. त्यामुळें त्याचे मजवर वरेच उपकार झाले आहेत. तरी या गोवळकोंड्याच्या राज्यक्रांतीच्या हकीकतीस विशेष प्रस्तावना न जोडतां ती वाचकांस आवडेल असा भरंवसा वाटल्यामुळें सादर करीत आहें."[४] यावरून ही हकीकत इ. स. १६९६पूर्वींच लिहून ठेविली होती हें निश्चित आहे. त्यास मजकुरांत इ. स. १६७४च्या पूर्वींचीच हकीकत आली आहे. त्यानंतरच्या कोणत्याहि प्रसंगाचा त्यांत उल्लेख नाहीं. यावरून हा लेखक इ. स. १६७४पूर्वी गोवळकोंड्यास राहात असावा. माहितींतील बारकाई, त्यांतील शब्दयोजना, क्रियापदांचीं वर्तमानकालवाचक कांहीं रूपें व विशेषतः मुसाखानाची प्रशंसा यांचा विचार केला तर हा युरोपीय लेखक कोणा तरी कुत्बशाही अंमलदाराचा, बहुधः मुसाखानाचाच दोस्त अगर परिचयाचा असावा व ही हकीकतहि त्यानें गोवळकोंड्यासच लिहिली असावी. एकंदर लेखाची चिकित्सा करितां हें टिपण समकालीन आहे यांत शंका नाहीं. लेखकानें अकराबारा वर्षांत घडलेली हकीकतच मुख्यतः निवेदन केली आहे. ती सांगतांना त्यानें पांचसात वर्षांची थोडीशी पूर्वमाहिती अनुसंधानानें दिली आहे. परंतु ती विषयपूर्ततेसाठीं आली आहे. यांत कालाचा व—सातआठ नांवें सोडलीं तर—नांवांचा उल्लेख नाहीं. लेखनाचा मुख्य उद्देश अबुल हसनला तख्तावर आणण्यासाठीं कशी कारवाई करावी लागली व अबुल हसननें तख्तावर आल्यानंतर योग्य अशी क्रांति कशी घडवून आणली एवढेंच सांगण्याचा आहे. मात्र या हकीकतीवरून इतरत्र उपलब्ध असलेल्या माहितीवर प्रकाश पडून कांहीं शंकित स्थळें उलगडलीं जातात. या दृष्टीनें हें 'राज्यक्रांती'चें टिपण कुत्बशाहीच्या इतिहासास वरेंच महत्त्वाचें व उपयुक्त ठरेल असा भरंवसा वाटतो.

---

४. प्रस्तुत ग्रंथ, पृ. १-२.　　५. प्रस्तुत ग्रंथ, पृ. ३-२१.

७. 'हदिकत-अल-अलम' :— या ग्रंथांत समाविष्ट[6] केलेली दुसरी हकीकत म्हणजे कुत्बशाही व निजामशाही यांची हकीकत देणाऱ्या 'हदिकत-अल-अलम' नांवाच्या फारसी बखरींतील कांहीं भाग. या बखरीच्या तीन हस्तलिखित प्रती लंडन येथील इंडिया ऑफिसच्या ग्रंथालयांत आहेत. त्यांतील २४२८ नंबरची (एथे यादींतील नं. ४६५) प्रत मीं उपयोगिली[7]. त्याचप्रमाणें ही बखर हैद्राबाद येथें हिजरी सन १२१८ (इ. स. १८०३-४)त छापली गेली होती. तीहि प्रत मला उपयोगांत आणतां आली. हदिकत-अल-अलम हा फारसी ग्रंथ दुसरा निजाम अली असफझाचा वजीर अबुल कासिम बिन रदिआलदिन अलमुसावी ऊर्फ मीर अलम यानें हिजरी सन १२१८ (इ. स. १८०३-४)पूर्वी पुरा केला. मीर अलम हिजरी सन १२२८ (इ. स. १८१३)त वारला. इंडिया ऑफिसमधील २४४० नंबरच्या हस्तलिखित प्रतीवरून हा ग्रंथ कोणा एका मीर अबु तुर्ब इब्न अल सय्यद अहमद अरिदावी यानें मीर अलमच्या सांगण्यावरून इ. स. १८०६त रचला असें म्हटलें असून त्यांत मीर अलमचें त्रोटक चरित्रहि दिलें आहे[8]. परंतु हें तेवढें विश्वसनीय दिसत नाहीं.

या हदिकत-अल-अलमचे दोन मुख्य भाग किंवा मक्ला केले आहेत. पहिल्या भागांत गोवळकोंड्याच्या कुत्बशाहीचा इतिहास व दुसऱ्या भागांत हैद्राबादेच्या निजामशाहीचा वृत्तांत दिला आहे. पहिल्या भागांत एक मुखदिना व सात बाबी असे आणखी विभाग पाडले आहेत. या विभागांतहि प्रत्येकीं तीन फैसल किंवा पोटविभाग कांहींत पाडले आहेत. मुखदिनांत मुलतान कुली कुत्ब उल्मुल्कची पूर्व हकीकत व वंशावळ [ पृ. ६अ ] दिली आहे.

पहिली बाब— सुलतान कुली कुत्बशाहाची ४४ वर्षांची कारकीर्द. हा हि.स. ९५० (इ. स. १५४३)त वारला. [ पृ. ७अ ]

दुसरी बाब— जमशीद कुत्बशाहाची हकीकत. मृत्यु हि. स. ९५७ (इ. स. १५५०). जमशीद कुत्बशाहाचा मुलगा सुभान कुली याची हकीकत. [ पृ. ४४अ ]

---

६. प्रस्तुत ग्रंथ, पृ. २३-१८५.

७. पहिली प्रत इंडिया ऑफिस नं. २४२८ व एथेच्या यादींतील नं. ४६५, दुसरी प्रत इंडिया ऑफिस नं. २४३९ व तिसरी प्रत इंडिया ऑफिस नं. २४४०.

८. इंडिया ऑफिसांतील फारसी हस्तलिखित ग्रंथाची यादी–एथेकृत, पृ. १७९.

तिसरी बाब—इब्राहीम कुत्बशाहा याची कारकीर्द. मृत्यु हि. स. ९८८ (इ. स. १५८०). [पृ. ८३]

चवथी बाब—महमद कुली कुत्बशाहाची कारकीर्द. मृत्यु हि. स. १०२० (इ. स. १६१२). [पृ. १०८ अ]

पांचवी बाब—महमद कुत्बशाहा याची कारकीर्द. मृत्यु हि. स. १०३५ (इ. स. १६२६). [पृ. १४३]

सहावी बाब—अबदुल्ला कुत्बशाहा याची कारकीर्द. मृत्यु हि. स. १०८३ (इ. स. १६७२). [पृ. १६३]

सातवी बाब—अबुल हसन ऊर्फ तानाशाहा कुत्बशाहा याची कारकीर्द. हि. स. ११११ (इ. स. १७०१). [पृ. १९८]

दुसऱ्या मखल्यांत निजामशाहीची हकीकत दिली असल्यानें तिचा येथें विस्तार करण्याचें कारण नाहीं.

ही हकीकत समकालीन नाहीं. परंतु यांत ठिकठिकाणीं समकालीन ग्रंथांतील, कागदपत्रांतील व कबरीवरील लेखांतील उतारे व आधार घेतले असल्यानें या हकीकतीस ऐतिहासिक महत्त्व प्राप्त झालें आहे. शिवाय समग्र कुत्बशाहीची एकत्रित व संकलित हकीकत देणारा इतिहास उपलब्ध नसल्यानें ही बखर संशोधकांस मार्गदर्शक होईल यांत शंका नाहीं.

**८. हदिकतमधील भाषांतरित विभाग :—** प्रस्तुत ग्रंथांत मात्र अबदुल्ला व तानाशाहा यांच्या हकीकतींचा म्हणजे शिवशाहीच्या इतिहासास उपयुक्त इतकाच भाग भाषांतरित करून छापला आहे. हें भाषांतर पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजांतील पर्शिअन व अरेबिकचे प्रोफेसर, श्री. ब. द. वर्मा, एम्.ए., यांनीं केलें आहे. सहाव्या बाबींतील दुसरा व तिसरा फेसल व सातवी बाब एवढाच भाग भाषांतरित झाला आहे. अबदुल्ला कुत्बशाहाची जी हकीकत आली आहे ती 'कबरीवरील शीलालेख', सुलतान अबदुल्लाच्या कारकीर्दीची हकीकत देणारे 'तारिख-इ-निझाम-उद्दिन अहमद' व 'तारिख-इ-मिरत-उस-सफा' हे दोन ग्रंथ व कोठें कोठें क्वचित् उल्लेख असलेला 'तारिख-इ-काफीखान' यांचे आधारें दिली आहे. कांहीं ठिकाणीं फर्मानांचा व हिशेबी कागदांचाहि उल्लेख केला आहे. लेखकानें स्वतःची भर न घालतां

मिळाला तेवढाच मजकूर उद्धृत केला असें शेवटीं म्हटलें आहे.[९] हदिकतमध्यें दिलेल्या मजकुरावरून अबदुल्ला कुत्बशाहाच्या चरित्राचा समग्र बोध होऊं शकत नाहीं. कारण साधारणतः यांत इ. स. १६२६ ते १६३३ व १६५६चा मजकूर आला आहे. शेहचाळीस वर्षांची कारकीर्द असतां अवघी दहा वर्षांचीहि हकीकत यांत ग्रथित झाली नाहीं यावरून ही हकीकत किती अपुरी आहे हें समजून येईल. परंतु जी हकीकत दिली आहे ती बरीच बारकाईची असल्यानें उपयुक्त आहे.

अबुल हसनचा इतिहास 'काफिखान', 'मासिर-उल-अमारा', व मिर्झा महमद ऊर्फ निमतखान ऊर्फ अली याचा 'वाका-इ-गोवळकोंडा' यांवरून घेतलेला आहे. तिसरा ग्रंथकार समकालीन आहे. यांत विशेषतः इ. स. १६७२ व १६८५-७ची म्हणजे अबुल हसनचें राज्यारोहण व मोगलांशीं झालेलें शेवटचें युद्ध एवढीच हकीकत आली आहे. मोगलीं युद्धांत कुत्बशाहीची बाजू ऐकावयास मिळाल्यानें या हकीकतीसहि विशेष महत्त्व प्राप्त होत आहे.

९. **मादण्णा व आकण्णा यांची एक जुनी हकीकत**:— या ग्रंथास जोडलेली[१०] तिसरी हकीकत म्हणजे मादण्णा व आकण्णा यांचे बद्दलचें एक टिपण. हें एका जुन्या तेलगु टिपणावरून क. मॅकेन्झी यानें इ. स. १८०१च्या सुमारास इंग्रजींत भाषांतर करून घेतलें. हें क. मॅकेन्झी यांच्या इंडिया ऑफिसमधील संग्रहांत आढळलें. त्याचें मूळ कोणीं व केव्हां लिहिलें हें समजण्यास आज मार्ग नाहीं. भाषांतरामुळें मूळ मजकूर विकृताकरथेंत मिळत आहे. परंतु त्यांत दिलेल्या बारीक-सारीक गोष्टींवरून ही हकीकत बहुधः एखाद्या घरगुती टिपणावरून घेतली असावी असें दिसतें. या टिपणाच्या साहाय्यानें मादण्णा व आकण्णा यांच्या घराण्याची बरीच माहिती उपलब्ध होत आहे व या माहितीवरून मादण्णाचे बरेच कागदपत्र लावतां येणार आहेत. शिवाय बऱ्याच नवीन गोष्टींचा उलगडा होतो तें वेगळेंच.

१०. **कुत्बशाही इतिहासलेखनाचे पूर्व प्रयत्न**:—कुत्बशाहीच्या इतिहास-लेखनाचे प्रयत्न खास कुत्बशाहींतच झालेले दिसतात. बहुतेक सर्व पातशाहांचीं चरित्रें लिहिलीं गेलीं असावींत. बहुधः हीं सर्व फारसींतच असणार. फेरिस्तानें कुत्बशाहीचा स्वतंत्र-परंतु अगदींच त्रोटक इतिहास दिला आहे. त्यांत हि. स. ९९५ (इ. स. १५८७) पर्यंतची म्हणजे महमद कुली कुत्बशाहाच्या तख्तारोहणानंतर

९. प्रस्तुत ग्रंथ, पृ. ८६ व ८७. १०. प्रस्तुत ग्रंथ, पृ. १८७–२०३.

७ वर्षांपर्यंतची हकीकत आहे.[11] या हकीकतीस ब्रिग्जनें याच वेळीं लिहिलेल्या 'तरीख-इ-महमद कुत्बशाही' ('The History of Mahomed Kolly Kootb Shah') या फारसी ग्रंथाचें भाषांतर जोडलें आहे.[12] यांत हि. स. १०२० (इ. स. १६१२)पर्यंतची म्हणजे महमद कुली कुत्बशाहाच्या मृत्यूपर्यंतची हकीकत आली आहे. फेरिस्तानें इब्राहीम कुत्बशाहाच्या कारकीर्दीत लिहिलेल्या शाहा खुर्षच्या 'कुत्बशाही घराण्याचा उदय व इतिहासा'चा उल्लेख[13] केला आहे; तर 'तरीख-इ-महमद कुत्बशाहीं'त खास सुलतान कुलीनें स्वमुखानें सांगितलेली हकीकत नोंद करणाऱ्या सुद्र-इ-जहानच्या 'मख्युव-उल-कुलुब'[14]तील उतारे घेतले आहेत. ब्रिग्जनें 'कुत्ब-नुमा-अलम' पाहिला होता[15]. 'हदिकत-अल्-अलम' मध्यें 'तरिख-इ-निजामउद्दिन अहमद', 'तरिख-इ-मिरत-उस्-सफा', मिर्झा महमद ऊर्फ निमतखान ऊर्फ अली याचा 'वाका-इ-गोवळकोंडा' यांचा उल्लेख आहे.[16] 'तरिख-इ- कुत्बशाही' या नांवाचा ग्रंथ ब्रिटिश म्युझिअममध्यें आहे.[17] हा ग्रंथ इ. स. १६१७-८त लिहिला गेला व याची प्रत इस्मायल मुल्ला अरब शिराझी यानें अबदुल्ला कुत्बशाहासाठीं इ. स. १६६१त केली असा त्यांत उल्लेख आहे. हदिकतमध्यें याच ग्रंथांचा व फेरिस्ताचा मुख्यतः उपयोग केला आहे. 'तरिख-इ-कादि' या नांवाचा कुत्बशाहीची हकीकत देणारा ग्रंथ हैद्राबादच्या असाफिया ग्रंथालयांत आहे. कै. बाळाजी प्रभाकर मोडक यांनीं आपल्या 'दक्षिणेंतील मुसलमानी राज्यांचा इतिहास, भाग ३',[18] यांत (पृ. ११३ ते १८५) 'कुत्बशाही घराण्याचा इतिहास' दिला आहे. त्यांत उपरिनिर्दिष्ट ब्रिग्जच्या भाषांतराचाच बहुतेक अनुवाद केला असून अबदुल्ला व अबुल हसन यांची थोडीशी हकीकत मोगली इतिहासांतून घेतली आहे. यांत महमद कुत्बशाहा गाळला गेला आहे.

---

११. ब्रिग्जचें फेरिस्ताचें भाषांतर, पुस्तक ३ रें, पृ. ३२१-३३५.
१२. ब्रिग्जचें फेरिस्ताचें भाषांतर, पुस्तक ३ रें, पृ. ३३९-४८४.
१३. ब्रि. फे. कु. पु. ३, पृ. ३२१.
१४. ब्रि. फे. कु. पु. ३, पृ. ३४०, ३५२ इ.
१५. ब्रि. फे. कु. पु. ३, पृ. ४५१.
१६. प्रस्तुत ग्रंथ पृ. ८७.
१७. ब्रिटिश म्युझिअममधील फारसी हस्तलिखितांची यादी, भाग १ ला.
१८. हा ग्रंथ कोल्हापूर येथें शिळाप्रेसवर छापून ऑगस्ट १८९१त प्रसिद्ध झाला.

आतांपर्यंत जे इतिहासलेखनाचे प्रयत्न झाले ते बहुधः मोगल पातशाहीवरील असत. विजयानगरचा इतिहासहि थोडाबहुत अभ्यासला गेला. परंतु इतर दक्षिणी राज्यांच्या इतिहासांकडे अद्यापि फारसें लक्ष्य लागलें नव्हतें. भारत-इतिहास-संशोधक-मंडळाच्या संस्थापनेनें मराठ्यांच्या इतिहासाकडे बरेंच लक्ष्य वेधलें गेलें, व कर्नाटक-संघटनेच्या चळवळींत कर्नाटकाचा इतिहास पुष्कळच उपलब्ध होईल अशीं चिन्हें दिसूं लागलीं. अद्यापि आदिलशाही व कुत्बशाही घराण्यांच्या इतिहासांकडे जावें तितकें लक्ष्य जात नाहीं. क्रमिक व इतर आधुनिक पुस्तकांत या राज्यांबद्दल जी कांहीं माहिती येते ती बहुधः मोगली इतिहासांतून घेतलेली असते. फेरिस्तावरून घेतलेली हकीकत महमद कुली कुत्बशाहापर्यंतचीच असल्यानें व मोगली इतिहासांत फक्त अबदुल्ला व अबुल हसनचा उल्लेख आल्यानें महमद कुत्बशाहाची इ. स. १६१२ ते १६२६ ची कारकीर्द युरोपिय व स्वदेशीय ग्रंथकारांच्या दृष्टिक्षेपांतून गेलेली आढळते. शिवाय 'तारिख-इ-महमद कुत्बशाही'तील हकीकत बहामनी, आदिलशाही, निजामशाही वगैरे तत्कालीन इतिहासांवरून तपासली जाऊन नंतर ती उपयोगिली गेली असल्याचें दिसून येत नाहीं. त्यामुळें प्रचलित कुत्बशाहीच्या हकीकतींत बरीच विसंगतता व चुका आढळून येतात.

कुत्बशाहीचा समग्र इतिहास लिहितां येण्यासारखा आहे. उपरिनिर्दिष्ट कुत्बशाहीचे इतिहासग्रंथ व बहामनी, आदिलशाही, निजामशाही आणि विजयानगरच्या राज्यांचे इतिहास उपलब्ध आहेत. अबदुल्ला व अबुल हसन कुत्बशाहांचे पत्रसंग्रहहि[१९] मिळण्यासारखे आहेत. कुत्बशाहांच्या पदरीं अनेक विद्वान होते. त्यांनीं निरनिराळे ग्रंथ लिहिले आहेत. त्यांतील प्रशस्तींतहि पुष्कळ माहिती मिळण्यासारखी आहे. यांशिवाय कुत्बशाहीचे इमारतींवरील शीलालेख, थडग्यांवरील लिखाणें,[२०] व इतर कागदपत्रें उपलब्ध होण्यासारखीं आहेत व कांहीं उपलब्ध झालेलीं आहेत. आणखीहि पुष्कळ मिळण्याचा संभव आहे. मद्रास व बंगाल येथील यूरोपियन वखारवाल्यांनीं लिहिलेल्या कागदपत्रांतून[२१] या राज्याबद्दल पुष्कळ माहिती मिळते.

१९. ब्रिटिश म्युझिअम, ग्रंथ नं. Add: 6600, Add: 7688, Sloane 4092 व Sloane 3582. इंडिया ऑफिससंग्रहांतहि थोडीं फर्मानें आहेत.

२०. एपिग्राफिआ इंडो–मोस्लेमिकाचे अंक, १९०७–८ ते १९२९–३०.

२१. मद्रास व बंगाल रेकॉर्ड्स् छापलेले आहेत. मुंबईकरांच्या कागदपत्रांतीलहि बराच निवडक भाग शिवचरित्र कार्यालयानें "English Records on Shivaji" व सर फोस्टरनें "English Factories in India" व इतर ग्रंथांतून दिला आहे.

हीं सर्व साधनें प्रथम परीक्षून नंतर त्यांचा उपयोग केल्यास कुत्बशाहीचा बराचसा निर्दोष व सविस्तर इतिहास देतां येईल. प्रस्तुत निबंधांत कुत्बशाहीच्या इतिहासाचा फक्त आराखडा देण्याचा विचार आहे. उपरिनिर्दिष्ट सर्व साधनांचा उपयोग करण्यास कालावधी लागेल. याकरितां अभ्यासाची सुरुवात करण्यास जरूर असणारी रूपरेषा आंखण्याचा येथें प्रयत्न केला आहे.

११. **कुत्बशाहीची पूर्व हकिकत :**—कुत्बशाहीचा संक्षिप्त इतिहास येथें देणें अप्रस्तुत होणार नाहीं. बहामनी राज्याचीं महमदशाहाच्या मृत्यूनंतर छकलें उडालीं. दुसरा महमदशाहा १ सफर ८८७ हि. ( २१ मार्च १४८२ इ. स. )त मृत्यु पावला. महमुदशाहा गादीवर आला. तो लहान होता. निजाम उल्मुल्क कारभार पाहूं लागला. याचें व इतर मुसलमान सरदारांचें न पटल्यामुळें राज्यांत भांडणें उपस्थित झालीं. निजाम उल्मुल्कच्या नेतृत्वाखालीं दक्षिणी मुसलमान सरदार परदेशीयांशीं भांडूं लागले. आदिलखान दख्खनी व इमाद उल्मुल्कनें आपलीं सैन्यें राजधानींत घुसविलीं. दोन्ही सैन्यांत सारखें रण माजून राहिलें. निजाम उल्मुल्क मुख्य कारभारी झाला. युसुफ आदिलखानादि मुसलमान सरदारांनीं स्वतंत्रपणें वागण्यास हि. ८९१ (इ. स. १४८६)पासून सुरुवात केली. दिवसेंदिवस बहामनी राज्याचा ऱ्हास होऊं लागला. इ. स. १५१२त कुत्बशाहीची तेलंगणांत स्थापना झाली. या शाहीचा संक्षिप्त इतिहास फ्रिग्जच्या 'तरिख-इ-महमद कुत्बशाही'च्या आधारें पुढें दिला आहे.[२२]

कुत्बशाहीचा मूळ संस्थापक सुल्तान कुली हा होय. सुलतान हें त्याचें नांव होतें. याचा जन्म हमदान ( इराण ) प्रांतांतील सय्यदाबाद नांवांच्या खेड्यांत हि. ८६० ( इ. स. १४५६ )च्या सुमारास झाला.[२३] हा आपला चुलता अमीर अल्ला

---

२२. या मजकुरांत जो भाग 'तरीख-इ-महमद कुत्बशाहीं'तून घेतला आहे, त्यास आधारासाठीं स्वतंत्र टीपा दिल्या नाहींत. मात्र जेथें त्याहून निराळा अगर नवीन मजकूर आला आहे तेथें ज्या ग्रंथांवरून तो घेतला त्यांचे आधार टीपेंत दिले आहेत.

२३. सुलतान कुलीचें मृत्युसमयीं वय ९० होतें. सुद्र-इ-जहाननें सुलतान 'मी जवळ जवळ १०० वर्षांचा होत आलों आहें', असें म्हटल्याचें लिहिलें आहे. कॅ. हेगनें तो ९८व्या वर्षी वारल्याचें लिहिलें आहे.—बुऱ्हान-इ-मासिरचें भाषांतर, इंडियन अँटिक्केरी, व्हॉ. XLIX-१९२०, पृ. २२२. हेगच्या म्हणण्याप्रमाणें सुलतान कुलीचा जन्म हि. ८५२ ( इ. स. १४४८)त येईल.

कुली याजबरोबर हिंदुस्थानांत प्रथम लहानपणींच आला होता. परंतु तो लवकरच स्वदेशीं परत गेला. तेथील अमीर याकूब बेगच्या[२४] त्रासामुळें त्यास पुन्हां हिंदुस्थानांत आपल्या चुलत्याबरोबर यावें लागलें. हा बहुधः इ. स. १४८१चे सुमारास इराणांतून निघून इ. स. १४८२नंतर महमुदशाहाकडे आला. महमुदशाहा बहामनीनें त्यास आपल्या खास तैनातीच्या सैन्यांत ठेवून घेतलें.

हि. ८९१ (१४८६ इ. स.).— कोवाम उत्मुल्कनें जबरदस्तीनें तेलंगणाचा ताबा घेतला, तेव्हां त्याचा मोड करण्यासाठीं महमुदशाहानें स्वारी केली. वाटेंत वारंगळ येथें बातमी आली कीं, निजाम उल्मुल्कच्या संमतीनें त्याचा वडील मुलगा मलिक अहमद बहिरीनें बंड उभारलें. महमुदशाहानें सुलतान कुलीस तेलंगणाचा तरफदार नेमून[२५] पाठविलें व तो खासा बेदराकडे गेला.

हि. ८९६[२६] (१४ नवंबर १४९० ते ३ नवंबर १४९१ इ. स.).—दखनी व सिद्दी मुसलमानी सरदारांनीं महमुदशाहाचा खून करण्याचा गुप्त कट केला. कटवाले २१ जिल्काद (२६ सप्टेंबर १४९१ रोजीं) रात्रीं राजवाड्यांत घुसले. त्या वेळीं सुल्तान कुली महमुदशाहाजवळ होता. त्यानें आपल्या दहा सांथीदारांसह मोठ्या शौर्यानें शाहाचें संरक्षण केलें. त्यांत त्याचे पांच लोक कामास आले. इतक्यांत हुसेन ख्वाजा जहान यास निरोप गेला. त्यानें येऊन बंदोबस्त करण्यास सुरुवात केली. महमुदशाहा ख्वाजा जहानच्या आश्रयास पळाला. बरोबर सुलतान कुली होताच. सकाळपर्यंत कटवाल्यांचा मोड झाला. नंतर कटांत सामील झालेल्यांस शासन केलें. या वेळीं सुल्तान कुलीनें मोठ्या साहसानें शाहाचें प्राणरक्षण केल्यावरून त्यास 'मलिक कुत्ब उल्मुल्क' असा किताब देऊन त्यास आपला नायब वजीर केलें.

हि. ८९९[२७] (१२ आक्टोबर १४९३ ते १ आक्टोबर १४९४ इ. स.).—गुजराथच्या महमुदशाहानें बहादुर गिलनीविरुद्ध महमुदशाहा बहामनीकडे गलबतें लुटल्याबद्दल तक्रार केली. शिवाय गिलनीहि स्वतंत्र होऊं पाहात होता. त्यावरून महमुदशाहा गिलनीच्या पारिपत्यार्थ निघाला. बरोबर कुत्ब उल्मुल्क होता. याच सुमारास गिलनीनें युसुफ आदिलखानाची जमखंडी घेतल्यामुळें युसुफनें आपला सेनापती

२४. याकुब बेग इ. स. १४७९त कारभारावर आला व इ. स. १४९०त मेला.
२५. ब्रि. फे. ब. पु. २, पृ. ५२७-३१.
२६. ब्रि. फे. ब. पु. २, पृ. ५३३. [ ह-अ-अ. (लि.) पृ. १७.
२७. ब्रि. फे. ब. पु. २, पृ. ५३१. हदिकतमध्यें २१ जिल्काद ही तारीख दिली आहे.

कुमलखान यास महमुदशाहाच्या मदतीस पाठविलें.[२८] महमुदशाहानें तेलंगणाचा तरफदार कुत्ब उल्मुल्क यास जमखंडीस वेढा घालण्याचा प्रथम हुकूम दिला. वेढा चालू असतां मुख्य सेनापतीस तीर लागून तो मारला गेला. तेव्हां मुलतान कुलीस तें सेनापतीपद देऊन त्याचेकडे तेलंगणांतील भोंगिर[२९] ( Bhongeer ) व दुर्गी (Doorgy)[३०] हे दोन गांव खर्चासाठीं इनाम दिले. जमखंडीचा[३१] किल्ला स्वाधीन होतांच तो युसुफच्या सेनापतीचे हवालीं केला. बहादुर गिल्नी संकेश्वरीं पळून जाऊन राहिला होता. म्हणून संकेश्वरावर चालून जाऊन तें काबीज केलें. परंतु गिल्नी आधींच मिरजेच्या किल्लयांत जाऊन राहिला होता. हा किल्ला पोटा नायकाच्या ताब्यांत होता. सुल्तान कुलीनें मिरझेच्या[३२] किल्लयास वेढा दिला.[३३] तेव्हां पोटा नायकाचा मुलगा देव नायक यानें चालून येऊन निकराचा हल्ला केला. सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत घनघोर रण माजून राहिलें. त्यास सुल्तान कुली व देव नायकाचें संगर झालें. त्यांत देव नायक ठार झाला. मुलगा मारला गेलेला पाहतांच पोटा नायकाचा धर सुटला. किल्ला महमुदशाहाचे हवालीं झाला. तेव्हां महमुदशाहानें पोटा नायकाकडे तो परत देऊन, बहादूर गिल्नी वाळव्यास[३४] पळून गेला होता म्हणून तो वाळव्यास गेला. प्रथम गिल्नीनें ख्वाजा निमतउल्लास पाठवून क्षमा मागण्याचा थाट केला. हा २७ रजब (२६ मार्च १४९४) रोजीं महमुदशाहास भेटला. परंतु पुन्हा बंडाचें निशाण लावलें. तेव्हां महमुदशाहानें सुलतान कुलीस घेऊन जाऊन वाळवें घेतलें व काल्हापुरावर[३५] चालून गेला. कोल्हापूर घेतलें. गिल्नी पन्हाळयांस[३६] गेला म्हणून पन्हाळयास वेढा घातला.

---

२८. ब्रि. फे. आ. पु. ३, पृ. १४.

२९. भोंगीर (Bhongir) हैद्राबादेच्या ईशान्येस ३० मैल, नलगोंड जिल्हा, निजाम संस्थान. हदिकतमध्यें कोटगीर म्हटलें आहे. ह-अ-अ. (लि.) पृ. १८.

३०. दुर्गी—बहुधः देग्लूर (Deglur) असावें. हें बिदरच्या उत्तरेस ४५ मैल आहे. नांदेड जिल्हा, निजाम संस्थान.

३१. जमखंडी—विजापूरच्या नैऋत्येस ३५ मैल, जमखंडी संस्थान.

३२. मिरज—विजापूरच्या पश्चिमेस ७५ मैल, मिरज संस्थान.

३३. ब्रि. फे. ब. पु. २, पृ. ५४०-१.

३४. वाळवें.—वाळवें तालुका, सातारा जिल्हा.

३५. कोल्हार म्हटलें आहे; परंतु बहुधः कोल्हापूर असावें. हदिकत-अल-अलम यांत २७ रजब ही तारीख दिली—सदर पुस्तक—( लि. ) पृ. १९.

३६. पन्हाळा—कोल्हापूरच्या उत्तरेस ५ मैल, कोल्हापूर संस्थान.

शेवटीं गिल्नीचा पुरा मोड झाला. तो पळून गेला. पुन्हां माफी मागितली. परंतु महमुदशाहानें पाठविलेल्या सरदारांवर तो चालून आला. या झटापटींत तो तीर लागून मारला गेला.[३७] नंतर महमुदशाहाची स्वारी ससैन्य विजापुरास आली. तेथें युसुफखान भेटला. त्यानें महमुदशाहा व सुलतान कुली यांस बरेच नजरनजराणे दिले.[३८] नंतर सुल्तान कुली तेलंगणांत आपल्या कारभारावर गेला.

हि. ९०१[३९] (२१ सप्टेंबर १४९५ ते ८ सप्टेंबर १४९६ इ. स.).— सुल्तान कुलीकडे तेलंगण, गोवळकोंडा व वारंगळ या प्रांतांची तरफदारी होती. याच सुमारास दस्तुर दिनार हा सागर व अहशनाबाद कुलबर्गा यांचा सुभेदार होता. या भागांत कांहीं गडबड झाल्यामुळें व तो स्वतंत्र होण्याची खटपट करीत आहे असें समजतांच, त्याचे हाताखालील अधिकाऱ्यांस महमुदशाहानें परत दरबारीं बोलाविलें. त्यामुळें दस्तुर दिनारास राग आला. त्यानें ससैन्य कूच करून कुलबर्ग्याजवळील[४०] कांहीं मुलुख घेतला. महमुदशाहानें युसुफखान व सुलतान कुलीस मदतीस बोलाविलें. मैंदुर्गी (Myndurgy) येथें लढाई झाली. दस्तुर दिनार कैद झाला. परंतु युसुफखानाच्या मध्यस्थीनें त्यास माफी मिळाली व त्याचेकडे पुन्हा कुलबर्गा प्रांत दिला व सागर युसुफकडे[३९] सोंपविला. होटगी[४१] (Ootgy) व उदगीर[४२] (Kotgeer) सुल्तान कुलीस खास खर्चासाठीं मिळाले व 'अमीर-उल्-उमराव' हा किताब मिळाला. नंतर सर्वजण आपापल्या प्रांतीं गेले.

हि. ९०३ (३० आक्टोबर १४९७ ते १८ आक्टोबर १४९८ इ.स.).— युसुफखान व दस्तुर दिनार यांच्यांत भांडण लागलें व महमुदशाहानें दस्तुर दिनारास सुल्तान कुलीच्या हाताखालीं तरफदारी करण्याचा हुकूम दिला. तेव्हां दस्तुर दिनाराची पाठीराखी कासीम बरिदानें केली. महमुदशाहा युसुफखान, सुल्तान कुली व मलिक

---

३७. ब्रि. फे. ब. पु. २, पृ. ५४१–३.

३८. ब्रि. फे. आ. पु. ३, पृ. १५.

३९. ब्रि. फे. आ. पु. ३, पृ. १५-१६ व ब. पु. २, पृ. ५४४.

४०. कुलबर्गा—गुलबर्गा, हैद्राबादेच्या पश्चिमेस १०० मैल, कुलबर्गा जिल्हा, निजाम संस्थान.

४१. होटगी—सोलापूरच्या आग्नेयेस १५ मैल, सोलापूर जिल्हा.

४२. उदगीर—बिदरच्या वायव्येस ४५ मैल, बिदर जिल्हा, निजाम संस्थान.

एलिअज यांस घेऊन कासिम बरिदावर चालून गेला. गुंजवटीजवळ (Gunjouty) लढाई झाली. तींत कासिम बरिदाचा पूर्ण पराभव झाला.[४३]

हि. ९०४ (२० आक्टोबर १४९८ ते ७ आक्टोबर १४९९ इ. स.).— त्यानंतर दुसऱ्या वर्षी युसुफखान पुन्हां दस्तुर दिनारावर चालून गेला. या वेळीं दिनारास मलिक अहमद बहिरीनें मदत दिली. तेव्हां युसुफची पिच्छेहाट होऊं लागली. परंतु इतक्यांत सुल्तान कुली युसुफचे मदतीस येत आहे असें समजतांच हीं दोन्हीहि सैन्यें माघारीं फिरलीं.[४४]

युसुफखान, मलिक अहमद बहिरी व इमाद उल्मुल्क या तिघांनीं ठरविलें कीं, दक्षिणेंत अवघ्या तीनच शाह्या असाव्यात. तदनुसार कोणी इतर कोणत्या शाहीवर घाला घालावा हेंहि ठरून घेतलें. त्यांत कासिम बरिदानें तेलंगण घेऊन अहमदाबादचें बहामनी राज्य चालवावें असें ठरलें. परंतु या कटापासून फारशी निष्पत्ति झाली नाहीं.[४५] उलट कासिम बरिदानें महमुदशाहास बाजूस सारण्याचा बेत केलेला कळतांच इतर सर्वजणांस त्याची चढाई सहन झाली नाहीं. ते व सुल्तान कुली धांवून आले. तेव्हां कासिम बरिदानें माघार घेतली व शेवटीं महमुदशाहाकडे राज्यकारभार सोंपवावा व कासिम बरिदानें आवसा[४६] व कंदाहारच्या[४७] जहागिरींत राहावें असें ठरलें.

हि. ९०८ (५ जुलै १५०२ ते २६ जून १५०३ इ. स.).—महमुदशाहानें हिंदु राजांवर नवंबरचे सुमारास स्वारी करण्याचें ठरून तो उदगिरास आला. तेव्हां त्यास सुल्तान कुली येऊन मिळाला. युसुफखानादि सुभेदारहि येऊन मिळाले. महमुदशाहानें रायचूर[४८] व मुदगल[४९] घेतले व ते युसुफखानाचे हवालीं करून तो परत राजधानीस गेला.

---

४३. ब्रि. फे. आ. पु. ३, पृ. १७-८, व ब. पु. २, पृ. ५४५-६.

४४. ब्रि. फे. आ. पु. ३, पृ. १८, व ब. पु. २, पृ. ५४६.

४५. ब्रि. फे. आ. पु. ३, पृ. १८-९.

४६. आवसा—बिदरच्या पश्चिमेस ७० मैल, उस्मानाबाद जिल्हा, निजाम संस्थान.

४७. कंदाहार—बिदरच्या उत्तरेस ८० मैल, नांदेड जिल्हा, निजाम संस्थान.

४८. रायचूर—विजापूरच्या आग्नेयेस १०५ मैल, रायचूर जिल्हा, निजाम संस्थान.

४९. मुदगल—रायचूरच्या नैऋत्येस ५५ मैल, रायचूर जिल्हा, निजाम संस्थान.

याच वर्षी जमादिलावल महिन्यांत ( नवंबर १५०२ इ. स. ) युसुफखानानें शिया पंथाचा जाहीर स्वीकार करून त्याप्रमाणें खुत्बाहि वाचविला. तेव्हां महमुदशाहा व सुन्नि पंथाचे इतर सरदार त्याचेवर चालून गेले. सुलतान कुली शिया पंथाचा पुरस्कर्ता; परंतु तोहि त्यांस मिळाला. या वेळीं युसुफनें माघार घेतली. त्यामुळें हें प्रकरण थोडक्यांत मिटलें.

९ जिल्हेज ९०९ हि. ( २३ मे १५०४ इ. स. ) रोजीं कासिम बरिदानें महमुदशाहा एकटाच परतत आहे हें पाहून त्यास वाटेंत वेढलें. हें ऐकून युसुफखानादि सर्व सरदार धांवून आले. कासिमखानानें युसुफला पराजित करण्याची वेळ आणली होती. परंतु मलिक कुत्ब उल्मुल्कनें त्या वेळीं बाजू सांवरली व कासिम बरिदास पळवून लावलें. तो आवशाच्या किल्ल्यांत जाऊन राहिला. नंतर युसुफखानादि सरदारांनीं महमुदशाहास पुन्हां तख्तनशीन केलें.

हि. ९१० (१४ जून १५०४ ते ३ जून १५०५ इ. स. ).— कासिम बरिद वारला. तेव्हां अमीर बरिदानें महमुदशाहास पुन्हां बाहुलें करून त्रास देण्यास आरंभ केला. याच वेळीं युसुफखानानें दस्तुर दिनारास ठार करून त्याचा मुलुख घेतला. पुन्हां शिया पंथाप्रमाणें खुत्बाहि वाचविला. हें पाहून अमीर बरिदानें महमुदशाहाच्या नांवें जानेवारीफेब्रुवारींत खलिते रवाना केले. कुत्ब उल्मुल्क, इमाद उल्मुल्क व खुदावंदखान युसुफखानाचे विरुद्ध मोहिमेंत मदतीस आले. परंतु ही मोहिम म्हणजे युसुफखानाचा नाश करून अमीर बरिदानें तें राज्य गिळंकृत करण्याचा व स्वतः सामर्थ्यवान् होण्याचा प्रयत्न आहे असें इमादनें भासविलें. तेव्हां कुत्ब उल्मुल्क व मलिक अहमद बहिरी हे महमुदशाहाचा निरोप न घेतांच एका रात्रीं ससैन्य निघून गेले. इमादनें महमुदशाहाचीहि समजूत घातली व युसुफखानास माफी देवविली.[५१]

हि. ९११ ( ४ जून १५०५ ते २३ मे १५०६ इ. स. ).— महमुदशाहानें पुन्हां सर्व मांडलीक सरदारांना बोलावून विजयानगरावर स्वारी केली. देवली (Dewly) येथें लढाई झाली. मलिक कुत्ब उल्मुल्कनें डावी फळी फोडली. परंतु महमुदशाहा मधल्या फळींत घोड्यावरून खालीं पडतांच तुडविला गेला. तेव्हां महमुदशाहाचें सैन्य माघारें फिरलें.

---

५०. ब्रि. फे. आ. पु. ३, पृ. २२–९ व बुर्हातिन-इ-सलातिन, पृ. ३४.
५१. ब्रि. फे. ब. पु. २, पृ. ३४८-९.

हि. ९१६ (१० एप्रिल १५१० ते ३० मार्च १५११ इ. स.).— युसुफखान वारलों.[५२] त्यामुळें दक्षिणेंतील सर्व कर्ते मुसलमानी शाहा नाहींसे झाले. इस्मायल आदिलशाहानें कुत्ब उल्मुल्कशीं प्रथम मैत्रीच संपादिली.

हि. ९१८ (१९ मार्च १५१२ ते ८ मार्च १५१३ इ. स.).— सुलतान कुलीहि आपला कारभार स्वतंत्रपणें करूं लागला. खुत्बाहि आपल्याच नांवानें वाचविला. महमुदशाहास प्रतिवर्षी खंडणीवजा खासगी मदत मात्र देत असे.[५३] मात्र हि. ९२४ (१५१८ इ. स.) पर्यंत तरी तो आपल्यास 'कुत्ब उल्मुल्क'च म्हणवीत असे. शाहा हें पद धारण केलेलें दिसत नाहीं.[५४] कदाचित् महमुदशाहा चं. ४ जिल्हेज ९२४ हि. (६ डिसेंबर १५१८) रोजीं वारल्यानंतर[५५] त्यानें शाहा म्हणविण्यास सुरुवात केली असावी.

**१२. सुलतान कुली कुत्बशाहा:**—मलिक सुलतान कुली कुत्ब उल्मुल्कनें इ. स. १५१२–३त स्वतःचे नांवानें खुत्बा वाचविल्यानंतर गोवळकोंडा हें राजधानीचें शहर केलें. गोवळकोंड्याचा किल्ला सुधारून त्याचें नांव महमुदनगर ठेवलें.

हि. ९२० (२६ फेब्रुवारी १५१४ ते १४ फेब्रुवारी १५१५ इ. स.).— अमीर बरिदाच्या लोकांस काढून लावून इस्मायल आदिलशाहानें कुलबर्ग्यांतील कांहीं मुलुख मिर्झा जहांगीर यास दिला. त्यावरून अमीर बरिदानें महमुदशाहाच्या नांवानें बुऱ्हाण निजामशाहा, कुत्ब उल्मुल्क व अल्लाउद्दिन इमादशाहाची मदत घेतली व

५२. हि. स. ९१३, ९१६ व ९२५ अशीं मृत्यूचीं वर्षे इतरत्र दिलीं आहेत. बु. स. ३७. हि. ९१० 'तारिख-इ-महमद कुत्बशाहीं'त नमूद केलें आहे तें आदिलखान दख्खनीचें आहे. ब्रि. फे. कु. पु. ३, पृ. ३५०. हि.९१६ ब्रि. फे. आ. पु. ३, पृ. ३० व ब. पु. २, पृ. ५४९ वर दिलें आहे.

५३. ब्रि. फे. ब. पु. २, पृ. ५४९.

५४. हि. ९२४ (इ. स. १५१८) त 'सुलतान कुली ऊर्फ कुत्ब उल्मुल्क यानें महमुदशाहाच्या कारकीर्दीत गोवळकोंड्याच्या किल्ल्यांतील नवी मशीद बांधली' असा शिलालेख आहे. एपि.–इंडो-मॉस्लेमिका–१९१३–४, पृ. ४८.

५५. ब्रि. फे. ब. पु. २, पृ. ५५२ व वरील नं. ५५ ची टीप पहा. 'तारीख–इ–महमद कुत्बशाहीं'त महमुदशहा चं. २४ जिल्हेज ९१२ हि. (६ मे १५०७) रोजीं वारल्याचें दिलें आहे.–ब्रि. फे. कु. पु.३, पृ. ३५१. त्याचप्रमाणें हदिकत-अल-अल्म (लि.) पृ. २९ व बुऱ्हान-इ-मासिरांतहि हीच तारीख दिली आहे.—किंगचा बहामनी राज्याचा इतिहास, पृ. १४७. परंतु तें चुकीचें दिसतें.

ते सर्व इस्मायल आदिलशाहावर चालून गेले. त्यांचा इस्मायल आदिलशाहानें अल्लापूर येथें पूर्ण पराभव केला. तेव्हां अमीर बरिदादि महमुदशाहास मागें सोडून पळून गेले. महमुदशाहा कैद झाला[५६].

हि. ९२४ ( १३ जानेवारी १५१८ ते २ जानेवारी १५१९ इ. स.).— इ. स. १५१८च्या अखेरपर्यंत सुल्तान कुली स्वतंत्र शाहा म्हणवून घेत नसे[५७]. याला दोन मुख्य कारणें होतीं. सुल्तान कुली येथपर्यंत फक्त तरफदार होता व कासिम बरिद महमुदशाहाच्या नांवानें कारभार पाहात असल्यानें त्याच्या मृत्यूपर्यंत सुल्तान कुलीला त्याच्या हुकुमाप्रमाणें वागणें भाग होतें. तो वारल्यानंतर सुल्तान कुलीनें स्वतंत्र होण्याची प्रथम खटपट केली व महमुदशाहा वारल्यानंतर त्याला स्वतंत्र शाहा होतां आलें. तेलंगणांतील कुत्ब उल्मुल्ककडील मुलूख थोडा व त्यांत आदिलशाहा व निजामशाहासारखीं कर्तृत्ववान माणसें असल्यानें त्याला यापूर्वी स्वतंत्र होणें शक्य नव्हतें. मात्र त्यानें या अवधींत गोवळकोंड्याची डागडुजी करून राजधानी सुधारली.

[ हि. ९२५[५८] ( ३ जानेवारी १५१९ ते २१ डिसेंबर १५१९ इ.स.)].— वेंकटी नायकानें तेलंगणांतील कांहीं मुलुखांत लुटालूट केली. कुत्बशाहानें चालून जाऊन राजकोंड्यास वेढा घातला. शेवटीं वेंकटी नायक कैद झाला व किल्ला कुत्बशाहाच्या स्वाधीन झाला.

[ हि. ९२६ ( २२ डिसेंबर १५१९ ते १२ डिसेंबर १५२० इ.स. )].— कुत्बशाहानें देवरकोंड्यास[५९] वेढा घालून तो बरेच दिवस झगडून घेतला. हिंदु देवळांची व इमारतींची जाळपोळ केली व त्या जागीं मशिदी बांधल्या. हें ऐकून कृष्णदेवरायानें

---

५६. ब्रि. फे. ब. पु. २, पृ. ५४९–५०, ब्रि. फे. आ. पु. ३, पृ. ४६–७. याच लढाईत महलोजी घोरपडे पडले. त्याबद्दलचें आदिलशाही फर्मान ९२८ हि.चें, पृ. २६, परिशिष्ट अ, मुधोळ संस्थानच्या घोरपडे घराण्याचा इतिहास.

५७. मागील टीप नं. ५४ पहा. त्याचे थडग्यावरील शिलालेखांतहि फक्त 'सुलतान कुली कुत्ब उल्मुल्क ऊर्फ बडे मालिक' असेंच म्हटलें आहे. ए. इं. मॉ. १९०७–८, पृ. २४ व १९१५–६, पृ. २७. परंतु कदाचित् ही जमशीदचीहि कारवाई असूं शकेल.

५८. सुलतान कुलीच्या हकीकतींत सनांचा निर्देश नाहीं. परंतु जेथें जेथें अदमासानें वर्ष दिलें आहे तेथें तेथें तें चौकोनी कंसांत दिलें आहे. त्यास आधार नाहीं.

५९. देवरकोंडा – हैद्राबादेच्या आग्नेयेस ६० मैल, नलगोंड जिल्हा, निजाम संस्थान.

आदिलशाहाविरुद्ध आणलेल्या सैन्यापैकीं कांहीं भाग (रायचूरच्या[६०] पडावानंतर —हि. ९२७, १५२१ इ. स.) कुत्बशाहावर पाठविला. पानगळ[६१] येथें लढाई झाली. प्रथम कृष्णदेवरायाची चांगलीच सरशी झाली. परंतु कुत्बशाहाच्या राखीव सैन्यानें रात्रीं अचानक हल्ला चढवून हिंदु सैन्याची दाणादाण उडविली. तेव्हां विजयानगरचें सैन्य किल्ल्याच्या आश्रयास गेलें. दुसऱ्या दिवशीं कुत्बशाहानें किल्ल्यास वेढा दिला. कृष्णदेवरायाकडील आणखी कुमक आली. दोन महिनेपर्यंत वेढा चालू होता. शेवटीं किल्ला कुत्बशाहाच्या स्वाधीन झाला. तेव्हां कुत्बशाहानें गणपुऱ्यावर हल्ले चढवून गणपुरा घेतल्यानंतर कोइलकोंड्यास[६२] वेढा घातला. हाहि घेण्यास बराच विलंब लागला. शेवटीं कुत्बशाहा परत गोवळकोंड्यास आला.

[हि. ९२८ (१५२२ इ. स.)].—कुत्बशाहा कोइलकोंड्याच्या वेढ्यांत गुंतला असतां सुलतान कोवाम उल्मुल्कनें एल्गुंडल (Elgundel) व मलंगूर (Mulungoor) व इतर कांहीं कुत्बशाहाचे किल्ले घेतले. सुलतान कुलीनें गोवळकोंड्यास आल्यानंतर कोवामास मुलुख परत देण्याविषयीं व इस्लामियाशीं न भांडण्याबद्दल लिहिलें. परंतु त्याचा उपयोग झाला नाहीं. उलट त्यानें पुन्हां मुलुख घेण्यास सुरुवात केली. तेव्हां सुलतान कुली त्याचेवर चालून गेला. त्यांची एल्गुंडल-जवळ गांठ पडली. दुसऱ्या दिवशीं लढाई झाली. कोवामचा पराभव झाला. तो अल्लाउद्दिन इमादशाहाच्या आश्रयास पळून गेला. नंतर कुत्बशाहानें एल्गुंडल, मलंगूर वगैरे किल्ले परत घेऊन गोवळकोंड्यास आला.

[हि. ९२९ (१५२३ इ. स.)].—कोवाम इमादच्या मदतीनें पुन्हां सांवरासावर करूं लागला. तेव्हां इमादला कुत्बशाहानें कळविलें कीं, त्याला मदत करूं नये व इमादनें घेतलेला तेलंगणांतील सप्त तपाचा प्रांत परत करावा. इमादनें कुत्बशाहाची अवहेलना करूनच उत्तर लिहिलें. तेव्हां कुत्बशाहास राग आला. कुत्बशाहा त्याचेवर चालून गेला. इमादहि तोंड देण्यास एलिचपुरावरून[६३] रामगिरास आला. येथें लढाई झाली. कुत्बशाहाचा पुरा मोड झाला. परंतु येथेंहि कुत्बशाहाच्या

६०. रायचूर कृष्णदेवरायानें इ. स. १५२०त घेतला.—ए फरगॉटन एंपायर, सिवेलकृत, पृ. १४७.

६१. पानगळ—हैद्राबादेच्या पूर्वेस ६० मैल, नलगोंड जिल्हा, निजाम संस्थान.

६२. कोइलकोंडा—हैद्राबादेच्या नैऋत्येस ५५ मैल, महबुबनगर जिल्हा, निजाम संस्थान.

६३. एलिचपूर—नागपूरचे पश्चिमेस १०५ मैल, अमरावती जिल्हा, वऱ्हाड.

राखीव सैन्यानें शत्रूची फळी फोडली. त्यामुळें शत्रुसैन्याची दाणादाण उडाली व इमाद परत राजधानीस गेला व कुत्बशाहा गोवळकोंड्यास आला.

[ हि. ९३० ( १५२४ इ. स. ) ].—खमामेटच्या[६४] राजानें कुत्बशाहाचा कांहीं मुलूख काबीज केला. म्हणून कुत्बशाहा त्याचेवर चालून गेला व बेलमकोंड्यास[६५] वेढा घातला. पुष्कळ दिवस किल्ला झुंझविला गेला. सरतेशेवटीं तो घेतला. फार नुकसान झालें व बरेच सरदारहि कामास आले. परंतु किल्ला कुत्बशाहानें घेतलेला पहातांच सीतापती खासाच कुत्बशाहावर चालून गेला. त्यांत सीतापतीस माघार घ्यावी लागली. कुत्बशाहाहि त्याचा पाठलाग न करितां गोवळकोंड्यास परत आला.

[ हि. ९३१ ( २९ आक्टोबर १५२४ ते १७ आक्टोबर १५२५ इ. स. ).—सीतापतीनें कोंडपल्ली[६६], इंद्रकोंडा, वरपल्ली, एतगीर वगैरे ठिकाणच्या सरदारांचें साहाय्य घेतलें व पुन्हां कुत्बशाही मुलुखांत शिरला. खमामेटजवळ लढाई झाली. सीतापतीचा पराभव झाला. तो रामचंद्रदेवाकडे पळून गेला. कुत्बशाहानें सैन्य कोंडपल्ली, इंद्रकोंडा व एतगीर या प्रांतांत शिरलें. कुत्बशाहानें खमामेटास वेढा दिला. कुत्बशाही सैन्यानें निकराचे हल्ले केले. पुष्कळ सरदार पडले. शेवटीं तो किल्ला सर केला. फार मोठी कत्तल केली. परंतु सीतापतीच्या विनंतीवरून ओरिसाच्या गजपती रामचंद्रदेवानें सीतापती विद्याद्री व हरिश्चंद्र यांसह चालून येऊन गोदावरीतीरावरील पालंचिनूरजवळ लढाई दिली. त्यांत रामचंद्रदेव कैद झाला. त्याचा पुतण्या विद्याद्री मारला गेला. या यशानंतर कुत्बशाहा कोंडपल्लीस[६७] गेला. तो किल्ला घेतला. येल्लूरहि[६८] घेतलें. राजमहेंद्रीजवळ[६९] लढाई झाली. तींतहि

६४. खमामेट.—हैद्राबादेच्या पूर्वेस ११० मैल, वारंगळ जिल्हा, निजाम संस्थान.

६५. बेलमकोंडा—खमामेटच्या दक्षिणेस ५० मैल, गुंतुर जिल्हा, मद्रास.

६६. कोंडपल्ली—बेलमकोंड्याच्या पूर्वेस २२ मैल, कृष्णा जिल्हा, मद्रास.

६७. कोंडपल्ली व आसपासचा प्रांत इ. स. १५२३पर्यंत विजयानगरच्या मांडलिकाकडे असल्याबद्दल शिलालेखांतून उल्लेख आढळतात. उलट इ. स. १५२४ च्या उत्तरार्धांत कोंडपल्ली व बेझवाडा या प्रांतांतील कांहीं गांवें ' मलिक-कुत्ब-उल्मुल्कनें ख्वाजा खिझरच्या स्मरणार्थ धर्मादाय' दिलेलीं आढळतात. यावरून ही मोहिम इ. स. १५२४च्या सुमाराची असावी.—( V. R. ii, Kistna 104; 153 of 1913 )—सिवेलचा ' हिंदुस्थानांतील ऐतिहासिक शिलालेख ', पृ. २४३.

६८. एल्लोर—खमामेटच्या आग्नेयेस ६५ मैल, गोदावरी जिल्हा, मद्रास.

६९. राजमहेंद्री—एल्लोरच्या ईशान्येस ५० मैल, गोदावरी जिल्हा, मद्रास.

गजपतीच्या सैन्याचा पराभव झाला. नंतर गजपती वैजनाथानें कुत्बशाहाशीं तह केला. त्यांत कुत्बशाहाच्या व गजपतीच्या राज्यांची सीमा गोदावरी ठरली. येल्लूर प्रांत कुत्बशाहास मिळाला. नंतर सुलतान कुली कुत्बशाहा गोवळकोंड्यास आला.

हि ९३३[७१] (१५२६ इ. स.).—बाबरशाहाकडे कुत्बशाहानेंहि आपला वकील त्याच्या अभिनंदनार्थ पाठविला.

[हि. ९३३ ते ९३६ (८ आक्टोबर १५२६ ते २४ आगस्ट १५३० इ. स.)].— कुत्बशाहानें घेतलेले कोंडपल्ली, बेलमकोंडा वगैरे किल्ले कृष्णदेवरायानें काबीज केले, हें समजतांच कुत्बशाहा स्वारीवर निघाला. कोंडविडास[७२] वेढा दिला. परंतु बेलमकोंडा व इंद्रकोंडा वगैरे ठिकाणांहून कुत्बशाही सैन्यावर हल्ले होऊं लागले. तेव्हां कोंडविड सर करणें कुत्बशाहास बरेंच कठीण वाटूं लागलें. शेवटीं त्यानें नाइलाजानें कोंडविडचा वेढा उठविला व बेलमकोंड्यास जाऊन त्याला वेढा दिला. तेथेंहि त्याला यश येईना. पुष्कळ सैन्य व सरदार कामास आले. शेवटीं एकदां निकरचा हल्ला चढविला. त्यांत त्याला यश आलें व किल्ला स्वाधीन झाला. तेथून तो कोंडपल्लीवर चालून गेला. येथें कुत्बशाहास मदत देणाऱ्या कांहीं नायकवाडींनीं बंड केलें. परंतु चार महिन्यांनीं हें बंड मोडलें.

कृष्णदेवरायानें कुमक पाठविली. ती येऊन पोहोंचली. या सैन्यानें बेलमकोंड्यास वेढा घातला. गड हातीं येणार तोंच सुलतान कुली कोंडपल्लीहून किल्ल्याचे मदतीस आला. वेढा उठविला व पुन्हां कोंडपल्लीस गेला. किल्ला घेतला.

हे तीनहि किल्ले शत्रूचे स्वाधीन झालेले ऐकतांच कृष्णदेवरायानें शिवरायास पाठविलें. हें सैन्य कोंडविडाजवळ येतांच सुलतान कुलीनें कोंडविड किल्ल्याची नासधूस केली. किल्ला सोडून गेला व कृष्णेवर मुक्काम केला. शिवरायानें किल्ल्याची डागडुजी केली. कुत्बशाहावर चालून गेला. सुलतान कुलीनें शिवरायाच्या सैन्यावर अचानक छापा घातला. शिवराय कोंडविडाच्या आश्रयास आला. कुत्बशाहानें कोंडविडास वेढा दिला. शेवटीं बरेच दिवसांनीं शिवरायांनीं किल्ला

---

७०. राजमहेंद्रीची लढाई व हा तह इ. स. १५४० त झाला असावा असें कांहीं ग्रंथकाराचें म्हणणें आहे. हिं. ऐ. शि.—सिवेलकृत, पृ. २४८.

७१. ब्रि. फे. ब. पु. २, पृ. ५५८.

७२. कोंडविड – हैद्राबादेच्या आग्नेयेस १४० मैल, गुंतुर जिल्हा, मद्रास.

सोडून[73] विजयानगरास प्रयाण केलें. मुलतान कुलीही दोनतीन वर्षांची स्वारी संपवून परत गोवळकोंड्यास आला.

हि. ९३६ (५ सप्टेंबर १५२९ ते २४ आगस्ट १५३० इ. स.).—सुल्तान कुलीनें अमीर बरिदाच्या मदतीस ४००० घोडेस्वार पाठविले. असद-खाननें त्यांचा पुरा मोड केला.[74]

हि. ९३९–९४१ (३ आगस्ट १५३२ ते १ जुलै १५३५ इ. स.).—इस्मायल आदिलशाहा, अमीर बरिद व अच्युतराव यांनीं हि. स. ९३८त[75] तह केला. त्याअन्वयें हि. ९४०त आदिलशाहानें तेलंगणावर स्वारी केली. कोइलकोंड्यास वेढा घातला. तेथील किल्लेदार जाफर बेग यानें तो एक महिनापर्यंत लढविला व कुत्बशाहाकडे मदतीसाठीं लिहिलें. कुत्बशाहाला आदिलशाहानें काढलेलें हें भांडण समजतांच त्यानें निजामशाहाची मदत मागितली. ती त्यांनीं कबूल केली. परंतु ती येऊन पोहोंचली नाहीं. ऐन उल्मुल्क, फत्तेखान व हैदरखान यांस घेऊन सुल्तान कुली आदिलशाहावर चालून गेला. कोइलकोंड्याजवळ चार दिवस लढाई झाली. परंतु दरम्यान आदिलशाहानें आपल्या सैन्याची एक तुकडी गोवळकोंड्याची लुटालूट करण्याच्या इराद्यानें पाठविली. ही बातमी सुलतान कुलीस समजतांच त्यानें पाठलाग केला व ती तुकडी समूळ कापून काढली. कोइलकोंड्याचा वेढा चालू होताच; म्हणून कुत्बशाहा तिकडे परत जात होता, तों गणपुऱ्याजवळ मोठी निकराची लढाई झाली. तींत मुलतान कुलीच्या तोंडावर जखम झाली. त्याचें थोडेंसें नाक व गाल हीं कापलीं गेलीं. पुढें अकरा महिने वेढा चालू राहिला. दरम्यान इस्मायल आदिलशाहा आजारी झाला. त्यामुळें लढाईत शिथिलता आली. शेवटीं इस्मायल चं. १६ सफर ९४१ हि. (६ सप्टेंबर १५३४ इ. स.) रोजीं मेला. नंतर लवकरच तह झाला.[76]

७३. कृष्णदेवरायानें २३ जून १५१५त गजपतींचा पराभव करून कोंडबिड घेतला. त्यानंतर २ मे १५२०ला तो किल्ला विजयानरच्या नदेंल्प गोपाकडे असल्याचा उल्लेख आहे. उलट कोंडपल्लीच्या प्रांतांत कुत्बशाहाच्या देणग्या इ. स. १५२४ व २० मार्च १५३१च्या आहेत. त्यावरून असें दिसतें कीं, कृष्णदेवराय इ. स. १५२९च्या नववरडिसेंबरांत वारला, म्हणून शिवराय परतला व कुत्बशाहाकडे तो मुलुख आला.—सिवेलकृत हिंदुस्थानांतील ऐतिहासिक शिलालेख, पृ. २४०, २४३ व २४६.

७४. ब्रि. फे. आ. पु. ३, पृ. ५८.

७५. ब्रि. फे. नि. पु. ३, पृ. २२८, व ब्रि. फे. आ. पु. ३, पृ. ७०–७१.

७६. ब्रि. फे. आ. पु. ३, पृ. ७१, ७४ व ७५; बु-इ-स., पृ. ७२.

## सुलतान कुली कुत्बशाहा

हि. ९४० ( २३ जुलै १५३३ ते १२ जुलै १५३४ इ. स.).—बुऱ्हाण निजामशाहांविरुद्ध गुजराथच्या बहादुरशाहास चिथविल्यावरून तो परत जातांच बुऱ्हाण निजामशाहानें आदिलशहाचे सांगण्यावरून कल्याणीस[७७] वेढा घातला. परंतु आदिलशाहा मृत्यु पावतांच कुत्बशाहानें बुऱ्हाण निजामशाहाशीं तह केला.[७८]

[हि. ९४२ (२ जुलै १५३५ ते १९ जून १५३६ इ. स.)].— हें युद्ध चालू असतां अमिर बरिदानें कुत्बशाहींत बरीच लुटालूट केली होती. परंतु कांहीं दिवस कुली गोवळकोंड्यास राहिला. तयारी होतांच बेदरावर चालून गेला. बरिदाचा पराभव केला. याच वेळीं गजवील, एल्लूर व तिप्रानचे जमीनदार कुलीस येऊन मिळाले. नंतर कुत्बशाहा कोहीरवर[७९] जाऊन किल्ल्यास वेढा दिला. शेवटीं कोहीर पडला. परंतु सुलतान कुलीनें पावसाळयामुळें माघार घेण्याचें ठरवून तो परत गोवळकोंड्यास आला.

हि. ९४४ (२० जून १५३६ ते ९ जून १५३७ इ. स.).— पुन्हां कांहीं दिवस गोवळकोंड्यास विसावा घेऊन कुत्बशाहा हिंदू राजांवर स्वारी करण्याकरितां निघाला. प्रथम नलगोंड्यावर चालून गेला. वेढा घातला. हरिश्चंद्राचा भाऊ पुढें चालून आला. तो कैद केला. किल्ला हातीं येण्याचीं चिन्हें दिसेनात; तेव्हां कुलीनें हरिश्चंद्रास कळविलें कीं, जर मांडलिकत्व स्वीकारण्यास राजी असशील तर वेढा उठवितों. हरिश्चंद्रानें कबूल केलें. कुलीनें वेढा उठविला. परंतु किल्ला पाहाण्याच्या मिषानें तो किल्ल्यावर गेला व त्याच वेळीं दबा धरून बसविलेल्या सैन्याच्या साहाय्यानें लुच्चेगिरीनें हरिश्चंद्रास कैद केलें व तेथें अमानुषपणें कत्तल केली. तेथून तो कोंडविडाकडे गेला. कोंडविडचा राजा त्याला कबूल केलेली खंडणी देत नसे. तोहि हातीं आला.

हि. ९४९ (१७ एप्रिल १५४२ ते ५ एप्रिल १५४३ इ. स.).—कोहीरचा वेढा चालू असतांच इब्राहिम आदिलशाहानें तेलंगणांत लुटालूट केली होती; म्हणून कुत्बशाहा एतगीरावर चालून गेला. इतर सैन्य काकनी, गोरोवली, व नारगीवर पाठविलें. सीतापति व रामचंद्र यांची व कुत्बशाहाची लढाई चालू असतां आदिल-

---

७७. कल्याणी – बिदरच्या पश्चिमेस ३५ मैल, बिदर जिल्हा, निजाम संस्थान.
७८. ब्रि. फे. कु. पु. ३, पृ. ३२३.
७९. कोहीर – बिदरच्या दक्षिणेस २५ मैल, बिदर जिल्हा, निजाम संस्थान.

शाहानें हीं ठाणीं घेतलीं होतीं. कुत्बशाही सैन्यानें हा प्रांत परत घेतला. एतगीरचा वेढा चालूच होता. याच वेळीं अमिर बरिदाला मेदक[80] व कौलस[81] हे परत देण्याची ताकीद केली. निजामशाहाची मदत कुत्बशाहास येऊन मिळत आहे हें पाहून अमिर बरिदानें कुत्बशाहास मेदक दिला. पावसाळा लागला म्हणून कुत्बशाहानें एतगीरचा वेढा उठवला व निजामशाहाशीं मैत्रीचा तह केला.

हि. ९५० (६ एप्रिल १५४३ ते २४ मार्च १५४४ इ. स.).—याप्रमाणें सारख्या लढाया मारून कुत्बशाहा जवळ जवळ नव्वद वर्षांचा झाला. विसावा घेण्यासाठीं गोवळकोंड्यास येऊन राहिला. तो आतां बराच अशक्त झाला होता. त्यानें गोवळकोंड्यांतील मशिदी वगैरे सुधारण्याचें काम चालू केलें होतें.

सुल्तान कुली म्हातारा झाला होता व त्याचा पहिला मुलगा हैदरखान आधींच वारला होता. त्यामुळें त्यानें आपल्या दुसऱ्या मुलास म्हणजे कुतुबुद्दिनास राज्य द्यावें असा निश्चय केला होता. हें त्याचा तिसरा मुलगा जमशीद यास न साहून त्यानें अल्लाउद्दीनास मारण्याचा कट केला. हा कट उघडकीस आल्यावरून जमशीदला सुल्तान कुलीनें गोंवळकोंडा येथें कैदेंत ठेवलें. परंतु जमशीदनें त्या किल्लेदाराशींच खल्बत करून बापाचाच खून करविला व इतर भावांचा कांटा दूर केला. रविवार चं. २ जमादिलाखर ( ३ सप्टेंबर १५४३ ) रोजीं सुलतान कुली मशिदींत निमाज पढत असतां गोंवळकोंड्याचा फौजदार मीर महमुद हमदानी यानें एकाच घांवासरशीं त्याला ठार केलें.[82]

त्याला सहा मुलगे व चार मुली होत्या. पहिला हैदरखान बापापूर्वीच वारला. दुसरा कुतुबुद्दिन यास जमशीदनें बापाचा खून होतांच पकडून त्याचे डोळे काढले. तिसरा यार कुली जमशिदखान राज्यावर आला. चवथा अबदुल करीम यानें बंड केल्यावरून त्यास ठार मारण्यांत आलें. पांचवा दौलतखान यास वेडा म्हणत असत.

---

८०. मेदक – हैद्राबादेच्या उत्तरेला ४५ मैल, मेदक जिल्हा, निजाम संस्थान.

८१. कौलस – बिदरचे उत्तरेस ३० मैल, बिदर जिल्हा, निजाम संस्थान.

८२. सुलतान कुलीच्या थडग्यावरील लेखांत सोमवार चं. २ जमादिलाखर ९५० हि. अशी तारिख दिली असून त्याला कुत्ब उल्मुल्क व बडा मलिक असें संबोधलें आहे. ए. इं. मॉ. १९०७–८, पृ. २४, व १९१५–१६, पृ. २७. हादिकतमध्यें हीच तारीख घेतली आहे.

हा इब्राहीम कुत्बशाहाच्या कारकीर्दीत वारला. सहावा इब्राहीम हा बापाचा खून झाल्यानंतर विजयानगरच्या राज्यांत पळून गेला. जमशीदचा मुलगा सुभान कुलीनंतर हा राज्यावर आला.

**१३. जमशीद कुत्बशाहा :**—पहिला मुलगा हैदरखान वारल्यानंतर सुलतान कुलीनें दुसरा मुलगा कुतुबुद्दिन यास आपलें राज्य देण्याचें ठरविलें. परंतु तिसरा मुलगा यार कुली जमशीदखान यास तें न मानवून त्यानें कुतुबुद्दिनास मारण्याची खटपट आरंभिली. हें सुलतान कुलीस समजतांच त्यानें जमशीदास गोंवळकोंड्याच्या किल्ल्यांत कोंडून ठेवलें. परंतु जमशीदनें तेथील किल्लेदार मीर महमुद हमदानी याच्याशीं कट केला. नंतर मीर महमुदनें सुलतान कुलीस मारून कुतुबुद्दिन याच्या वाड्यांत शिरून त्याचे डोळे काढले व त्याला कैद केलें. नंतर जमशीदास ( ३ सप्टेंबर १५४३ रोजीं ) राज्यावर बसवून जमशीद कुत्बशाहाच्या नांवानें खुत्बाहि वाचविला.

हि. ९५० ( जमादिलाखर ते जिल्हेज—३ सप्टेंबर १५४३ ते २४ मार्च १५४४ इ. स. ).—जमशीदचा धाकटा भाऊ या वेळीं देवरकोंड्यास होता. त्याला पकडण्याचा हुकूम झालेला समजतांच तो अमीर बरिदाकडे बिदरास गेला. अमीर बरिदानें ही संधि साधून तेलंगण काबीज करण्याचा पुन्हां बेत करून तो इब्राहिमास बरोबर घेऊन चालून आला. थेट गोंवळकोंड्यापर्यंत आला व वेढा घातला. हें पाहून व अली बरिदाचा उत्कर्ष न साहून बुऱ्हाण निजामशाहा जमशीदाच्या मदतीस खासा आला. कोहीरास वेढा घालून तो घेतला व गोंवळकोंड्यास मदत पाठविली. अमीर बरिदास धीर न निघून त्यानें आदिलशाहाच्या आश्रयास जाण्याचा बेत करून माघारा फिरला. अमीर बरिदानें इब्राहिमास दगा देण्याचा विचार केला आहे हें समजतांच इब्राहिम बहुतेक सर्व सामानसुमान टाकून विजयानगरास रामराजाच्या आश्रयास गेला. जमशीद बुऱ्हाण निजामशाहास कोहीर येथें भेटला. तेथें बुऱ्हाण-निजामशाहा, इमादशाहा व कुत्बशाहा यांचा मैत्रीचा तह होऊन ते सोलापुरावर चालून गेले. परंतु आदिलशाहानें परंड्यास वेढा दिला. याचा परिणाम असा झाला कीं, बुऱ्हाण निजामशाहा सोलापुरावरून परंड्यास जाऊं लागला, तेव्हां आदिलशाहानें त्यास खासपुरीस गाठून लढाई दिली. कुत्बशाहानें मोठी शौर्याची कामगिरी केली. इब्राहिम आदिलशाहाचा पराभव झाला व तो पळून गेला. नंतर जमशीदनें अली

बरिदाचा बेदरपर्यंत पाठलाग केला. याच वेळीं आदिलशाहाचे कांकनी, कुल्बुर्गा व एतगीर हे प्रांत घेतले.[८३]

[ हि. ९५१ ( २५ मार्च १५४४ ते १४ मार्च १५४५ इ. स. )].—बुऱ्हाण निजामशाहा व आदिलशाहा यांच्यांतील लढाई चालू असतांच जमशीद परत गोंवळकोंड्यास गेला. यावरून त्याचा बुऱ्हाण निजामशाहाशीं झालेला संघ तुटलेला पाहतांच अली बरिदानें गोवळकोंड्यावर पुन्हां स्वारी केली. गोवळकोंड्याजवळील चार मैलांवरील चिलकूरास तो अचानक आलेला दिसतांच जमशीदनें घाईनें बचावार्थ राजधानी सोडली व बिदरचे बाजूकडे चालून गेला. कुमटाणा जाळून फस्त केला. तेव्हां अली बरिदानें वेढा उठविला व जमशीदावर चालून गेला. पट्टणचेरू-जवळ[८४] लढाई झाली व बहुधः पावसाळ्यामुळें दोन्हीहि सैन्यें आपापल्या राज्यांत परत गेलीं.

[ हि. ९५२ (१५ मार्च १५४५ ते ३ मार्च १५४६ इ.स.)].—जमशीदनें सैन्याची वगैरे पुन्हां जमवाजमव करून अली बरिदाच्या समाचारार्थ ( सप्टेंबर १५४५च्या सुमारास ) निघाला. कौलसला पोहोंचल्यावर त्यानें आपल्या सैन्यास लुटालूट करण्यास रवाना केलें. अली बरिदहि चालून आला. तेव्हां जमशीदनें नारायणखेड येथें लढाई दिली. अली बरिदाची चढाईच होत गेली. इतक्यांत कौल्सची डागडुजी पुरी झाल्याचें वृत्त जमशीदास समजतांच जमशीद कौलसच्या आश्रयास परतला. अली बरिदानें जमशीदचें सैन्य लूटून फस्त केलें. परंतु त्यानें जमशीदचा पाठलाग न करितां तो परत बिदरास गेला. बहुधः या वेळीं बुऱ्हाण निजामशाहाशीं केलेला तह त्यानें मोडल्यावरून व आदिलशाहा व बुऱ्हाण निजामशाहा यांचा मैत्रीचा तह झाल्यामुळें[८५] हा परतला असावा. हें पाहून जमशीदनें कौल्स, नारायणखेडा व अहसनाबाद काबीज करून तीं जगदेवरावाच्या हवालीं केलीं. बुऱ्हाण निजामशाहा व आदिलशाहा यांचा तह होतांच आदिलशहानें आसदखानास जमशीदवर पाठविलें. आसदखानानें प्रथम काकनीस वेढा घालून तो तीन

---

८३. ब्रि. फे. आ. पु. ३, पृ. ९३, बु. इ. मा. हेगचें भाषांतर, इंडियन अँटिकेरी, व्हॉ. XLIX-१९२० पृ. २२२-२४.

८४. पट्टणचेरू – हैद्राबादेच्या उत्तरेस १५ मैल, मेदक जिल्हा, निजाम संस्थान.

८५. बुऱ्हान-इ-मासिर–हेगचें भाषांतर, इं. अं., व्हॉ. L–१९२१, पृ. २–३.

महिन्यांनीं घेतला. जमशीदनें नवीन बांधलेला किल्ला ज़र्मानदोस्त केला. एतगीरास[86] घातलेला वेढाहि उठविला व जमशीदचा थेट गोंवळकोंड्यापर्यंत पाठलाग केला. येथें लढाई झाली. त्यांत जमशीदचा पूर्ण पराभव झाला[87]. बहुधः पावसाळा लागतांच आसदखान परतला असावा.

हि. ९५३ (४ मार्च १५४६ ते २१ फेब्रुवारी १५४७ इ. स.).—जमशीदनें बुऱ्हाण निजामशाहाकडे मदत मागितली. निजामशाहा व इमादशाहा आवसा व उदगीरवर चालून आले. जमशीदहि तेथें गेला. आवशाचा वेढा चालू असतांच जमशीदनें मेदकचा किल्ला घेण्याचें ठरलें. त्याप्रमाणें तो तिकडे गेला. मेदकचा किल्ला बरेच दिवस लढून घेतला. आवसा व उदगीरहि निजामशाहानें घेतलें.[88] तेव्हां अली बरिदनें आदिलशाहाची मदत मागितली. हें जोड सैन्य जमशीदवर कोलसला चालून आलें. तेव्हां जमशीदनें नारायणखेडा येथें लढाई दिली. त्यांत अली बरिदाचा शेवटीं पराभव झाला. बहुधः पावसाळ्याच्या सुमारास जमशीद गोंवळकोंड्यास परत आला.

हि. ९५४ (२१ फेब्रुवारी १५४७ ते १० फेब्रुवारी १५४८ इ. स.).—अली बरिदाचा हा नेहमीं होणारा उपद्रव दूर करण्याकरितां जमशीदनें आदिलशाहास मिळवून घेण्याचा प्रयत्न केला व त्याला यश येऊन आदिलशाहानें रामराजाबर व निजामशाहा संघानें अली बरिदावर स्वारी करण्याचें ठरलें. निजामशाहानें व जमशीदनें बराच मुलूख घेतला. तेव्हां अली बरिद आदिलशाहाच्या आश्रयास गेला. तेथें त्यास ज़मशीदच्या सांगण्यावरून कैद केला.[89]

हि. ९५५ (११ फेब्रुवारी १५४८ ते २९ जानेवारी १५४९ इ. स.).—इब्राहीम आदिलशाहानें दक्षिणेंतील हिंदु राज्यांतील बराच मुलुख काबीज केला. हें बुऱ्हाण निजामशाहाला न रुचून त्यानें सोलापुरावर हल्ला चढविला. तेव्हां

---

८६. एतगीर - यादगिर अथवा यादगिरी - विजापूरच्या पश्चिमेस ९५ मैल, गुलबर्गा जिल्हा, निजाम संस्थान.

८७. ब्रि. फे. आ. पु. ३, पृ. ९४. चं. १ रज्जब ९५३ हि. (२८ आगस्ट १५४६)च्या यादगीर येथील शिलालेखावरून यादगिर यापूर्वीच इब्राहीम आदिलशाहाकडे आलेला दिसतो. ए. इं. मॉ., १९२९-१९३०, पृ. ३.

८८. बुऱ्हान-इ-मासिर, हेगचें भाषांतर, इं. अँ., व्हॉ. L—१९२१, पृ. ३—४.

८९. ब्रि. फे. नि. पु. ३, पृ. २३२; व ह-अ-अ. (लि.) पृ. १००.

दोघांनींहि जमशीदची मदत मागितली. जमशीद सोलापुराकडे चालून गेला. कोणास मिळावें तें न मिळतां कांहीं दिवस तसेंच तेथें त्यानें त्रयस्थपणें काढले. नंतर आदिलशाहास निरोप पाठवून अली बरिदाची मुक्तता करून त्यास आपल्या ताब्यांत देणें वगैरे अटी कळविल्या. आदिलशाहानें त्या मान्य केल्या. अली बरीद हातीं येतांच जमशीदनें मला कोणासच कोणाविरुद्ध मदत करणें इष्ट नाहीं असें सांगून अली बरिदाला बिदरचे राज्यावर पुन्हां स्थापला. अली बरिदानेंहि त्याला पुष्कळ जड-जवाहीर वगैरे नजर केलें. नंतर जमशीद गोवळकोंड्यास परत आला.

हि. ९५६ व हि. ९५७ ( ३० जानेवारी १५४९ ते ८ जानेवारी १५५१ इ. स. ).—जमशीद दोन वर्षे आजारीच होता. हा हि. ९५७च्या सुरुवातीस वारला.[९१] बहुतकरून अली बरिदाची त्याच्या राज्यावर स्थापना करून जमशीद इ. स. १५४८च्या पावसाळ्यापूर्वी गोवळकोंड्यास आला व त्या वेळेपासून तो आजारीच असावा. त्यानंतर तो इ. स. १५५० च्या जानेवारी–मार्चांत वारला असावा.[९२]

१४. **सुभान कुली कुत्बशाहा**:—जमशीद कुत्बशाहाच्या मृत्यूनंतर त्याच्या बेगमेनें आपला मुलगा सुभान यास इतर सरदारांच्या साहाय्यानें गादीवर बसविलें. सुभान हा या वेळीं अवघा सात[९३] वर्षांचा होता. म्हणून राणीनें सैफखान

---

९०. सोलापूरचा वेढा इ. स. १५४९ नंतरचा असावा असें कांहीं इतिहास-कारांचें म्हणणें दिसतें. बुऱ्हाण-इ-मासिरींत हि. ९५४ त बुऱ्हाणशाहा वेढा घालण्यास निघाला व नंतर कल्याणीचा वेढा घातला असें वर्णन केलें आहे. ही दोनतीन वर्षांची मोहीम आहे. फेरिस्तानें कल्याणीचा वेढा हि. ९५६ त दिला आहे. बु. इ. मा., कॅ. हेगचें भाषांतर, इं. अँ., व्हॉ. L–१९२१, पृ. ५–७; ब्रि. फे. आ. पु. २, पृ. १०२; व नि. पु. २, पृ. २३२-४. जमशीदचा २ वर्षांचा आजार व त्याच्या मध्यस्थीचा विचार करितां सोलापूरचा वेढा इ. स. १५४८ च्या सुरुवातीस पडला असावा. सोलापूरच्या वेढ्याचे प्रसंग अनेकवार आल्यानें हें मतवैचित्र्य दृष्टीस पडतें.

९१. ब्रि. फे. कु. पु. ३, पृ. ३२७.

९२. इब्राहीम कुत्बशाहा २७ जुलै १५५० रोजीं तुख्तनशीन झाला. यापूर्वी ४–५ महिने जमशीद वारला असला पाहिजे.

९३. सुभान या वेळीं २ वर्षांचा होता असें फेरिस्ता म्हणतो. ब्रि. फे. कु. पु. ३, पृ. ३२९.

ऐन उल्मुल्कास परत बोलाविलें व त्याजकडे कारभार सोंपविला. जगदेवराव या वेळीं मोठ्या तोलाचा सरदार होता. त्यानें जमशीदचा धाकटा भाऊ दौलतखान यास तख्तावर आणण्याचा बेत ठरविला. भोंगिरास जाऊन शेजारील नायकवाडीस त्यानें मिळवून दौलतखानाची मुक्तता केली. इतक्यांत गोंवळकोंड्यास सैफखान आला व त्यानें कारभार आपलेकडे घेऊन तो जगदेवरावावर चालून गेला. जगदेवरावानें वऱ्हाडच्या तोफलखानाची मदत मागितली. तोफलखान मदतीस आला. परंतु सैफखानाचें व त्याचें सिंग्रामास युद्ध झालें. त्यांत त्याचा पराभव झाला. जगदेवराव दौलतखानास घेऊन भोंगीरच्या किल्ल्यांत जाऊन बसला. बरेच दिवसांनीं सैफखानानें किल्ला घेतला. दौलतखानास पुन्हां तेथेंच कैदेंत ठेवलें व जगदेवरावास गोंवळकोंड्यास आणलें.

बरेच सरदार सैफखानाच्या विरुद्ध होते. त्यांनीं इब्राहीमखानास राज्यावर आणण्याची खटपट केली. इब्राहिमानें रामराजाच्या सल्ल्यानें कुत्बशाहीचे तख्तावर येण्याची तयारी केली. तो प्रथम पानगलास आला. तेथें कुत्बशाहींतील बरेच सरदार व सैन्य येऊन मिळालें. तेथून त्याला कोइलकोंड्याच्या नाइकवाडींनीं बोलाविलें. तेव्हां इब्राहीम कोइलकोंड्यास गेला व तेथें कांहीं दिवस मुक्काम केला. येथें दोन महिन्यांत त्याला पुष्कळच सैन्य व सरदार मिळाले. सैफखानानेंहि तयारी करून तो इब्राहीमचा मोड करण्यास आला. गणपुऱ्यापर्यंत त्याची स्वारी येऊन ठेपली. परंतु मध्यंतरीं कोइलकोंड्याच्या नायकवाडीनें गोंवळकोंड्याच्या नायकवाडींचा फितुर करून जगदेवरावास सोडविलें. गोंवळकोंड्याचा मुख्य फौजदार जगतराव यास कैद केलें. सुभानकुलीकडील सरदारांस ठार मारलें व गोंवळकोंडा जगदेवरावच्या ताब्यांत जातांच त्यानें इब्राहिमास तावडतोब बोलाविलें. हें पाहून सैफखान घाबरला. त्यानें इब्राहिमनें माफी केल्याचें पत्र मागितलें. परंतु, तें त्यानें देण्यांत दिरंगाई केल्यावरून सैफखान घेतां येईल ती मालमत्ता व सैन्य घेऊन कौलसवरून सरहद्दीवर जाऊन राहिला. इब्राहीम गोंवळकोंड्यास आला. तेव्हां जगदेवरावानें त्याचे हातीं किल्ला देऊन त्यास सोमवार चं. १२ रजब हि. ९५७ ( २७ जुलै १५५० इ. स. ) रोजीं महमुदनगरास तख्तनशीन केलें.

१५. इब्राहीम कुत्बशाहा:—इब्राहीम कुली हि. ९३६च्या सव्वाल महिन्यांत ( जून १५३० इ. स. ) जन्मला. इ. स. १५४३च्या अखेरीस त्याला

रामराजाच्या आश्रयास विजयानगरास जाऊन रहावें लागलें. तेथें त्याचें व मलिक ऐन उल्मुल्क गिलनीचें वाटेवरून भांडण झालें. प्रकरण हातघाईवर आलें व शेवटीं इब्राहीम बळजबरीनें वाट काढून निघून गेला. नंतर इ. स. १५५० च्या मार्चच्या सुमारास विजयानगराहून निघून नायकवाडी व जगदेवराव यांच्या साहाय्यानें ता. २७ जुलै १५५० रोजीं तख्तावर आला. प्रथम त्यानें आपला राज्यकारभार पहाण्यांतच कांहीं दिवस घालविले. जगदेवरावाचे उपकार स्मरून त्यास मुख्य वजिरीपर्यंत चढविलें. परंतु जगदेवराव व त्याचा सहकारी रायराव यांच्या मनांतून वेडया दौलतखानास तख्तावर आणण्याचा बेत असल्यामुळें इब्राहीम कुत्बशाहानें रायरावास कैद करून ठार मारलें. तेव्हां जगदेवराव आपल्या भावांसह मुलूख उध्वस्त करीत करीत एलगुंडलवरून वऱ्हाडांत गेला व इमादशाहाच्या नोकरीस राहिला. तेथें जगदेवरावानें खानदेश वगैरे प्रांत इमादशाहास मिळवून दिला. परंतु तेथेंहि त्यास त्याच्या आकांक्षेप्रमाणें वागण्यास न मिळाल्यामुळें तो तेथून इ. स. १५५८च्या सुमारास निघाला.

हि. ९६५ ( २४ आक्टोबर १५५७ ते १३ आक्टोबर १५५८ इ. स.).—बुऱ्हाण निजामशाहा चं. २४ मोहरम ९६१ हि. ( ३० दिसेंबर १५५३ इ. स.) रोजीं वारलों[१४] व हुसेन निजामशाहा गादीवर आला. तेव्हां इब्राहीम कुत्बशाहानें मुस्तफाखानास त्याच्या अभिनंदनार्थ पाठविलें होतें. हा निजामशाहाचा वजीर कासिम बेग शिराझी यास बरोबर घेऊन आला. यांनीं कुत्बशाहा व निजामशाहा यांचा तह घडवून आणला. त्यांत त्या दोघांनीं मिळून बिदर व कुलबर्गा घेण्यासाठीं प्रथम कुलबर्ग्यास एकत्र व्हावें असें ठरलें. ठरल्याप्रमाणें ते कुलबर्ग्यास आले व वेढा घातला. दोन महिने निकरानें हल्ले चढविले. परंतु किल्ला हातीं आला नाहीं. किल्ला लढविणें कठीण वाटतांच तेथील किल्लेदारानें इब्राहीम आदिलशाहाकडे कुमक मागितली. तेव्हां आदिलशाहानें रामराजाची मदत मागितली. रामराजा चालून आला. या वेळीं निजामशाही व कुत्बशाही सैन्यानें बिदरासहि वेढा घातला होता. परंतु रामराजानें कुत्बशाहास निजामशाहाला मदत न करण्याविषयीं लिहिल्यावरून व रामराजाचा भाऊ एल्तमराज यानें कुत्बशाहाच्या पानगळ प्रांतांत लुटालूट आरंभिल्याचें समजतांच कुत्बशाहानें निजामशाहास सोडलें व तो एकाएकीं परत गोवळकोंड्यास निघून

---

१४. बु. इ. मा., हेगवें भा., इं. अँ., व्हॉ. L–१९२१, पृ.२८.

गेला. तेव्हां निजामशाहासहि परतावें लागलें. दरम्यान इब्राहीम आदिलशाहा वारला. त्यामुळें अली आदिलशाहा, रामराजा, कुत्बशाहा व निजामशाहा यांचा भिमाकृष्णेच्या संगमावर तह झाला. नंतर प्रत्येकजण आपापल्या राजधानीस ( जून १५५८ चे पूर्वी ) परत गेले.[९५]

याच सुमारास जगदेवराव व इमाद उल्मुल्क यांच्यांत वेमनस्य आल्यानें वऱ्हाड प्रांतांत जाळपोळ करीत करीत जगदेवराव एलगंडलला आला. हें ऐकून कुत्बशाहानें मुस्तफाखानास त्याचेवर पाठविलें. खमामेटजवळ गांठ पडली. तेथें लढाई झाली. तींत जगदेवरावाचा भाऊ वेंकटराव व इतर आरब व मुसलमान सरदार पडले व जगदेवरावाचा पूर्ण पराभव झाल्यानें तो विजयानगरास पळून गेला.

हि. ९६६ ( १४ आक्टोबर १५५८ ते २ आक्टोबर १५५९ इ. स.):— भीमा व कृष्णेच्या संगमावर झालेला तह फार दिवस टिकला नाहीं. पावसाळा संपतांच बुऱ्हाण निजामशाहानें अली आदिलशाहाच्या मुलुखांत स्वारी केली. आदिलशाहानें रामराजाची मदत घेऊन तो हुसेन निजामशाहावर चालून गेला. अलीनें मागील तहान्वयें कुत्बशाहाची मदत मागितली. आदिलशाही सैन्याचा जोर पाहून नाइलाजास्तव तोहि आदिलशाही सैन्यांत कुलबर्गा येथें मिळाला. परंतु त्याचा ओढा व आंतून मदत निजामशाहासच होत होती. या जोड सैन्यानें अहमदनगरास वेढा घातला. तेव्हां निजामशाहा दौलताबादेस पळाला. दोन महिने वेढा पडला. कुत्बशाहानें पावसाळ्याच्या सबबीवर रामराजास परतण्याचा गळ घातला. अलीनें आणखी एक महिना वेढा चालूच ठेवला. परंतु शेवटीं कुत्बशाहाचा मुख्य वजीर मुस्तफाखान यानें कोंडपल्ली रामराजास देण्याचें कबूल करून वेढा उठविला. कल्याणी आदिलशाहाचे ताब्यांत दिली. निजामशाहाला या वेळीं अपमान सहन करून रामराजाचें मांडलिकत्व स्वीकारावें लागलें.[९६]

अहमदनगरचा वेढा चालू असतांच इमादशाहाच्या तोफखानानें तेलंगणांत धुमाकूळ मांडला होता. त्यावरून कुत्बशाहानें दस्तुरखानास त्याच्या पारिपत्यार्थ

---

९५. बु. इ. मा., हेगचें भा., इं. अँ., व्हॉ. L–१९२१, पृ. १०१-२; ब्रि. फे. नि. पु. ३, पृ. २३८-९, व कु. पु. ३, पृ. ३३०.

९६. ब्रि. फे. कु. पु. ३, पृ. ३३०, नि. पु. ३, पृ. २३९–४२, व आ. पु. ३, पृ. १२०-२२; बु. इ. मा., इं. अँ., व्हॉ. L–१९२१, पृ. १०५-६.

पाठविलें. त्यानें भिमकळ[९७] गांवीं लढाई दिली. तोफलखान जखमी होऊन पळून गेला.

हि. ९७० ( ३१ आगस्ट १५६२ ते २० आगस्ट १५६३ इ. स.).— निजामशाहाची व कुत्बशाहाची पुन्हां मैत्री झाली व कल्याणी घेण्याचें ठरलें. आक्टोबर १५६२च्या सुमारास कल्याणीजवळ इब्राहीम कुत्बशाहा व हुसेन निजामशाहाची वडील मुलगी बिबी जमाली यांचें लग्न झालें. नंतर त्यांनीं कल्याणीस वेढा घातला. तेव्हां आदिलशाहा, तोफलखान व रामराजा हे एकत्र होऊन चालून आले. कांहीं सैन्य तेलंगणांतील दक्षिण भाग घेण्यास पाठविलें. तेव्हां निजामशाहानें कुत्बशाहाच्या आग्रहावरून वेढा उठविला. परंतु आदिलशाही सैन्यानें त्यांचा चांगलाच पाठलाग केला. कुत्बशाहा जेमतेम निभावून गोवळकोंड्यास आला.[९८]

हि. ९७१ ( २१ आगस्ट १५६३ ते ८ आगस्ट १५६४ इ. स. ).— आदिलशाही सैन्य अहमदनगराहून परतलें तें तारपल्ली (गोवळकोंड्यापासून ३२ मैल) येथें येऊन राहिलें होतें. शिवाय यापूर्वी वेंकटाद्रि, जगदेवराव व ऐन उल्मुल्क यांनीं दक्षिण तेलंगणांत स्वारी केली होती. कुत्बशाहानें मुझाहिदखानास त्यांचेवर पाठविलें होतें. त्यांची तोरकळ येथें मारामारी चालूच होती. तारपल्लीस आल्यावर रामराजानें गोवळकोंड्याजवळील मुलुख लुटण्यास प्रारंभ केला. शिवाय कोंडाविडचा राजा सिद्धराज तिमाप्पा यास कोंडपल्ली व मच्छलीपट्टणवर व जांवई जोतमराव यास देवरकोंडा व इंद्रकोंड्यावर पाठविलें. चार महिनेपर्यंत लढाई चालू होती. शेवटीं जगदेवरावानें पानगळ, कोइलकोंडा, गणपुरा व इंद्रकोंडा हे रामराजास मिळवून दिले. सिद्धराजानें कोंडपल्ली व एलूरला वेढा दिला होता. या वेळीं कुत्बशाहाला गोवळ-कोंड्यांत अडकून राहावें लागलें होतें. सरतेशेवटीं अली बरीद व मुस्तफाखान यांनीं तह घडवून आणला व रामराजास गणपुरा व पानगळ द्यावे लागले.[९९] याप्रकारें कुत्बशाहाची दैनावस्था झाली. तेव्हां त्यानें प्रथम गोवळकोंड्याचा कोट बांधला.

---

९७. भिमकळ – भिमगळ–हैद्राबादेच्या उत्तरेस ११० मैल, निझामाबाद जिल्हा, निजाम संस्थान.

९८. बु. इ. मा., हेगचें भा., इं. अँ., व्हॉ. L–१९२१, पृ. १४१; ब्रि. फे. कु. पु. ३, पृ. ३३०–१, व नि. पु. ३, पृ.२४२–४.

९९. ब्रि. फे. आ. पु. ३, पृ. १२२–३, कु. पु. ३, पृ. ३३१, व नि. पु. ३, पृ. २४५.

जगदेवरावाच्या सांगण्यावरून काशीरावानें इंद्रकोंड्याच्या हवालदारास कैद केलें. तेव्हां मुस्तफाखान त्याच्या मदतीस गेला. मुस्तफाखानानें वेढा देऊन किल्ला घेतला व काशीरावाचा शिरच्छेद केला. मुस्तफाखान परत राजधानीस आला. नंतर सूर्यरावादि नायकवाडींनें कट करून बंड केलें. तें मोडलें व सूर्यरावादि बऱ्याच लोकांस ठार केलें.

एलूरास विद्याद्रीनें वेढा दिला होता. त्याला कुमक पाठविली व वेढा उठल्यानंतर नीरडोल्चा बंदोबस्त करण्यास आज्ञा केली. एलूरच्या हवालदारानें राजमहेंद्री घेण्याबद्दल कुत्बशाहास सांगितलें. तेव्हां कुत्बशाहानें रफतखान लारी उर्फ मलिक नायब यास स्वारीवर पाठविलें. तेव्हां नीरडोल येथें विद्याद्री, सीतापती वगैरे चालून आले. लढाई झाली. तींत उरकोंड्याचा राजा मारला गेला आणि विद्याद्री व सीतापती राजमहेंद्रीस पळून गेले. त्यांचा धौळेश्वर[९९]पर्यंत पाठलाग केला. धौळेश्वराचा किल्ला घेऊन नरसिंगरावाच्या तत्पक किल्ल्यास वेढा दिला. नरसिंगराव कैद झाला. पावसाळ्यासाठीं लारी धौळेश्वरीं राहिला. पावसाळ्यानंतर तत्पक घेतला व राजमहेंद्रीच्या मुलुखांत लारी शिरला. परंतु कुत्बशाहानें लारीस मोठ्या मोहिमेसाठीं ताबडतोब परत बोलाविलें. तेव्हां तो सैन्यासह गोवळकोंड्यास परत आला.

हि. ९७२ ( आगस्ट १५६४ ते २८ जुलै १५६५ इ. स. ).—आदिलशाही किश्वरखान व कुत्बशाही मुस्तफाखान यांनीं धर्मयुद्ध या नांवाखालीं सर्व मुसलमानी पातशाहा रामराजाविरुद्ध लढण्यासाठीं एकत्र होण्यास सिद्ध केलें. या शाहांचें सख्य व्हावें म्हणून हुसेन निजामशाहानें आपली मुलगी चांदबिबी हिला अली आदिलशाहास द्यावी व सोलापुरचा किल्ला तिला देस म्हणून द्यावा व अलीची बहीण हदिआ सुलताना मुर्तुझास करून घ्यावी असें ठरलें. नंतर रामराजाशीं वितुष्ट आणण्यासाठीं म्हणून आदिलशाहानें एतगीर, रायच्चूर वगैरे प्रांत परत मागण्याकरितां वकील पाठविला. रामराजानें त्यास नीट वागविलें नाहीं. तो परत गेला. लग्नसोहळे चालत असतां ( सप्टेंबर १५६४ इ.स.) तो जालनापुरास गेला व सर्व हकीकत निवेदन केली. तेथें लढाईवर निघण्याचा बेत कायम ठरला. अली मनापासून या कटांत सामिल झाला नव्हता. परंतु नाइलाजास्तव तो त्यांत मिळाला. बेत कायम झालेला रामराजास कळतांच त्यानें दसऱ्याच्या दरबारांत (आक्टोबर १५६४ इ.स.) या

९९. धौळेश्वरम्—कृष्णेच्या कांठावर राजमहेंद्रीच्या दक्षिणेस ५ मैल, पूर्व गोदावरी जिल्हा, मद्रास.

भावी महायुद्धाचा आपल्या मांडलिकांस इशारा दिला व लढाईची तयारी चालविली. अलीस फोडण्याचा प्रयत्न केला व अलीनेंहि आंतून रामराजासच मदत करण्याचें कबूल केलें. सोलापुरास ता. ८ जमादिलावल ( १२ डिसेंबर १५६४ इ. स. ) रोजीं सर्व पादशहांचें सैन्य गोळा झालें. ता. २० जमादिलावल ( २४ डिसेंबर १५६४ इ. स. ) रोजीं या सेनासमुहानें प्रयाणास प्रारंभ केला. या सेनेनें कृष्णाकांठीं मुक्काम केला. तेव्हां रामराजा चालून गेला. कृष्णेच्या पलीकडे राहून मुसलमानी सैन्यानें रामराजाच्या मुलुखांत धुमाकूळ घालण्यास सुरुवात केली. त्याच्या बंदोबस्तार्थ रामराजानें सैन्य पाठविलें. रक्कसगीतंगडगीजवळ[100] रामराजानें तळ दिला. नंतर लढाईस प्रारंभ झाला. तीन दिवस सारखी धुमश्चक्री उडून राहिली. निजामशाहा व कुत्बशाहानें चांगलेंच शौर्य दाखविलें. अली तटस्थ राहिला. दोन्हीहि सैन्यांतील पुष्कळच लोक जाया झाले व मारले गेले. रामराजानें चवथ्या दिवशीं पुन्हां धीर देऊन रक्कसगीतंग-डगीच्या मैदानांत आपली सेना नेऊन रणगादी स्थापून रणस्तंभ उभारला व आपली सेना सज्ज केली. नंतर पुन्हां दोन दिवस धुमश्चक्री उडाली. याच वेळीं जलालउद्दिनानें तालिकोटच्या[101] चाळीस घरांमागें जाऊन तळ दिला. तेव्हां सर्व सेना सेनापतीच्या ताब्यांत देऊन तो खासा तिकडे गेला. इकडे तिन्ही पादशाहांनीं रक्कसगीतंगडगीच्या सैन्या-वर तुटून हल्ला चढविला. तेव्हां सेनापतीनें मदत मागितली. ती रामराजानें दिली. रामराजाच्या सैन्याचा वराच नाश झाला. तेव्हां खासा रामराजानें लढाई चालविली. तीन दिवस व नऊ तासपर्यंत सारखें रण माजून राहिलें. सरते शेवटीं इस्लामी पाद-शाहांची पिच्छेहाट झाली व त्यांनीं आपली छावणी दोन कोस मागें नेली. या जयानें रामराजाचें सैन्य आनंदमग्न झालें व विसावा खात पडलें असतां आतांपर्यंत तटस्थ वृत्ति ठेवून रामराजाकडे कल ठेवलेल्या आदिलशाहानें निमाज पढत असतां इस्लामीयांचा मोड झालेला ऐकला व तो तात्काळ निघाला आणि रामराजाच्या छाव-णीवर घाला घातला. या अकस्मात् घातलेल्या छाप्यानें रामराजा पकडला गेला व त्यानें आपला शिरच्छेद आपला मानलेला मुलगा अली आदिलशाहा याच्याच हातीं व्हावा असा आग्रह धरल्यावरून अली आदिलशाहानें त्याचा शिरच्छेद केला. रामराजा[102]

१००. रक्कसगी-तंगडगी — तालिकोटच्या पूर्वेस २० मैल.

१०१. तालिकोट — विजापूरच्या दक्षिणेस ४० मैल, विजापुर जिल्हा, मुंबई.

१०२. निजामशाही इतिहासकार रामराजाला मारण्याचें श्रेय निजामशाहास देतात, तर आदिलशाही इतिहासकार अलीकडे देतात. या बाबतींत रामराजाचा नोकर रामाजी

मारला गेल्याची वातमी समजतांच इतर पातशाही सैन्य शत्रूवर तुटून पडलें व रामराजाच्या सैन्याची दाणादाण उडवली. रामराजा वैशाख शुद्ध अष्टमी, सोमवार, श्रवण नक्षत्रीं, रक्ताक्षी संवत्सरीं, गत शक १४८७ ( २३ एप्रिल १५६५ = २२ रमजान ९७२ हि. ) रोजीं मारला गेला.[१०३]

विजयानगरच्या सैन्याची दाणादाण उडतांच तें तेथून परत फिरलें. परंतु इस्लामी सैन्यानें तेथें दहा दिवस मुक्काम केला व नंतर विजयानगरास जाऊन लुटालुट केली. तेथून कुत्बशाहातर्फे मुस्तफाखान, निजामशाहातर्फे मौलाना इनायतउल्ला व आदिलशाहातर्फे किश्वरखान हे मुद्गळ व रायचूर घेण्यासाठीं रवाना झाले. ते किल्ले घेतल्यानंतर मुस्तफाखानानें किल्ल्या किश्वरखानास दिल्या. हें पाहून निजामशाहास राग आला. त्यानें कुत्बशाहास मुस्तफाखानाला ठार मारण्याबद्दल लिहिलें. कुत्बशाहानें त्याला राज्याबाहेर जाण्यास सांगितलें. तो अली आदिलशाहास जाऊन मिळाला. आदिलशाहानें त्याला मुख्य वजीर नेमलें. इस्लामी शाहांनीं विजयानगरांत सहा महिने राहून हरवलेला सर्व मुलुख परत घेतला. नंतर ते सर्व आपापल्या राजधानीस आले. परत आल्यानंतर बुधवार ७ जिल्काद ९७२ हि. ( ७ जून १५६५ इ. स. ) रोजीं हुसेन निजामशाहा मृत्यु पावला.

---

हरकारा हा समकालीन असल्यानें व त्याचा वृत्तांत फार बारीक सारीक तपशील देऊन दिलेला असल्यानें तो फार महत्त्वाचा व विश्वसनीय आहे.

१०३. रामाजी हरकाऱ्याची रामराजाची बखर, मॅकेन्झी कलेक्शन, व्हॉ. १३; बु. इ. मा., हेगचें भा., इं. अँ., व्हॉ. L–१९२१, पृ. १४३-६ व १९३; ब्रि. फे. आ. पु.३, पृ. १२४–३०, नि. पु. ३, पृ. २४६-९, व कु. पु.३, पृ. ३३०-१. बु.इ.मा.त शेवटच्या लढाईचा दिवस शुक्रवार २ जमादिलाखर हि. ९७४ दिला आहे. फेरिस्तानें नक्की दिवस दिला नाहीं. त. इ. म. कु.त शुक्रवार २२ जमादिलाखर हि. ९७२ दिला आहे. २२ जमादिलाखरास शुक्रवार नसून मंगळवार येतो म्हणून तो चुकीचा आहे व बुऱ्हाण-इ-मासिरींतील वर्षच चुकीचें आहे. उलट रामाजी हरकाऱ्यानें दिलेली तिथि, वार, शक, संवत्सर व नक्षत्र बिनचूक आहेत. शिवाय एवढीं मोठीं सैन्यें सोलापुराहून निघाल्यानंतर एकाच महिन्यांत तालिकोटला एकत्र येऊन रामराजाशीं लढाई होते हें तितकें संभवनीय दिसत नाहीं. वाटेंत आदिलशाहानें मोठी मेजवानी दिली. कृष्णाकांठीं आल्यानंतर कांहीं आठवडे लुटालुट चालू होती. लढाई ७-८ दिवस झाली. या सर्व गोष्टींचा विचार करितां मुसलमानी इतिहासकारांनीं दिलेला महिना चुकीचा दिसतो.

हि. ९७३ ( २९ जुलै १५६५ ते १८ जुलै १५६६ इ. स. ).—हुसेन निजामशाहा मेलेला समजतांच अली आदिलशाहानें पुन्हां आपापसांत भांडण्यास सुरुवात केली. निजामशाहाचा कारभारी किश्वरखानाचें व मुर्तुजाच्या आईचें न पटल्यामुळें त्यानें अली आदिलशाहास निजामशाहावर स्वारी करण्यास सांगितलें. तेव्हां आदिलशाहा चालून येऊं लागला. परंतु खोंजा हुमायुन राणीनें कुत्बशाहाकडे मदत मागितली. ही मदत येण्यापूर्वींच आदिलशाही सैन्य सरहद्दीवर आलें. मुर्तुझा निजामशाहा अहमदनगराहून वऱ्हाडांत तोफलखानाकडे गेला. तेथून मदत घेऊन कोलसला आला. नंतर त्याची व कुत्बशाही सैन्याची कौलस-कंदाहारच्यामध्यें गांठ पडली. तेथून ते विजापुरावर चालून गेले. विजापुरास वेढा घातला. परंतु आदिलशाहा कोंकणांत पळून गेला. आदिलशाहा लढाईच देईना व पावसाळ्यांत वेढाहि चालविणें कठीण म्हणून शेवटीं मुर्तुझा निजामशाहाच्या आईनें तह केला व पावसाळ्यांत हीं सैन्यें परत फिरून आपापल्या राजधानीस गेलीं.[१०४]

तालिकोट किंवा रक्कसगीतंगडगीच्या लढाईपूर्वी रफतखान लारीची राजमहेंद्रीची मोहीम थांबविली होती. ती पुन्हां चालू झाली. धौळेश्वरावर आल्यानंतर त्यानें राजमहेंद्रीकडे कूच केलें. प्रथम पेंटापूर[१०५] घेतला. राजपुंडीच्या किल्ल्यापर्यंत सीतापतीचा पाठलाग केला. जंगलांतून मोठ्या प्रयासानें वाट काढून राजपुंडीचा डोंगरी किल्ला घेतला. सीतापती राजमहेंद्रीच्या किल्ल्यांत गेला. तेव्हां राजमहेंद्रीस रफतखानानें वेढा दिला. वाटेंत कासिमकोट्याच्या विद्याद्रीनें रफतखानावर हल्ला चढविला. परंतु त्यांत त्याचा पराभव होऊन तो पळून गेला. चार महिने किल्ल्यास वेढा पडला. शेवटीं सीतापतीस व विद्याद्रीस आपल्या कुटुंबांसह विनधोक जाऊं द्यावें व यल्लु पंडितानें किल्ला रफतखानाचे ताब्यांत द्यावा असें ठरलें. नंतर किल्ला रफतखानानें ताब्यांत घेतला.[१०६]

हि. ९७४ ( १९ जुलै १५६६ ते ७ जुलै १५६७ इ. स. ).—कासिमकोट्यावर मोहीम करण्याचा रफतखानास हुकूम आला. तेव्हां तो ओरिसाच्या

---

१०४. बु. इ. मा., इं. अँ., व्हॉ. L–१९२१, पृ. १९६-७; ब्रि. फे. आ. पु. २, पृ. १३१-२, व नि. पु. ३, पृ २५१.

१०५. पेंटापूर – पेडापूर ?–राजमहेंद्रीच्या ईशान्येस २० मैल, गोदावरी जिल्हा, मद्रास.

१०६. 'तरिख-इ-महंमद कुत्बशाहीं'त अब्जद पद्धतीनें दिलेला हि. ९७९ हा सन चुकीचा दिसतो.

जंगलांतून वाट काढूं लागला. प्रथम वेंकटराजानें येऊन त्याच्यावर हल्ला चढविला. वेंकटराज पळून गेला व गोपाळपल्ली व वीरगुतम रफतखानाच्या हातीं आले. तेथून तो कासिमकोट्यावर चालून गेला. तेव्हां सर्वराज व भाईबुलंदर यांनीं येऊन तह केला. खंडणी देऊन मांडलिकत्व स्वीकारिलें. नंतर रफतखान गोपाळ ओरियारच्या मुलखांत शिरला. गोपाळ ओरिआर पळून गेला होता. प्रांत खिनतक्कार हातीं आला. तेथून विद्याद्रीच्या मुलखावर स्वारी झाली. वेलपराज चालून आला. देवपुरलचे किल्ल्याजवळ लढाई झाली. पराभव झाला. तेव्हां वेलपराज किल्ल्यांत जाऊन बसला. किल्ल्यास चार महिने वेढा दिला. वेलपराज रफतखानास शरण आला व कुत्बशाहाचें मांडलिकत्व स्वीकारलें. नंतर रफतखान चंद्रवारला गेला. त्यास वेढा घातला. किल्ला तोफांच्या साहाय्यानें घेतला. तेथें नरसिंग व सूरसिंग कैद झाले.

अली आदिलशाहानें निजामशाहाशीं गुप्त तह केला. त्यांत त्यांनीं आवशास भेटावें असें ठरलें. भेट झाली. तींत निजामशाहानें वऱ्हाडांत तोफलखानावर स्वारी करावी व आदिलशाहानें बिदर व तेलंगणांत शिरून त्यांचा मुलुख घ्यावा असें ठरलें. प्रथम ते तोफलखानावर चालून गेले. परंतु तोफलखानानें आदिलशाहास लांच देऊन गावलचा वेढा उठविण्याचा प्रयत्न केला व आदिलशाहानें किल्ल्यास वेढा घालून बसण्यापेक्षां तेलंगणांत स्वारी करणें योग्य असा सल्ला देऊन वेढा उठविला व ते दक्षिणेकडे वळले. कौलस घेण्यासाठीं निजामशाहीतर्फे एखलासखान व आदिलशाहीतर्फे ऐन उल्मुल्क रवाना झाले. परंतु वाटेंत विजापुरी कांहीं सैन्यानें निजामशाही सैन्यावरच वाटेंत हल्ला केला. त्यांत बरेच लोक पडले. त्यामुळें दोन्हीहि पातशाहांत वैमनस्य आलें व तह मोडून ते प्रथम आपापल्या राजधानीकडे गेले.[१०७]

हि. ९७५ (८ जुलै १५६७ ते २५ जून १५६८ इ. स.).—निजामशाहा व कुत्बशाहा यांचा मैत्रीचा तह होऊन त्यांनीं रामराजाचा भाऊ एलतमराज याजसह जाऊन आदिलशाहावर स्वारी करण्याचें ठरविलें. तिन्हीहि सैन्यें कृष्णेवर जमलीं. परंतु या वेळीं मुर्तुझाच्या आईनें एलतमराजाकडून खंडणी घेण्याचा आग्रह धरिला. कुत्बशाहानें तिची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. शेवटीं कुत्बशाहा व एलतमराज एका रात्रीं अकस्मात् आपापलीं सैन्यें घेऊन निजामशाहास सोडून गेले. निजामशाही सैन्य परतलें. अलीच्या सांगण्यावरून कुत्बशाहानें तह मोडला असावा असें समजून

---

१०७. बु. इ. मा., इं. अँ., व्हॉ. L – १९२१, पृ. १९७-८; ब्रि. फे. आ. पु. ३, पृ. १३२.

निजामशाहानें तेलंगणांतून जातांना कोइलकोंडा व गणपुरा येथें नासधूस केली. नंतर कुत्बशाहानें निजामशाही सैन्याच्या वाटेंत अडथळे आणण्याचा प्रयत्न केला व शेवटीं घोडदळ पाठवून हल्ला चढविला. त्यांत दोन्हीहि बाजूंकडील मुख्य मुख्य सरदार पडले व जखमी झाले. शेवटीं निजामशाही सैन्य बिदर प्रांतांतून अहमदनगरास गेलें.[१०८]

कुत्बशाहानें रफतखान लारीस वैजनाथदेवावर स्वारी करण्याची आज्ञा दिली. त्यानें प्रथम पोतनूरास वेढा घालून तो घेतला. वैजनाथदेवाचा भाऊ कैद झाला. नंतर त्यानें कंडुदेवपल्लीस वेढा घातला. पुष्कळ दिवस वेढा पडला होता. वैजनाथानें निकराची लढाई दिली. पराभव पावला. तेव्हां वैजनाथदेवानें खंडणी देऊन मांडलिकत्व स्वीकारलें. याप्रमाणें थेट पूर्वेस समुद्रकिनाऱ्यापर्यंत (राजमर्द्रीपर्यंत) कुत्बशाही राज्य वाढविलें.

हि. ९७८ (५ जून १५७० ते २५ मे १५७१ इ. स. ).—इ. स. १५७०त मुर्तुझा निजामशाहानें आपल्या आईस कैद केलें व अली आदिलशाहानें धारूर वगैरे प्रांतांत गडबड केली. मुर्तुझा निजामशाहानें धारूर घेतला व बरेंच शौर्य दाखविलें. ही संधी पाहून कुत्बशाहानें मुर्तुझा निजामशाहाशीं मैत्री संपादण्याचा प्रयत्न केला. नंतर तह झाला. त्यांत कुत्बशाही व निजामशाही सैन्यांनीं विजापुरावर चालून जावें असें ठरलें. नागदुरीजवळें[१०९] या दोन्ही सैन्यांचा तळ पडला. परंतु उलट आदिलशाहानें खटपट करून इब्राहीम कुत्बशाहाविरुद्ध मुर्तुझाचें मन वळविलें. मुर्तुझानें कुत्बशाही सैन्यास वेढून हल्ला चढविण्याचा हुकुम दिला. हा अकस्मात् हल्ला झालेला पाहून इब्राहीम कुत्बशाहा जिवानिशीं पळाला. सर्व जडजवाहीर सामानसुमान मुर्तुझाच्या हातीं लागलें. या वेळीं इब्राहीम कुत्बशाहाच्या वडील मुलानें सैन्याची जुळवाजुळव करून मुर्तुझावर चालून जाण्याची परवानगी मागितली. परंतु इब्राहीम कुत्बशाहास त्याचा संशय आल्यावरून त्यानें त्यास प्रथम देवरकोंड्यास कैदेंत ठेवलें व नंतर विष घालून ठार मारलें. मुर्तुझानें नंतर उदगीरावर चालून जाऊन उदगीर घेतलें.[११०]

---

१०८. बु. इ. मा., इं. अँ., व्हॉ. L – १९२१, पृ. २०५-६; ब्रि. फे. नि. पु. ३, पृ. २५१.

१०९. बुर्‍हाण-इ-मासिरींत वाकडी म्हटलें आहे.

११०. बु. इ. मा., इं. अँ., व्हॉ. L – १९२१, पृ. २२९-३१; ब्रि. फे. नि. पु. ३, पृ. २५३-५.

हि. ९८० ( १४ मे १५७२ ते २ मे १५७३ इ. स. ).—इब्राहीम कुत्बशाहानें मुर्तुझाचा सूड उगविण्यासाठीं तोफलखानाशीं मैत्री संपादली. मुर्तुझाच्या मुलखावर स्वारी करण्याचें ठरलें. तोफलखानानें आपला मुलगा समशीर उल्मुल्क यास पाठविलें. कुत्बशाहानें शिकारीचा बहाणा करून कूच केलें. कौलसला अली बरिद, कुत्बशाहा व तोफलखान यांचीं सैन्यें एकत्र जमलीं. त्यांनीं अली आदिलशाहाचीहि मदत मागितली. अली आदिलशाहा खासाच स्वारीवर निघाला. परंतु चंगीजखानानें त्याला नल्दुर्गास[111] गांठलें व त्याला या संघांतून फोडलें. कुत्बशाहा घाबरला व अली बरिदास व तोफलखानास आपापलीं सैन्यें मागें नेण्यास सांगितलें. जरूर लागल्यास एकमेकांस एकमेकांनीं साहाय्य करण्याच्या शपथा घेतल्या. नंतर इब्राहीम कुत्बशाहा गोवळकोंड्यास आला[112].

हि. ९८१ ( ३ मे १५७३ ते २२ एप्रिल १५७४ इ. स. ).—आदिलशाहाचा व निजामशाहाचा तह झाला कीं, आदिलशाहानें विजयानगरावर स्वारी करावी व निजामशाहानें तेलंगणांतील मुलख घ्यावा. या तहान्वयें त्यांनीं प्रथम बिदरास वेढा घातला. परंतु पुढें त्यांचा असा बेत झाला कीं, बिदरास वेढा घालून बसण्यापेक्षां तेलंगणांतील मुलख घ्यावा व तोफलखानास प्रथम शिक्षा द्यावी. त्याप्रमाणें आदिलशाहातर्फे दिलावरखान व मुर्तुझातर्फे अमिन उल्मुल्क वगैरे मुलखगिरीस निघाले. कौलसजवळ बरीच लुटालुट केली. कुत्बशाहातर्फे सलाबतखान त्या सैन्यावर हल्ले चढवीतच होता. पावसाळा लागल्याकारणानें निजामशाहाचें सैन्य कौलसच्या आसपास राहिलें. कुत्बशाही सैन्यानें त्यांस पुष्कळच त्रास दिला. पावसाळ्यानंतर आदिलशाहाचें सैन्य बंकापुराकडे गेलें व निजामशाहाचें सैन्य पार्थीवरून वऱ्हाडांत गेलें.[112] या वेळीं आदिलशाहाचा जनाना यशवंतराव, भोजमलनायक व देवनायक यांचे हवालीं केला होता. या मराठ सरदारांनीं परत जातांना गोवळकोंड्याच्या मुलखांत लुटालुट केली. सलाबतखानानें त्यांच्यावर जाऊन त्यांचा पराभव केला. यशवंतरावास बराच त्रास दिला. परंतु तो जनान्यासह सुरक्षित निघून गेला.

कौलस-कंदाहारचे सरहद्दीवरील निजामशाही सैन्यानं कुत्बशाहाच्या मुलखांत पुन्हां लुटालूट करण्यास सुरवात केली. तेव्हां इब्राहीम कुत्बशाहानें मीर शहा

१११. नलदूर्ग—बिदरच्या पश्चिमेस १०० मैल, उस्मानाबाद जिल्हा, निजाम संस्थान.

११२. बु. इ. मा., इं. अँ., व्हॉ. L – १९२१, पृ. २६१–३.

महमद अंजू त्याच्यावर पाठविला. देगलूरचा[३०] निजामशाही हवालदार सय्यद हैदर हा अंजूवर चालून आला. त्यांत अंजूनें त्याचा पुरा मोड केला व देगलूर घेतला. नंतर तो देगलूर-कंदाहारचे मैदानांत छावणी देऊन राहिला असतां, बसवंतराव, विश्वासराव आणि कोळीगाव यांनीं अंजूवर हल्ले चढविले. परंतु त्यांत निजामशाही सैन्याची पिछेहाट झाली. निजामशाहानें माहूरहून[११३] मिर्झा यादगरास मदतीस पाठविलें. कुत्बशाहानें सलाबतखानास धाडलें. कुमक येऊन पोहोंचली तेव्हां कुत्बशाही सैन्य ताम्रीस[११४] होतें. कुमक आलेली पाहतांच तें कौलसला गेलें. लढाया झाल्या. एक महिनापर्यंत त्यांचे एकमेकांवर हल्ले चढत होते. दोन्ही बाजूंचें बरेंच नुकसान झालें. कुत्बशाहानें निजामशाही सैन्याचा बऱ्याच वेळां मोड केला व तें लुटलें. नंतर कुत्बशाहानें कौलसच्या किल्ल्यांत जरूर तितकें सैन्य ठेवून बाकीच्या सैन्यास गोवळकोंड्यास परत बोलाविलें. सैन्य परत गेलेलें पाहतांच ९ मोहरम ( ३ मे १५७४ इ. स. ) रोजीं निजामशाही सैन्यानें कौलसच्या आसपास लुटालुट केली व तें परत कंदाहारास गेलें. नंतर मोहरमच्या अखेरीस ( मेच्या शेवटच्या आठवड्यांत ) निजामशाहानें आपलें कंदाहारांतें सैन्य उदगीरास नेलें. पावसाळ्यांत तें तेथें राहिलें.[११५]

हि. ९८२ ( २३ एप्रिल १५७४ ते ११ एप्रिल १५७५ इ. स. ).—निजामशाहानें वऱ्हाडच्या राज्याचा नाश केलेला पाहतांच कुत्बशाहानें शहा मीरास पाठवून निजामशाहाची माफी मागितली व तहाचें बोलणें लावलें. निजामशाहानें त्यास मान्यता दिली. तेव्हां शहा मीर परत गोवळकोंड्यास आला. नंतर नजरनजराणे घेऊन जाऊन त्यानें निजामशाहाची बाळापुरास[११६] पुन्हां गांठ घेतली व ज्या वेळीं निजामशाहाची आदिलशाहावर स्वारी होईल त्या वेळीं कुत्बशाहानें प्रत्येक मुक्कामास वीस हजार होन याप्रमाणें खंडणी द्यावी असें ठरलें.[११७]

विदरवरून आदिलशाहा परतल्यानंतर विजयानगरकडे चालून गेला. पेनकोंड्यास वेढा दिला. तेव्हां श्रीरंगरायाच्या मागणीवरून इब्राहीम कुत्बशाहानें शहा महमद अंजूस आदिलशाही सरहद्दीवरील मुलुखांत लुटालुट करण्यास पाठवून तो

---

११३. माहूर – देगलूरच्या उत्तरेस १० मैल, आदिलाबाद जिल्हा, निजाम संस्थान.
११४. ताम्री–देगलूर पासून चार मैलांवर.
११५. बु. इ. मा., इं. अँ., व्हॉ. L–१९२१, पृ. २६७, २६८ व २७८.
११६. बाळापूर–अकोल्याच्या पश्चिमेस १२ मैल, अकोला जिल्हा, वऱ्हाड.
११७. बु. इ. मा., ई. अँ., व्हॉ. L–१९२१, पृ. २७९-८० व २८३.

विजयानगराकडे गेला. सरहद्दीवर अंजू, इब्राहीम कुत्बशाहा व श्रीरंग हे मिळतांच आदिलशाहानें माघार घेतली. तेव्हां इब्राहीम कुत्बशाहा परत गोवळकोंड्यास आला.

हि. ९८३ ( १२ एप्रिल १५७५ ते ३० मार्च १५७६ इ. स. ).—श्रीरंगरायाच्या सरदारांनीं कोंडविड वगैरे कोंडपल्लीजवळील सर्व किल्ले घेतले.[११८]

हि. ९८६ ( १० मार्च १५७८ ते २७ फेब्रुवारी १५७९ इ. स. ).—इब्राहीम कुत्बशाहानें कोंडविडादि किल्ले परत घेण्यासाठीं हैदर उल्मुल्क यास पाठविलें. त्यानें प्रथम इनकोंडा घेतला. काचरलोटा व कममहि त्याच्या हातीं आले. नंतर तो कोंडविडाकडे वळला. वेढा घालण्यापूर्वी त्याची व हिंदु सैन्याची लढाई झाली. तींत त्याला यश येतांच तो गुरमवर चालून गेला. गुरम काबिज केला. नंतर बेलमकोंड्यास वेढा दिला. हा व आणखी कांहीं लहान किल्ले घेतल्यानंतर हैदर कोंडविडास वेढा घालून बसला. किल्ला पडणें कठिण वाटतांच मदत मागितली. कुत्बशाहानें अमीर शहा मीरास पाठविलें. पुष्कळ हल्ले चढविले. त्यांत कुत्बशाही सैन्याचा बराच नाश झाला. शेवटीं हत्तींकडून दार फोडवून निकराचा हल्ला केला व हि. ९८७च्या सफर महिन्यांत ( एप्रिल १५७९ इ. स. ) त्यानें कोंडविड घेतला. कपुरी तिमराज कैद झाला. या स्वारीवर इब्राहीम कुत्बशाहानें आपला मुलगा महमद कुली यास पाठविलें होतें.[११९]

हि. ९८७ ( २८ फेब्रुवारी १५७९ ते १६ फेब्रुवारी १५८० इ. स.).—मुर्तुझा निजामशाहानें बिदर घेण्याचा निश्चय केला. त्यानें मीर अबुल कासिमास इब्राहीम कुत्बशाहाकडे पाठवून वेढ्याच्या मदतीस येण्याबद्दल कळविलें. कुत्बशाहानें अमीर शहा मीरास पाठविलें. मलिक अली बरिदानें अली आदिलशाहाची मदत मागितली. ती त्यानें कबूल केली. परंतु त्याबद्दल त्यानें अली बरिदाकडील दोन स्वरूपवान खोजे मागितले. ते त्यानें नाइलाजास्तव देण्याचें कबूल करून पाठविले. तेव्हां आदिलशाहानें कुमक पाठविली. परंतु अली आदिलशाहानें मिळविलेल्या दोन

११८. मर्रीदेपल्ली ( बेल्लारी जिल्हा ) येथील इ. स. १५७४-५ मधील शिलालेखांत श्रीरंगानें कोंडविड, उदयगिरी व वेनुकोंडा हे काबिज करण्यांत मिळविलेल्या यशाचें वर्णन केलें आहे. सिवेलकृत ' हिंदुस्थानांतील दक्षिणेंतील ऐतिहासिक शिलालेख,' पृ. २६१.

११९. श. १५०२ मध्यें इब्राहीम कुत्बशाहानें आपला मुलगा महमद कुली याम सैन्य देऊन पाठविलें व त्यांनीं उदयगिरी, वेनुकोंडा, बेलमकोंडा, तंगेडा व कोंडविड हे किल्ले घेतले. त्यास तेथील सुभेदार केलें. असा गुंटूर जिल्ह्यांतील अभिनाबाद येथील इ.स. १५९२-३च्या शिलालेखांत उल्लेख आहे. सिवेलकृत ' हिंदुस्थानांतील ऐतिहासिक शिलालेख', पृ. २६२ व २६६. आयंगारकृत 'सोर्सिस ऑफ विजयानगर हिस्टरी', पृ. २३९-४०.

ख्वोजांपैकीं एकानें आदिलशाहाचा गुरुवार चं. २३ सफर हि. ९८७[१२०] (२१ एप्रिल १५७९ इ. स.) रोजीं रात्रीं खून केला. बिदरचा वेढा चालूच राहिला.[१२१]

इब्राहीम आदिलशाहा विजापूरच्या तख्तावर आला. हा लहान होता. त्यामुळें आदिलशाही सरदारांत भांडणें लागलीं. हें पाहून निजामशाहानें आदिलशाहावर चालून जाण्याचें ठरविलें. इब्राहीम कुत्बशाहाशीं मागें केलेला तह पुन्हां कायम करविला व निजामशाहानें विहाजदखानाबरोबर सैन्य देऊन त्याला आदिलशाही मुलखावर पाठविला. परंतु ही बातमी आदिलशाही सरदारांना लागली. त्यांनीं अली बरिदाच्या मदतीस पाठविलेल्या सैन्यास कुमक म्हणून आणखी सैन्य पाठविलें. या सैन्याची भिवरेवर गांठ पडली. तेथें त्यांना कुत्बशाही घोडदळ सिरवल व सेरमच्या रस्त्यानें आदिलशाही मुलुखांत शिरत असल्याची बातमी लागली. तेव्हां आदिलशाही सैन्यानें त्यांचा फेरोझाबादेजवळ तांदेरपर्यंत पाठलाग केला व पहिल्याच वेळीं यश मिळालें म्हणून मोठ्या आनंदानें निजामशाही सैन्यावर चालून जाऊं लागले. आदिलशाही व निजामशाही सैन्यांची नळदूर्ग व सोलापूर यांमधील धाराशेवजवळ गांठ पडली. लढाई झाली. तींत विहाजदखानाचा पूर्ण पराभव झाला. आदिलशाही सैन्य बिदराकडे जाऊं लागलें. नंतर सैय्यद मुर्तुझाकडे सेनापतीपद आलें. सय्यद मुर्तुझा आदिलशाही सैन्यावर चालून जाऊं लागला. शहा मीरहि आपल्या कुत्बशाही सैन्यासह त्यांस जाऊन मिळाला. नंतर ते नळदूर्गावर चालून गेले. नळदुर्गास वेढा घातला. दुसऱ्या दिवशीं दुपारपर्यंत चांगलीच झुंपली. आदिलशाही सैन्य पळून किल्ल्यांत जाऊन बसलें. नंतर वेढा चालू राहिला. नेहमीं लढाया होतच होत्या. शेवटीं निजाम-कुत्बशाही सरदारांनीं आपल्या अर्ध्या सैन्यानिशीं विजापुरावर स्वारी करावयाची व राहिलेल्या सैन्यानें वेढा चालू ठेवावयाचा असें ठरवून एका रात्रीं निजाम-कुत्बशाही सैन्यानें विजापुराकडे कूच केलें. परंतु ही बातमी आदिलशाही सैन्यास लागतांच नळदुर्गावरील अर्धे आदिलशाही सैन्य दुसऱ्या वाटेनें आधींच विजापुरास जाऊन पोहोंचलें. निजाम-कुत्बशाही सैन्य सोलापुरावरून विजापुरास गेलें. तेथें गेल्यानंतर दुसऱ्याच दिवशीं मोठी लढाई झाली.

---

१२०. बुर्हाण-इ-मासिरांत हि. स. ९८८ दिला आहे. फेरिस्ता व कुत्बशाही इतिहासकार हि. ९८७ देतात. हि. ९८८ च्या २३ सफरला गुरुवार येत नाहीं. बु. इ. मा.त ९८८ हि. हा ९८७ हि. साठीं चुकून पडला असावा.

१२१. ब्रि. फे. आ. पु. ३, पृ. १४२, नि. पु. ३, पृ. २६२ व कु. पु. ३, पृ. ३३२; बु. इ. मा., इं. अँ., व्हॉ LII—१९२३, पृ. २९-३०.

कुत्बशाही सैन्यानें चांगलेंच शौर्य दाखविलें. आदिलशाही सैन्याचा मोड होऊन तें जेमतेम विजापुरांत जाऊन पोहोंचलें. दुसऱ्या दिवशींहि असाच पराभव झाल्यानें आदिलशाही सैन्य विजापुरांत कोंडून राहिलें.[१२२]

नलदुर्गचा वेढा घालण्यास निजाम-कुत्बशाही सैन्य जात असतां इब्राहीम कुत्बशाहानें अमीर झैनास नाखवी, कल्दूर व काकनी हे घेण्यास पाठविला होता. त्यानें प्रथम आदिलशाही हवालदारांचा पराभव करून सुभान कुलीच्या कारकीर्दीत गेलेला काकनी, नाखर्वी व कर्नूलचा प्रांत काबीज करून कल्दूरास वेढा घातला. तो हातीं येतांच झैन सागराकडे गेला. तेथें लढाई झाली. तींत आदिलशाही फौजेचा मोड झाला. तेथून त्यानें मादर्गीचा किल्ला घेऊन एतगीरास वेढा दिला. तोहि हातीं आला. तेथें त्याला विजापुरास गेलेल्या निजाम-कुत्बशाही सैन्याच्या मदतीस जाण्याचा हुकूम मिळाला. तो तेथून निघाला. परंतु ही बातमी आदिलशाही सरदारांस लागतांच त्यांनीं मिर्झा नूर महमदास त्याला अडविण्यासाठीं पाठविलें. अलमल येथें गांठ पडली. तेथें अमीर झैनानें आदिलशाही सैन्याचा पुरा मोड केला. नंतर अमीर झैन आदिलशाही मुलुख लुटीत लुटीत विजापुरापर्यंत आला. आदिलशाही सैन्यानें त्याला अडविण्याचा प्रयत्न केला. परंतु तो निष्फळ झाला.[१२२]

परदेशीय मुसलमान सरदारांनीं विजापूर लढविण्याचा आटोकाट प्रयत्न केला. पुन्हां एकदां निकराची लढाई दिली. तींत आदिलशाही सैन्याचा बराच नाश झाला. तेव्हां पुन्हां दरवाजे लावून आदिलशाही सैन्य विजापुरांत बसलें. वेढा चालू राहिला. आदिलशाही सरदारांनीं कुत्बशाही व निजामशाही सैन्यांत बिघाड उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला. निजामशाही सय्यद मुर्तुझानें कुत्बशाही सैन्यास दूर करण्याचेंहि ठरविलें. परंतु या कटाची बातमी कुत्बशाही सेनापती सय्यद शहा मिरास कळतांच त्यानें सय्यद मुर्तुझाची चांगलीच कानउघाडणी केली. सय्यद मुर्तुझा पुन्हां पूर्ववत् वेढ्याचें काम चालवूं लागला. हा कट फसला. तेव्हां आदिलशाही सरदारांनीं मराठा घोड-दळास निजाम-कुत्बशाही सैन्यावर हल्ले चढविण्यासाठीं व दाणागोटा न मिळूं देण्या-साठीं पाठविलें. त्याचा बराच उपयोग झाला व शेवटीं निजाम-कुत्बशाही सैन्यास वेढा चालविणें जड जाऊं लागलें.[१२२] तेव्हां विजापूरच्या आसपासच्या मुलुखांत लुटालूट व नासधूस करण्यास प्रारंभ केला.[१२४]

---

१२२. बु. इ. मा., हेगचें भाषांतर; इं. अँ., व्हॉ. LI-१९२२, पृ. ६८-७३, १२५-१३०, ब्रि. फे. नि. पु. ३, पृ. २६३, व ब्रि. फे. आ. पु. ३, पृ. १४४-५४.

हि. ९८८ ( १७ फेब्रुवारी १५८० ते ४ फेब्रुवारी १५८१ इ. स. ).— निजाम कुत्बशाही सैन्यानें मोहरम महिना ( फेब्रुवारी-मार्च ) बहुतेक लुटालूट करण्यांतच घालविला. नंतर वेढा उठवून कोल्हारास गेले. तेथून रायबाग, पन्हाळा, सातारा, हुकेरीवरून गुलबर्ग्यास गेले. वाटेंत मिरझेस लढाई झाली. परंतु मिरझेस वेढा न घालतांच हें सैन्य पुढें गेलें. कुलबर्ग्याहून जाऊन नलदुर्गास वेढा द्यावयाचा तर वाटेंत नलदुर्गाजवळील नांदगांवास इब्राहीम कुत्बशाहा वारल्याची बातमी आली.[१२२]

दक्षिण तेलंगणांतील मुलुखगिरीवरून शहा मीरास आदिलशाही सैन्याविरुद्ध लढण्यास पाठविला. तेव्हां तेथील कारभार मुरारी नांवाच्या एका तोलदार ब्राह्मण सरदाराकडे सोंपविला होता. या वेळीं त्यानें व त्याचे हाताखालील मुसलमान सरदारांनीं अदोनी लुटून बरीच संपत्ति व खंडणी इब्राहिमास मिळवून दिली.

इब्राहीम कुत्बशाहा गुरुवार चं. २१ रबिलाखर ९८८ हि. ( २ जून १५८० इ. स. ) रोजीं वारला.[१२३] याला वीस मुलें झालीं. त्यांतील सहा मुलगे व तेरा मुली जगल्या. वडील मुलगा अबदुल कादर देवरकोंड्यास कैदेंत वारला. दुसरा मुलगा मिर्झा हुसेन कुली बुडून मेला. तिसरा महमद कुली तख्तावर आला. चवथा मिर्झा अबदुल फत्ते या वेळीं तेरा वर्षांचा होता. तो पुढें १००३ हि.त वारला. पांचवा मिर्झा महमद खुदावंदा आपल्या भावास पदच्युत करण्याचा कट केल्यावरून गोवळकोंडा येथें कैदेंत असतां हि. १०१८त वारला. सहावा मिर्झा महमद अमीन हि. १००४ चं. २५ साबान ( २७ मार्च १५९६ इ. स.) रोजीं वारला.[१२४]

**१६. महमद कुली कुत्बशाहाः**—इब्राहीम कुत्बशाहाचा तिसरा मुलगा महमद कुली हा शुक्रवार चं. १४ रमजान ९७३ हि. (५ एप्रिल १५६६ इ. स.) रोजीं जन्मला. याला बाराव्या वर्षीच कोंडविड-कोंडपल्लीच्या लढाईवर पाठविलें होतें. त्यानें शके १५०२ विक्रम संवत्सर चैत्र वद्य १४ मंगळवार ( १३ एप्रिल

---

१२३. इब्राहीम कुत्बशाहाच्या कबरीवरील लेखांतहि हीच तारीख दिली आहे. ए. इं. मॉ., १९०७–८, मृ. २४ व १९१५–१६, पृ. २७.

१२४. अमीर महमद अमीनच्या शिलालेखांत रविवार चं. २५ साबान १००४ हि. ( २७ मार्च १५९६ इ. स. ) ही तारीख दिली आहे.–ए. इं. मॉ., १९०७-८ पृ. २४ व १९१५-१६, पृ. २९.

१५८० इ. स. ) रोजीं उदयगिरी घेतला. वेंकटराजाचा पराभव करून वेनुकोंडा, बेलमकोंडा, तंगेडा व कोंडविड घेतले. त्याला तेथील सुभेदार नेमलें होतें. इब्राहीम कुत्बशाहा आजारी झाला तेव्हां तो गोवळकोंड्यास आला व चं. २१ रबिलाखर ९८८ हि. ( २ जून १५८० इ. स. ) रोजीं तख्तावर आला.[१२५]

हि. ९८८ (रबिलाखर जून १५८० ते ४ फेब्रुवारी १५८१ इ.स.).—महमद कुली राज्यावर आला त्या वेळीं निजाम-कुत्बशाही सैन्य विजापूरचा वेढा उठवून नलदुर्गाकडे येत होतें. या सैन्यांतील मुख्य सरदारांत तितका बनाव नव्हता. नलदुर्गास खासा कुत्बशाहानें आल्याशिवाय या जोड सैन्याला आदिलशाही सैन्यावर चढाई करितां येणार नाहीं असें वाटून शहा मीरनें कुत्बशाहास लढाईवर नेलें. परंतु यांत यावें तितकें यश आलें नाहीं. उलट कुत्बशाही सैन्यांतच एकमत राहिलें नाहीं. महमदकुली व निजाम-कुत्बशाही सैन्य नलदुर्गास रमजानचे अखेरीस (आक्टोबर १५८० इ.स.) आले. तोफा वगैरे आल्यावर किल्ल्यास वेढा दिला. दोन महिनेपर्यंत सारखे हल्ले व फितुरीचे प्रयत्न चालू होते. शेवटीं विजापुराहून मदत आली. तीहि किल्ल्यांत जाऊन पोहोंचली. तेव्हां महमद कुलीनें पुढाकार घेऊन अंगेजानें निकराचा हल्ला केला. दुपारपर्यंत संग्राम झाला. परंतु इतक्यांत पाठीवर मोठी मराठी फौज आल्याची वर्दी आली. तेव्हां हें जोड सैन्य माघारें फिरलें. नंतर वेढा उठवून विजापुरास जाण्याचा बेत झाला. सैन्य भिवरेवर मुक्कामास आलें. तेथें महमद कुलीनें लढाई थांबवून राजधानीस परत जाण्याचें ठरविलें. तीं जोड सैन्यें नंतर कांहीं फौज सरहद्दीवर ठेवून परत फिरलीं.[१२६]

गोवळकोंड्यास आल्यानंतर महमद कुलीनें सय्यद शहा मीरच्या मुलीशीं लग्न केलें.[१२७]

महमद कुलीनें सरहद्दीवर मीर झैनुल ऊर्फ मुस्तफाखान यास ठेवलें होतें. परंतु आदिलशाही अफाट सैन्य चालून येत आहे अशी बातमी लागतांच त्यानें कुमक

---

१२५. अमिनाबाद शिलालेख, ( शके १५१४ चा ) क्र. ७७, सोर्सिस ऑफ विजयानगर हिस्टरी, अयंगारकृत, पृ. २३९-४०.

१२६. बु. इ. मा., हेगचें भाषांतर, इं. अँ, व्हॉ. LI –१९२२ पृ. २००; ब्रि. फे. कु. पु. ३, पृ. ३३३.

१२७. बु. इ. मा., इं. अँ., व्हॉ. LI –१९२२ पृ. २०१; ब्रि. फे. कु. पु. ३, पृ. ३३४.

मागितली व ती मिर्झा यादगर याजबरोबर तावडतोब पाठविण्यांत आली. याच वेळीं मीर शहा मीर आदिलशाहास फितूर आहे असें कांहीं दरबारी लोकांनीं सांगून महमद कुलीचें मन कलुषित केलें. त्यानें शहा मीरास कैद केला. त्यामुळें परदेशीय सरदारांनीं आदिलशाहाशीं लढण्याचें नाकारलें. कुत्बशाही सैन्याचा पुरा मोड झाला. सामानसुमान लुटलें गेलें व आदिलशाही दिलावरखानानें त्याला पाकटवीत थेट गोवळकोंड्यापर्यंत आणून सोडलें. याप्रमाणें मागें ठेवलेलें सैन्यहि तीन महिन्यांत परत आलें. नंतर आदिलशाहाशीं तह झाला.[१२८]

[९८९ हि. (५ फेब्रुवारी १५८१ ते २५ जानेवारी १५८२ इ. स.) ].—अली खान लूर नांवाच्या सरदारानें कोंडविडाजवळ बंड केलें. त्याला मिकर तिम्मयानें मदत केली. तो कोंडविडावर चालून आला. वाटेंत कम्मम[१२९]लो वेढा दिला. कोंडविडचा सुभेदार राय रावनें त्याचा पराभव केला. तेव्हां तो विजयानगरच्या आश्रयास जाऊं लागला. परंतु आश्रय मिळाला नाहीं.

अली खानानें सैन्याची जमवाजमव करून कोंडपल्ली प्रांतांत लुटालुट केली. कुत्बशाहानें रहिमदाद व तहीर महमद असे दोघे सरदार पाठविले. अली खान आर्दिग्यास गेला. परंतु किल्ला पडतांच तो जंगलांत जाऊन चोरटे हल्ले करूं लागला. त्याचा पाठलाग केला तेव्हां तो पळून गेला. पातशाही सैन्याच्या मदतीस संत्रावळचा हवालदार अफजलखान आला. तेव्हां लूर निझामपट्टणांस[१३०] गेला व लुटालुट करून कोंडविडास आला. तेथें किश्वरखानाचा पराभव करून त्याचें सामानसुमान लुटलें. नंतर अनंबोले येथें अफजलखानास लुटला. तेव्हां रहीमदादनें पाठलाग करून त्याच्यावर हल्ला केला. त्यांत तो मारला गेला.

हि. ९९५ ( २ डिसेंबर १५८६ ते २१ नवंबर १५८७ इ. स.).—इब्राहीम आदिलशाहाचा मुख्य वजीर दिलावरखान यानें कुत्बशाहाची मैत्री संपादण्यासाठीं महमद कुलीजवळ त्याची बहीण मलाका-इ-जहान इब्राहीम आदिलशाहास देण्याबद्दल मागणी घातली. महमद कुली कुत्बशाहानें प्रथम ती निजामशाही

---

१२८. बु. इ. मा., इं. अँ., व्हॉ. LI–१९२२, पृ. २०१; ब्रि. फे. आ. पु. ३, पृ. १५४, ब्रि. फे. कु. पु. ३, पृ. ३३४.

१२९. कंबम – कोंडविडच्या नैॠत्येस १०० मैल, कर्नूल जिल्हा, मद्रास.

१३०. निझामपट्टण – कोंडविडच्या आग्नेयेस ४० मैल, गुंतुर जिल्हा, मद्रास.

आसदखानाच्या धास्तीनें नाकारली. परंतु आसदखान कैद झालेला समजतांच लग्न ठरलें व इब्राहीम आदिलशाहा व कुत्बशाहा यांनीं नलदुर्गास जाऊन लग्नसोहळा केला[१३१].

हि. ९९८ ( ३१ आक्टोबर १५८९ ते १९ आक्टोबर १५९० इ. स. ).—भागानगर उर्फ हैद्राबाद बसविलें व तेथें राजधानी नेली.[१३२]

[ हि. ९९९ व १००० ( २० आक्टोबर १५९० ते २७ सप्टेंबर १५९२ इ. स. ) ].—वेंकटपती इ. स. १५८६त राज्यावर आला. त्यानंतर त्यानें कोंडविडच्या बाजूचा बराच प्रांत आक्रमिला[१३३]. तो परत घेण्यासाठीं कुत्बशाहानें हिंदु राजांवर स्वारी करण्याचें ठरविलें. त्यानें कृष्णा उतरून जाऊन मुसलमुरूस वेढा घालून तो घेतला. बसवंत राजाजवळून नंदिआल[१३४] व नरसिंगराजाजवळून कलगूर घेतले. नंतर जमलमुरू, जुद्री, चरवल, नंदौतकोटा, दोल व चिन्नूरचे जमीनदार येऊन मिळाले. अमिर उल्मुल्कास गंडिकोट्यास वेढा घालण्यास लावला. नरसिंग राजानें कुत्बशाहाचें मांडलिकत्व स्वीकारलें. कुत्बशाहानें गंडिकोटा काबिज केला.

महमद कुली पेनकोंड्यावर[१३५] चालून गेला. तेथें व्यंकटपतीनें कुत्बशाहाचा पूर्ण पराभव केला. पावसाळ्यांत माघारा जाण्याचीहि अडचण होईल म्हणून तो त्यापूर्वीच गोंवळकोंड्यास कसा तरी येऊन पोहोंचला[१३६].

गंडिकोट्याच्या मदतीस कोंडविडचें सैन्य गेलें. हें पाहून वेंकटपतीनें उदयगिरीच्या[१३७] कौलानंदास कोंडविड व कृष्णा प्रांतांत धुमाकूळ घालण्यास पाठविलें. उरिआचा राजाहि त्यास मिळाला. त्यांनीं कोंडविडांत शिरून लुटालुटीस प्रारंभ केला.

---

१३१. बु. इ. मा., इं. अँ., व्हॉ. LII—१९२३, पृ. ३२; ब्रि. फे. कु. पु. ३, पृ. ३३५, व आ. पु. ३, पृ. १५८-९; बु. स. ४३०.

१३२. ब्रि. फे. कु. पु. ३, पृ. ३३५.

१३३. वैशाख वद्य १४ शके १५०६च्या अहोबलम येथील शिलालेखांवरून श्रीरंगाचे कारकीर्दीतच मुकुंदराजानें ह्या प्रांत पुन्हां काबिज करण्यास सुरुवात केली होती असें दिसतें. आयंगारकृत ‘ सोर्सिस ऑफ विजयानगर हिस्टरी’, पृ. २३३-४.

१३४. नंदियाल—हैद्राबादेच्या दक्षिणेस १३० मैल, कर्नुल जिल्हा, मद्रास.

१३५. पेनकोंडा—बंगलूरच्या उत्तरेस ९० मैल, अनंतपूर जिल्हा, मद्रास.

१३६. रघुनाथाभ्युदयम्, आयंगारकृत ‘ सोर्सिस ऑफ विजयानगर हिस्टरी’, पृ. २८५ व २५९, शके १५२७च्या सिद्धांतचा शिलालेख, सदर पुस्तक, पृ. २४८ आणि रामराजीयमु, सदर पुस्तक, पृ. २४३.

१३७. उदयगिरी—कोंडविडच्या नैऋत्येस ९० मैल, नेलोर जिल्हा, मद्रास.

परंतु यच्चवेळीं अफझलखानानें हुनगोळच्या[१३८] बाजूस आपले लोक पाठविले. त्यामुळें कोंलानदास परतावें लागलें. अफझलखानानें शिकस्त करून कोंलानंदाच्या सैन्यावर हल्ले चढविले. त्याचा उपयोग झाला नाहीं. लवकरच अजदखानाची कुमक आली व यानें पाठीवरून अकस्मात् हल्ला चढविला. त्यांत उरिआ राजाचें नुकसान झालें.

पावसाळ्याचा फायदा घेऊन वेंकटपतीनें संजरखानाकडून गंडिकोटा परत घेण्यासाठीं सरदार पाठविले. गंडिकोट्यास वेढा घातला. परंतु याच वेळीं मुर्तुझाखानानें कडपास[१३९] जाऊन तें लुटलें. त्यामुळें गंडिकोट्याचें अर्धें सैन्य तिकडे रवाना केलें. मुर्तुझाखानानें कसा तरी तीन महिने दम काढला. नंतर त्याला कुमक म्हणून रुस्तुमखान मुख्य सेनापती करून पाठविला. परंतु त्याचें व मुर्तुझाचें पटलें नाहीं. रुस्तुमनें चाल करून जाऊन लढाई देण्याचा प्रयत्न केला. तींत त्याचे घोडेस्वार चिखलात रुतल्यामुळें त्याचे फार हाल झाले व कुत्बशाही सैन्याचा पुरा नाश झाला. रुस्तुमखानास कुत्बशाहानें परत बोलावून त्यास फजित केलें.

महमदकुलीनें कोंडविडचा हवालदार इतबारखान याजबरोबर राहिलेलें सर्व सैन्य देऊन त्याला पेनकोंड्यावर पाठविलें. अनंतगीरीच्या[१४०] नरस नंदीराजानें त्याच्यावर सारखे हल्ले चढविले. त्यांत त्याला बराच हैराण केला. एका रात्रीं हल्ला घालण्यास आला असतां वादळ व पावसामुळें नंदीराजाला मध्येंच अडकून राहावें लागलें. त्यांत त्याचा पराभव झाला व त्याला थोडीशी माघार घ्यावी लागली. नंतर इतबारखान सालिर्कीवर चालून गेला. गोंवळकोंड्याहून येथपर्यंत पोहोंचण्यास त्याला एक महिना लागला होता.

हि. १००१ (२८ सप्टेंबर १५९२ ते १६ सप्टेंबर १५९३ इ.स.).— अर्मान उल्मुल्क उर्फ अर्मार जुम्लास खंडणी वसुलीसाठीं पाठविलें होतें. पुष्कळ वर्षे खंडणी न दिल्यामुळें तेथील जहागिरदार ती देण्यास साहजिकच नाखुष होते. परंतु तगादा लावल्यामुळें अलमखान पठाण, खान खान, साबाजी मराठा, बळीराय वगैरे हिंदुमुसलमान सरदारांनीं कोंडविडास बंड केलें. त्यांनीं तो प्रांतहि बळकाविण्यास सुरुवात केली. अमिन उल्मुल्कास गोंवळकोंड्याहून बंडाचा मोड करण्यास रवाना केलें. त्यानें कोंलानंदास प्रथम ठार मारलें. आर्दिग्यावर अधिक सैन्य ठेवलें. इतर बंडखोर

---

१३८. हुनगोळ—कोंडविडच्या दक्षिणेस ४० मैल, गुंटुर जिल्हा, मद्रास.

१३९. कडप्पा—पेनकोंड्याच्या ईशान्येस ७५ मैल, कडप्पा जिल्हा, मद्रास.

१४०. अनंतपूर ?—पेनकोंड्याच्या उत्तरेस ४० मैल, अनंतपूर जिल्हा, मद्रास.

विजयानगरच्या आश्रयास पळून जाऊं लागले. त्यांतील कांहीं नायकवाडी कैद झाले व कांहीं मारले गेले. शेवटीं बंड मोडून अमीन उल्मुल्क परत हैद्राबादेस गेला.[141]

याच सुमारास इब्राहीम कुत्बशाहाचा मोठा मुलगा अबदुल कादर याचा तोतया उभा राहिला. त्यास खुदाबंदखान मिळाला. परंतु इतबारखानानें त्याच्यावर चालून जाऊन कोंडविडाजवळ त्याला गांठलें व त्याचा मोड केला. तो आदिलशाहाचे आश्रयास जाऊन राहिला.

[ हि. १००२ ( १७ सप्टेंबर १५९३ ते ५ सप्टेंबर १५९४ इ. स.)].—कासिमकोट्याचा भाईबुलंदर वारल्यानंतर मुकुंदराज गादीवर आला होता. यानें कुत्बशाहाचें मांडलिकत्व मान्य केलें होतें. तें झुगारून देऊन त्यानें त्या प्रांतांतील कुत्बशाहाचा सुभेदार बिर्लसखान यास कैद केलें. तेव्हां कुत्बशाहानें मिर झैनुल अबिदिन त्याच्या पारिपत्यार्थ पाठविला. तो कासिमकोट्यास आला. मुकुंदराजाची तयारी पाहून त्यानें कुत्बशाहाकडे आणखी मदत मागितली. कुत्बशाहानें अमीर उल्मुल्क अमीर जुम्ला यास पाठविला. राजमहेंद्रीजवळ लढाई झाली. कुत्बशाही सैन्याचें बरेंच नुकसान झालें. मुकुंदराज कासिमकोट्यास गेला. बिर्लसखानास व घझन्फर बेग यांस ठार मारलें. इतरहि मुसलमानांची कत्तल केली. कुत्बशाही सैन्य कासिमकोट्यावर चालून गेलें. मुकुंदराज प्रथम मदवाड व नंतर चिकाकोलला पळून गेला. त्याचा पाठलाग केला. तेव्हां तो पेटापुरीं[142] गेला व नंतर गांवोगांव रानावनांतून हिंडत राहून हल्ले चढवूं लागला. शेवटीं त्याला रामचंद्रराजाच्या आश्रयास जावें लागलें

[ हि. १००३ ( ६ सप्टेंबर १५९४ ते २६ आगस्ट १५९५ इ.स.)].—रामचंद्रराज यानें बंगाल सरहद्दीवरील माधोसिंगाची मदत मिळवून तो मुकुंदराजाचें राज्य परत घेण्यासाठीं आला. त्यांनीं मुसलमानी सैन्यावर पुष्कळ हल्ले चढविले. परंतु कुत्बशाही सैन्यानें त्याला रेटीत रेटीत थेट बंगाल्याचे सरहद्दीपर्यंत नेलें. माधोसिंगास बंगाल्यांतच मोंगलांचे मदतीस जावें लागलें म्हणून त्यानें आपलें सैन्य परत घेतलें. तेव्हां रामचंद्रराजानें खंडणी देऊन तह केला. कासिमकोटा अलमखान व असीराव यांच्या ताब्यांत देऊन कुत्बशाही सेनापती माघारा आले.

---

१४१. अमिनाबादेचा शके १५१४चा शिलालेख, आयंगारकृत ‘ सोर्सिस ऑफ विजयानगर हिस्टरी ’, पृ. २४०.

१४२. पेटापूर–राजमहेंद्रीच्या पश्चिमेस ३५ मैल, गोदावरी जिल्हा, मद्रास.

हि. १००४ ( २७ आगस्ट १५९५ ते १४ आगस्ट १५९६ इ. स.).— अकबरानें मुरादला अहमदनगरचा किल्ला घेण्यास पाठविलें. या वेळीं निजामशाहींत बरीच यादवी माजून राहिली होती. बरेच सरदार मुरादला येऊन मिळाले. मुरादची सेना मंगळवार चं. २४ रबिलाखर रोजीं ( २४ डिसेंबर १५९५ इ. स. ) अहमदनगराजवळ येऊन दाखल झाली. दुसरे दिवशीं वेढा घातला. दोन महिने वेढा चालूच होता. शेवटीं शुक्रवार १ रज्जब ( १ मार्च १५९६ इ. स. ) रोजीं रात्रीं सुरुंग लावून निकराचा हल्ला दिला. त्यांत मुरादचा पराभव झाला. नंतर लढण्याचा जोर कमी होऊन तहाची वाटाघाट चालू झाली. परंतु वेढा चालूच राहिला. चांदबिबीकडून किल्ला हातीं येत नाहीं हें पाहून मुरादला फार लागून राहिलें. परंतु दक्षिणी सैन्याची आणखी कुमक जवळ आली आहे असें समजतांच चं. २७ रज्जब ( २७ मार्च १५९६ इ. स. ) रोजीं रात्रीं वेढा उठवून मुराद माघारा गेला.[१४३]

या वेळीं कुत्बशाहाचें सैन्य अहमदनगराकडे गुंतलें होतें व मुरादच्या यशापयशावर दक्षिणी शाह्यांचीं तख्तें डळमळणार असल्यानें महमद कुलीचे तिकडे डोळे लागून राहिले होते. अशा विवंचनेंत कुत्बशाहा आहे असें पाहून वेंकटपतीनें कोंडविडावर मोठें सैन्य पाठविलें. कुत्बशाहानें आदिलखान बंगशला त्याच्या प्रतिकारार्थ रवाना केलें. विजयानगरचें सैन्य कममला तळ देऊन राहिलें व आदिलखानाचें कोंडविडाजवळ येऊन बसलें. लढाई झाली नाहीं. याच सुमारास राजमहेंद्री व एल्लोर येथील सैन्य कासिमकोट्याच्या बंदोबस्तास गेल्यामुळें तेथील रेडीआर जमीनदारांनीं बंड केलें व नीरडोल व एल्लोर लुटलें. धर्माराव व आदिलखान बंगश यांस तिकडे जावें लागलें. त्यांनीं बऱ्याच प्रयत्नानें तें बंड मोडलें. नंतर आदिलखान व मीर झैनुल अबिदिन गोवळकोंड्यास परतले.

[ हि. १००५ (१५ आगस्ट १५९६ ते ४ आगस्ट १५९७) इ. स.].— राऊतराव यानें कासिमकोटा येथें बंड केलें. मदतीस हरिश्चंद्रास मिळविलें. जंगलांत राहून हल्ले चढवूं लागला. एका हल्ल्यांत तो मारला गेला. हरिश्चंद्र वैजनाथदेवाच्या आश्रयास पळाला.

[ हि. १००६ (५ आगस्ट १५९७ ते २४ जुलै १५९८ इ. स. )].— वैजनाथदेव व मुकुंदराज यांस मदत घेऊन हरिश्चंद्रानें जुरजुऱ्यास वेढा दिला. मलिक नायबनें किल्ला लढविला. त्याच्या मदतीस चंगीजखान आला. तेव्हां वैजनाथ व

१४३. बु. इ. मा., इं. अॅ., व्हॉ. LII–१९२३, पृ. ३३८-४६.

हरिश्चंद्र मीर झैनुल अबिदिनवर चालून गेले. परंतु त्यांना माघार घेऊन वीरुत्तमच्या आश्रयास जावें लागलें. मुसलमानी सैन्य नारायणपट्टणास राहिलें. याच वेळीं मुंकुदराजानें जलमुराहून येऊन महमद कुली कुत्बशाहाबादेस वेढा दिला. परंतु बैजनाथदेवाचा पराभव झालेला ऐकून त्यानें तो उठविला. चंगीजखानानें त्याचा दोन महिनेपर्यंत पाठलाग केला. बैजनाथानें मुकुंदराजास कुमक पाठविली. तींत हरिश्चंद्र होता. परंतु चंगीजखानानें मुकुंदराजाचा पराभव केला. तेव्हां बैजनाथदेवानें कुत्बशाहाबरोबर मैत्रीचा तह केला.

[ हि. १००७ (२५ जुलै १५९८ ते १३ जुलै १५९९ इ.स.) ].—मुकुंदराजावर चंगीजखान चालून गेला. बेलुरास गाठला. दोन दिवस लढाई झाली. मुकुंदराज बंगाल्यांत गेला. जलमुर चंगीजखानानें घेतला. सर्व कासिमकोटा प्रांतांतून बरीच खंडणी वसूल केली.

[ हि. १००८ (१४ जुलै १५९९ ते २ जुलै १६०० इ. स.) ].—राऊतरायाचा मुलगा कृष्णराव यानें मुकुंदराजास बोलावून बंड केलें. पोतनूर व मदवाड घेतला. चंगीजखान, धर्माराव व बळीराव चालून गेले. एक दिवस लढाई झाली. कृष्णराव मदवाडास गेला. किल्ला बिकट, धर्मारावनें मुकुंदराजास त्याचें राज्य परत देऊन मांडलिक करून या प्रांतांत शांतता स्थापावी म्हणून सुचविलें. तें मीर झैनुल अबिदिनास मानवलें नाहीं. परंतु कुत्बशाहानें मीर झैनुलास परत बोलावलें. त्याच्या जागीं सय्यद हुसेनची नेमणूक केली.

[ हि. १००९ (३ जुलै १६०० ते २१ जून १६०१ इ. स.) ].—सय्यद हुसेननें प्रथम हरिश्चंद्रास त्याचें राज्य परत दिलें व मुकुंदराजाचा कांटा दूर करण्याची अट घातली. मुस्तफाबाद, कुत्बशाहाबाद व अहमदाबाद असे तीन नवीन किल्ले बांधले. मुकुंदराजानें महमदाबादेवर हल्ला चढविला. परंतु त्यांत कृष्णराय मारला गेला. मुकुंदराजानें सदाशिवराय पाठविला. तोहि मारला गेला. नंतर मुस्तफाबादेवर अग्निराजानें हल्ला चढविला. त्यांत तो व भूपणराज मारले गेले. सय्यद हुसेननें मदवाडास वेढा देऊन तो घेतला. तेव्हां मुकुंदराज पुन्हां बंगल्यांत गेला.[१४४]

---

१४४. याच सुमारास वेंकटपतीनें कुत्बशाही मुलुखांत स्वारी केली, आणि त्याच्या व कुत्बशाही सैन्याच्या बऱ्याच झटापटी झाल्या असें इ. स. १६०१ मेच्या ताम्रपटांत म्हटलें आहे. (The Vilappakam Plates; V. R. i., N. Arcot, 663 A; E. I. iv, 269) सिवेलकृत 'दक्षिण हिंदुस्थानांतील ऐतिहासिक शिलालेख', पृ. २६८.

हि. १०१० (२२ जून १६०१ ते १० जून १६०२ इ. स. ).—कासिमकोटा राज्याच्या लहान लहान जहागिरी पाडून त्या वाटण्याच्या कामावर सूर्यरावाची नेमणूक झाली. त्यानें येऊन सर्व बंदोबस्त केला. त्यालाच या परगण्यावर सुभेदार नेमलें.

याच वेळीं मीर महमद अमीन अस्त्रावादी यास मीर जुम्लत व दोन लाख होनांचा तनखा दिला.

अलीमर्दनखानानें तेलंगणांत शिरून लुटालुट केली. तेव्हां कुत्बशाही सैन्यानें त्याचा पराभव करून त्याला तेलंगणांतून काढून लावलें.[१४५]

हि. १०१२ (१ जून १६०३ ते १९ मे १६०४ इ. स. ).—ओग्झलू सुलतान नांवाचा इराणचा येलची महमद कुली कुत्बशाहाच्या दरबारांत आला. तो नंतर पांच वर्षांनीं परत गेला.

गंजम व विजगापट्टण प्रांतांत मुकुंद भाईबुलंदरचा पुन्हां पराभव झाला.[१४६]

हि. १०१७ (७ एप्रिल १६०८ ते २६ मार्च १६०९ इ. स. ).—बरेच परदेशीय मुसलमान हैद्राबादेस येऊन राहिले होते. त्यांनीं राजमहालांत दंगा केला. या कारणावरून दक्षिणी लोकांनीं त्यांची कत्तल व लुटालुट करण्यास प्रारंभ केला. नंतर मीर जुम्ल्यानें ही कत्तल व लुटालुट थांबविली.

हि. १०१८ (२७ मार्च १६०९ ते १५ मार्च १६१० इ. स. ).—शहा राजूच्या चिथावणीवरून महमद कुली कुत्बशाहाचा धाकटा भाऊ मिर्झा महमद खुदाबंडा यानें अब्दुल करीम व अनवरखानाच्या साहाय्यानें बंड केलें. परंतु कुत्बशाहानें पुढाऱ्यांस पकडून त्यांस गोवळकोंड्याच्या किल्ल्यांत कैद केलें. खुदाबंडा हि. १०२० (१६११ इ. स. )त मृत्यू पावला.

दिल्लीच्या जहांगीर बादशाहानें मुलतान परवीजला दक्षिण हिंदुस्थानच्या मोहिमेवर पाठविलें. याचा फायदा घेऊन हिंदु राजांनीं पुन्हां बंडास सुरुवात केली. वैजनाथदेवानें कासिमकोट्याच्या मुसलमानी सैन्यावर हल्ले चढविण्यासाठीं सैन्य रवाना केलें. त्या सैन्यानें बराच धुमाकूळ घातला. चंगीजखान व धर्माराव सय्यद हुसेनच्या मदतीस आले. वैजनाथाचा पुतण्या कृष्णराज व इतर सरदार कुत्बशाहास

१४५. इलिअट डॉसन, व्हॉ. ६, पृ. १०२ व ३१४.

१४६. श्रीकूर्मम् व विजगापट्टणचे शिलालेख, सिवेलकृत 'दक्षिण हिंदुस्थानांतील ऐतिहासिक शिलालेख', पृ. २६९.

मिळाले. लढाई होण्यापूर्वीच वैजनाथ म्हातारपणामुळें वारला. तेव्हां त्याला पुत्र नाहीं म्हणून कुत्बशाही सरदार धर्मराव यानें कृष्णराजास गादीवर बसविलें व खंडणी घेऊन मांडलिक केलें.

हि. १०१९ (१६ मार्च १६१० ते ५ मार्च १६११ इ. स.).—बस्तरचा[१४७] राजा प्रतापशा यानें कुत्बशाही मुलखांत लुटालुट केली. असीरावास त्याच्यावर पाठविलें. असीरावनें त्याचा पराभव केला व बस्तरपर्यंत पाठलाग केला. परंतु किल्ल्यास वेढा देण्याचें सामर्थ्य नाहीं हें पाहातांच कुमक मागितली. मीर महमद अमीन मदतीस आला. परंतु प्रतापशानें झुलवणी देऊन मुसलमानी सैन्यास बराच ताण पाडला. पावसामुळें तर मुसलमानी सैन्यास त्या प्रांतांत राहणेंच कठीण झालें. तेव्हां तें सैन्य माघारां फिरलें. पावसाळयानंतर मलिक बिलेसखान हा मीर महमद अमीनच्या मदतीस गेला.

हि. १०२० (६ मार्च १६११ ते २२ फेब्रुवारी १६१२ इ. स.).—महमद कुली कुत्बशाहा दोन दिवसांच्या आजारानंतर शनवार चं. १७ जिल्काद हि. १०२० (१७ डिसेंबर १६११ इ. स.) रोजीं मृत्यु पावला.[१४८] या वेळीं परदेशीय मुसलमानांवर दक्षिणी लोक चालून जाऊं लागले. परंतु शहर कोतवालानें लोकांस आंवरून धरून महमद कुत्बशाहाच्या तख्तारोहणाकडे नेलें.

येथपर्यंतची हकीकत 'तरिख-इ-महमद कुली कुत्बशाहीं'तून दिली. यापुढील महमद कुत्बशाहाची हकीकत मुख्यतः हादिकत-अल-अलममधूनच घेतली आहे. हादिकत-अल-अलमच्या बाहेरील जो मजकूर येईल त्यास नेहमींप्रमाणें आधाराच्या टीपा देण्यांत येतील.

**१७. महमद कुत्बशाहा**:—महमदाचें टोपण नांव 'झिल्ले इलाहि' असें होतें. याचा जन्म बुधवार चं. २३ रज्जब १००१ हि. (१५ एप्रिल १५९३ इ. स.) रोजीं सकाळीं झाला.[१४९] याचा बाप मिर्झा मुहम्मद अमीन हा महमद कुली

---

१४७. बस्तर—वारंगळच्या ईशान्येस १५० मैल, बस्तर संस्थान, सी. पी.

१४८. ए. इं. मॉ., १९०७-८, पृ. २६ व १९१५-१६, पृ. ३१.

१४९. महमदाचे कबरीवरील शिलालेखांत तो चं. २३ रज्जब महिन्यांत जन्मला असें लिहिलें आहे. ए. इं. मॉ. १९०७-८, पृ. २६ व १९१५-६ पृ. ३२ व ३०८. परंतु हादिकतमध्यें रबिलाखर महिना दिला आहे. बहुधः हादिकतमध्यें रज्जब ऐवजी रबिलाखर चुकीनें पडलें असावें.

कुत्बशाहाचा सर्वांत धाकटा सख्खा भाऊ. हा २७ मार्च १५९६ इ. स. रोजीं वारलेला.[१५०] नंतर त्याचा चुलता महमद कुली कुत्बशाहा यानेंच महमदाचें पालनपोषण केलें. यास कुराण शिकविण्यासाठीं काझी मुहम्मद सम्नानी यास ठेवलें होतें. चांद मिया युसुफ नांवाच्या एका युद्धकलेंतील निष्णात सरदारानें महमदास युद्धकला शिकविली. महमद मोठा झाल्यानंतर त्याला महमद कुली कुत्बशाहानें आपली हयात बख्क्ष नांवाची कन्या हि. १०१६ (१६०७ इ. स.)त दिली[१५१] व अशा तऱ्हेनें पुतण्या व जांवई या दोन्ही नात्यांनीं महमद राज्याचा वारस झाला.

हि. १०२० (६ मार्च १६११ ते २२ फेब्रुवारी १६१२ इ. स.).—महमद कुली वारल्यानंतर त्याची बायको व तिचा भाऊ कमालउद्दिन आर्दिस्तानी ऊर्फ मुस्तफाखान यांनीं सोमवार चं. १७ जिल्काद हि. १०२०[१५२] (११ जानेवारी १६१२ इ. स.) रोजीं सकाळीं मीर महमद मोमीन पेशवा याच्या हस्तें महमदास तख्तारोहण करविलें. महमदाच्या अभिनंदनार्थ इब्राहीम आदिलशाहाकडून मीर महमद ताकी व मुर्तुझा निझामशाहाकडून मीर अबुल फत्तह हे बरेच नजरनजराणे घेऊन गोवळकोंड्यास जिल्हेज महिन्यांत (फेब्रुवारी १६१२ इ. स.) आले. त्यांचा चांगला मानमरातब ठेवून त्यांची कुत्बशाहानें बोळवण केली.

हि. १०२१ (२३ फेब्रुवारी १६१२ ते १० फेब्रुवारी १६१३ इ.स.).—इ. स. १६१०त महमद कुलीनें बस्तरचें राज्य काबिज करण्यासाठीं मीर महमद मोमीनास पाठविलें होतें. परंतु राज्य काबीज न होतां खंडणी घेऊनच त्याला परत यावें लागलें. मीर महमद मोमीनास हें राज्य घेण्याची आकांक्षा फार होती. म्हणून सय्यद कमालउद्दिनास सरलष्कर करून व त्याच्या मदतीस सय्यद हैदर हवालदार, आरबखान, चित्ताखान व इतर सरदार देऊन त्याला मोठ्या सैन्यासह हि. १०२१च्या जमादिलाखर महिन्यांत (आगस्ट १६१२ इ. स.) रवाना केलें. हें कुत्बशाही सैन्य सरहद्दीवर जातांच बस्तरचा प्रतापशा शरण आला व त्यानें आपल्या सरदारांसह पुष्कळ नजरनजराणे पाठविले. सय्यद कमालउद्दिनानें बस्तरच्या राजाचें मागणें कुत्बशाहास कळविलें व कुत्बशाहानें फर्मान काढून प्रतापशास त्याचें राज्य त्याला

१५०. त. इ. म. कु., पृ. ४४५, व टीप १२४ महा.

१५१. त. इ. म. कु., पृ. ४७६.

१५२. महमदाचे कबरीवरील शिलालेख, ए. इं. मॉ., १९१५-१६, पृ. ३२, ३११ व १९०७-८, पृ. २६.

उपभोगण्यास दिलें. तेव्हां त्यानें कुत्बशाहास बरेच हत्ती पेशकश म्हणून नजर दिले. कुत्बशाही सैन्य राजधानीस परत आलें.

हि. १०२३ (१ फेब्रुवारी १६१४ ते २० जानेवारी १६१५ इ. स.).— इराणच्या शाहा आबासकडून हुसेन बेग कच्चीबशी नांवाचा वकील आला. तो प्रथम दाभोळास आला. तेव्हां त्याच्या सत्कारार्थ मिर्झा झैनुल अबिदांनीस तेथें पाठविलें. राज्याचे सरहद्दीवर कुलीखानानें जाऊन त्या वकीलाचा सत्कार केला. हुसेन बेगची कुत्बशाहानें महमदनगर किल्ल्यांतील काळाचबुतऱ्यांत चं. १० रज्जब १०२३ हि. (५ आगस्ट १६१४ इ. स.) रोजीं भेट घेतली. त्या वेळीं त्यानें पातशाहाकडून आणलेला रत्नखचित मुकुट, तरवार व खंजीर पट्ट्यांसह, पन्नास उत्तम घोडे वगैरे नजर केले. हुसेन बेग गोवळकोंड्यास दोन वर्षे चार महिने राहिला. त्याला वार्षिक वीस हजार होन खर्चास देत असत.

हि. १०२५ (१० जानेवारी ते २९ डिसेंबर १६१६ इ. स.).—शाहा आबासकडून आलेला हुसेन बेग जिल्काद (नवंबर) महिन्याच्या तिसऱ्या आठवड्यांत इराणांत जाण्याकरितां बऱ्हाणपुरास गेला. त्यास निरोप देतांना कुत्बशाहानें पातशाहासाठीं बऱ्याच हिंदी मौल्यवान चिजा वगैरे नजर पाठविल्या. शिवाय चार हजार होन खर्चास दिले. त्याच्याबरोबर शेख महमद खाटून यास दिलें.

वाळापूर व फत्तेपूर यांचे दरम्यान मलिक अंबरानें मोंगली सैन्याशीं जहांगीरच्या जुलुस १०च्या बहमन महिन्याचे अखेरीस (फेब्रुवारी १६१६ इ. स.) लढाई दिली. त्या वेळीं कुत्बशाही सैन्य त्याचे मदतीस गेलें. मलिक अंबराचा या लढाईत पराभव झाला.[१५३]

हि. १०३० (१६ नवंबर १६२० ते ५ नवंबर १६२१ इ. स.).— मलिक अंबराच्या नेतृत्वाखालीं दक्षिणी सैन्याचा मोंगली सैन्यानें पुन्हां पराभव केला. मलिक अंबरानें घेतलेला मुलुख परत देऊन व ५० लाख रुपये खंडणी देऊं करून मोंगलाशीं तह केला. यापैकीं २० लाख कुत्बशाहास द्यावे लागले.[१५४अ]

हि. १०३३ (१५ आक्टोबर १६२३ ते २२ सप्टेंबर १६२४ इ. स.).— परवीज व महाबतखानानें शहाजहानाचा पाठलाग केला. तेव्हां तो १२ आक्टोबर रोजीं गोवळकोंड्याच्या राज्यांत शिरला. परवीजनें त्याचा पाठलाग करण्याचा

---

१५३. वाकियात–इ.–जहांगिरी, इलिअट व डॉसन, व्हॉ. ६, पृ. ३४३–४.

१५३अ. वेणी प्रसादकृत 'हिस्टरी ऑफ जहांगीर,' पृ. ३२९.

सोडून (जहांगीरच्या) १८ जुलुसच्या १ आबान (१४ आक्टोबर १६२३ इ. स.) रोजीं तो परत फिरला. शहाजहान मच्छलीपट्टणास ता. ५ नवंबर १६२३ इ. स. रोजीं आला. मोंगली सरदारानें शहाजहानला राज्यांत येऊं देऊं नये, काढून लावावें म्हणून कुत्बशाहास लिहिलें. कुत्बशाहानें त्यास दाणागोटा वगैरे पुरवून त्याला बंगाल-कडे जाण्यास मदत केली.[१५४]

हि. १०३४ (२३ सप्टेंबर १६२४ ते १२ सप्टेंबर १६२५ इ. स.).—मलिक अंबर कुत्बशाहाकडून 'झर-इ-मुकर्रीरी' वसूल करण्यासाठीं गोवळकोंड्याच्या सरहद्दीवरील कंदाहारला आला. हा वसुल गेलीं दोन वर्षे थकला होता. तो वसूल घेऊन व कुत्बशाहाशीं मैत्रीचा तह कायम करून बिदरावर गेला.[१५५]

शहाजहान बंगाल्यांत पराभूत झाल्यामुळें व मलिक अंबरास मिळण्यासाठीं म्हणून कुत्बशाहींतून परत दक्षिणेंत आला. खुर्रम पुन्हा मच्छलीपट्टणास आला. त्या वेळीं त्याचेजवळ बरेंच सैन्य होतें. त्यामुळें तेथील लोक भिऊन पळाले. डच्यांनींहि आपला माल गलबतांत भरला, तेव्हां कुत्बशाही अधिकाऱ्यांनीं डचांस नगररक्षणार्थ मदत देण्याविषयीं विनंति केली. त्यांनीं नाखुषी दाखविली. कुत्बशाहानें डच गव्हर्नरास गोवळकोंड्यास बोलाविलें. परंतु तो जाईना. तेव्हां त्यास मारहाण व कैद करून तेथें नेलें.[१५६]

हि. १०३५ (१३ सप्टेंबर १६२५ ते २ सप्टेंबर १६२६ इ. स.).—महमद कुत्बशाहा रबिलाखरच्या अखेरीस (२३-४ जानेवारी १६२६ इ. स.) आजारी झाला. त्याला ताप आला. त्याची आई व मनसूरखान ऐन उल्मुल्क हबशी हवालदार यांनीं हकीम व वैद्य बोलाविले. औषध देण्यांत त्यांचा बराच मतभेद

---

१५४. वाकियात-इ-जहांगिरी, इलिअट व डॉसन, व्हॉ. ६, पृ. ३८९-९१; मच्छलीपट्टण ते सुरत, पत्र, १२ नवंबर १६२३चें, इंग्लिश फॅक्टरीज इन इंडिया, भाग २, फोस्टरकृत, पृ. ३१३; परचास, त्याच्या सफरी, व्हॉ. ३, पृ. २२१.

१५५. इकबल-नामा-इ-जहांगिरी, इलिअट डॉसन, व्हॉ. ६, पृ. ४१२ व ४१४. फुझून अस्त्राबादीचा 'फतुहत्-इ-आदिलशाही' पृ. २८८ब सर जदुनाथ सरकारचें भाषांतर—इंडिअन हिस्टॉरिकल क्वार्टरली, व्हॉ. ९, अं. ३, सप्टेंबर १९३३, पृ. ६४०; वेणीप्रसादकृत 'हिस्टरी ऑफ जहांगीर' पृ. ३८०.

१५६. इकबल-नामा-इ-जहांगिरी, इलिअट-डॉसन, व्हॉ. ६, पृ. ४१६ व सारसंग्रह, पृ. ५१; मच्छलीपट्टण ते बटेबिया, आक्टोबर १६२७चें पत्र, हेग ट्रॅन्सिक्रिप्टस, व सुरत तें लंडन २९ नवंबर १६२६चें पत्र इंडियन फॅक्टरीज इन इंडिआ, भा. २, पृ. ३१६ व १५१.

झाला. शेवटीं पांच दिवस वैद्यांकडून औषध देवविलें. आठव्या दिवशीं महमद कुत्बशाहाची तब्येत बरीच नादुरुस्त झाली. अबुदुल्लास राज्य द्यावें व चवदा हजार इब्राहीमशाही होन धर्मार्थ वाटावेत असें त्यानें सांगितलें. नंतर बुधवार चं. १३ जमादिलावल १०३५ हि. ( १ फेब्रुवारी १६२६ इ. स. ) रोजीं सकाळीं पहिल्याच तासांत त्याचें प्राणोत्क्रमण[१५७] झालें. महमद कुत्बशाहानें गुल्बाद नांवाचा घुमट मोहरम हि. १०३५ ( आक्टोबर १६२५ इ. स. )त पुरा केला[१५८]. त्यांतच त्याला दफन केलें.

महमद कुत्बशाहानें निआमतउल्लाखान यास प्रथम मिर जुम्ला नेमलें. तो हि. १०२८ ( १६१९ इ. स. )त वारला. नंतर त्याचा जांवई मिर्झा शरिफ हा त्याच्या जागेवर आला. तो हि. १०३० ( १६२१ इ. स. )त वारल्यानंतर मुझाफर अली डबीर हा मिर जुम्ला झाला. पण तोहि हि. १०३२ ( १६२३ इ. स. )त मेला. तेव्हां महमद हुसेन शिराझी यास मिर जुम्लत मिळाली. हाहि हि. १०३३ ( १६२४ इ. स. )त वारला. नंतर हुसेन मुआलिम मिर जुम्ला झाला. मीर महमद मोमीन अस्त्राबादी यांजकडे पेशवाई होती. तो महमदशाहापूर्वी थोडींच वर्षे वारला. नंतर कोणालाहि पेशवा न नेमतां महमद कुत्बशाहानें स्वतःच कारभार पाहिला. अखेरीस कांहीं महिने पेशवाई ख्वाजा मुझाफरकडे होती. तो वारल्यानतर मीर महमद रेझाईस पेशवा केला होता.

महमद कुत्बशाहास पांच मुलें झालीं:—

१. सुलतान अबदुल्ला. जन्म—चं. २८ सव्वाल १०२३ हि. ( २१ नवंबर १६१४ इ. स. ).

२. मुलगी. हिला इ. स. १६३३त महमद आदिलशाहास दिली.

३. सुलतान अली ऊर्फ इब्राहीम मिर्झा. जन्म हैद्राबादेस सोमवार चं. २८ सव्वाल हि. १०२५ ( २३ नवंबर १६१६ इ. स. ). हा इब्राहीम आदिलशाहाच्या मुलीपासून झाला. तो १०३७ हि. ( १६२८ इ. स. )त वारला.

४ व ५. खुर्शीद बिबीपासून दोन मुलगे झाले.

महमद कुत्बशाहानें पुढील इमारती बांधल्या:—

---

१५७. महमद कुत्बशाहाचे कबरीवरील शिलालेख, ए. इं. मॉ., १९०७-८, पृ. २६ व १९१५-१६, पृ. ३२ व ३११.

१५८. ए. इं. मॉ., १९१७-१८, हैद्राबादेंतील कुत्बशाही शिलालेख, पृ. ५५.

१. मस्जिद इ-जमिआ. ही हैद्राबादेस बांधली. तीस लाख होन खर्च झाला. परंतु ती अपुरी राहिली. अबदुल्ला व अबुल हसननें ती पुरी करण्याचें काम चालू ठेवलें होतें. राहिलेला भाग औरंगजेबानें बांधला. ही आतां 'मक्का मस्जिद' या नांवानें संबोधली जाते.

२. हैद्राबादेच्या पूर्वेस मुलतान नगर वसविलें.

३. गोवळकोंडा किल्ल्याचा तट बांधला.

४. गोवळकोंड्याजवळ मुलतानपूर वसविलें.

५. इलाहि महाल, नवीन दाद महाल व महम्मदी महाल बांधले.

६. बाग-इ-मुहम्मदशाही लावली. बागेंत मोठमोठ्या टोलेजंग इमारती उठविल्या.

महमद कुत्बशाहाची कविता बरीच असावी. हा 'झिल्ले-इलाहि' या टोपण नांवानें ती लिही. कांहीं वेंचे तरीख-इ-कुत्बशाहींत व हदीकतमध्यें दिले आहेत. याला वाचनाचा बराच नाद असे. निरनिराळ्या पुस्तकांतून काढलेल्या उताऱ्यांचें त्याचें भलें मोठें पुस्तक झालें होतें असें म्हणतात.

**१८. हयात बख्क्ष बेगमः**— महमद कुली कुत्बशाहाची एकुलती एक मुलगी हयात बख्क्ष बेगम हिचा जन्म बहुधः १५९५-६ इ. स.च्या सुमाराचा असावा. महमद कुली कुत्बशाहानें तिचा सख्खा चुलतभाऊ महमद याच्याशीं इ. स. १६०७ त तिचें लग्न केलें. त्या वेळीं महमदाचें वय १५ वर्षांचें होतें. हिला अबदुल्ला इ. स. १६१४त झाला व नंतर एक मुलगी झाली. तिला महमद आदिलशाहास इ. स. १६३३त दिली.[१५९] महमद कुत्बशाहा वारला तेव्हां अबदुल्लाचें वय अवघें अकरा वर्षांचें होतें. त्यामुळें राज्यकारभार तीच पाहात असे. हिनें हयातनगर वसविलें. औरंगजेबानें गोवळकोंड्यावर इ. स. १६५६ त स्वारी केली त्या वेळीं हिनेंच चतुराईनें राज्यावरील तें मोठें संकट टाळलें.[१६०] अबदुल्ला मोठा झाला तरी आपल्या आईच्या सल्ल्यानें चालत असावा असें दिसतें. हिच्या खाजगीकडे

---

१५९. परिशिष्ट २, पृ. ४९–५५; महनदनामा, (प्रो. वर्मा) शिवाजी निबंधावली, २, पृ. ८४.

१६०. परिशिष्ट २, पृ. ७३.

अबदुल्ला कुत्बशाहानें बरींच गांवें इनाम दिलीं होतीं.[१६१] हयात बख्क्ष बेगम मंगळवार चं. २८ साबान १०७७ हि. ( १२ फेब्रुवारी १६६७ इ. स. ) रोजीं रात्रीं वारली.[१६२]

१९. अबदुल्ला कुत्बशाहाः—अबदुल्ला मिर्झा सोमवार चं. २८ स्व्वाल हि. १०२३ ( २१ नवंबर १६१४ इ. स. ) रोजीं ७ तास ५४ मिनिटांनीं जन्मला.[१६३]

अबदुल्लास प्रथम निआमतुल्ला शिकवीत असे. परंतु अबदुल्ला पांच वर्षांचा झाला तेव्हां तो वारला. नंतर निआमतुल्लाचा जांवई मिर्झा शरीफ यानें तो आठ वर्षे होईपर्यंत शिकविलें. मलिक मुबारक व मलिक युसुफ हे अबदुल्लाला सोबती दिले. मिर्झा शरीफानंतर ख्वाजा मुझाफर अली डबीर याची अबदुल्लाचा शिक्षक म्हणून नेमणूक झाली. परंतु हाहि दोन वर्षांनीं मेला; तेव्हां महमद हुसेन शिराझीस त्याचे जागीं नेमलें. अबदुल्ला दहा वर्षांचा असतांच हुसेन वारला. नंतर त्याचे जागीं हुसेन मुआलिम नेमला. हुसेन मुआलिम बरींच वर्षे जगला व शेवटीं त्याच्या ८०व्या तो वर्षी वारला.[१६४]

हि. १०३३ ( १५ आक्टोबर १६२३ ते ३ आक्टोबर १६२४इ.स.).—अबदुल्ला मिर्झा दहा वर्षांचा झाला, तेव्हां मोठ्या समारंभानें त्याचा प्रथम दरबारप्रवेश साजरा केला. पुष्कळ बक्षिसें दिलीं व दानधर्महि केला.[१६५]

---

१६१. परिशिष्ट २, पृ. ४७.

१६२. हयात बख्क्ष बेगमच्या थडग्यावरील शिलालेखावरून हदिकत-अल-अलममध्यें (परिशिष्ट २, पृ. ६७) ती मंगळवार चं. २८ साबान १०८० हि. ही तारीख दिली आहे. परंतु याच लेखाचें मंगळवार चं. २८ साबान १०७७ हि. हें ए. इं. मॉ., १९०७-८ पृ. २६वर व १९१५-१६, पृ. ३५ वर वाचन दिलें आहे. वार, तारीख व महिना सर्वांनीं सारखाच दिला आहे. फक्त हिजरी सनांत मतभेद आहे. दोन्हीहि वर्षी २८ साबानला मंगळवार येतो. बहुधः हदीकत अलममधील वाचन चुकीचें असावें.

१६३. परिशिष्ट २, पृ. ६७; ए. इं. मॉ. १९०७-८, पृ. २६ व १९१५-१६, पृ. २६ व ४०.; ह. अ. अ. ( लि. ), पृ. २७४.

१६४. ह. अ. अ. ( लि. ), पृ. २७६-७.

१६५. ह. अ. अ. ( लि. ), पृ. २७७.

हि. १०३५ ( २३ सप्टेंबर १६२५ ते ११ सप्टेंबर १६२६ इ. स. ).— महमद कुत्बशाहा १ फेब्रुवारी १६२६ रोजीं वारला. कांहीं लोकांनीं गडबड करण्यास सुरुवात केली. तेव्हां मनसुरखान हबशी, मलिक अलमास, मलिक युसुफ व मलिक अंबर हे बंड मोडण्याच्या खटपटीस लागले. कासिम बेग कोतवाल यानें आपल्या लोकांनिशीं बाजारपेठेंतील चावडींत जाऊन बंडखोरांस दहशत बसविली. हसेन बेग नायब कोतवाल यास चहार-मिनार येथें ठेविलें. दुसरे दिवशीं चं. १४ जमादिलावल १०३५ हिजरी ( २ फेब्रुवारी १६२६ ) रोजीं सकाळीं महमदी महालांत अबदुल्ला मिर्झास तख्तारोहण करविलें. नंतर बाजारपेठेंत व इतरत्र तख्तारोहण झाल्याचा हत्तीवरून डंका पिटविला. सर्व दरबारी लोकास त्यांच्या इतमामाप्रमाणें बक्षिसें दिलीं. पुष्कळ दानधर्म केला. सर्व कैद्यांची मुक्तता केली.[१६६]

अबदुल्लाच्या तख्तारोहणाच्या अभिनंदनार्थ इब्राहीम आदिलशाहाकडून शहा अबुल हसन व बुऱ्हाण निजामशाहाकडून मीर जाफर आला. खुर्रम ऊर्फ शहाजहानाकडून इखलासखान काज्विनी आला. अबदुल्ला कुत्बशाहास नजरनजराणे दिले व अबदुल्लानेंहि प्रत्येकाच्या योग्यतेनुरूप नजरनजराणे देऊन आलेल्या वकिलांस सन्मानानें निरोप दिला.[१६७]

अबदुल्ला कुत्बशाहा लिंगमपल्ली येथें महमद कुली कुत्बशाहानें मोठा बाग लावून त्यांत टोलेजंग इमारती उभारल्या होत्या तेथें गेला. एक आठवडाभर महोत्साह करून शेजारील टेकडीवर बांधलेल्या हुसेनसागरावर जाऊन राहिला. तेथें १४ जून १६२६ रोजीं व नंतर एक आठवडाभर जन्मदिवसोत्साह केला. पावसाळ्यांत तो तेथेंच राहिला.[१६८]

महमद कुत्बशाहानें मीर महमद मोमीन वारल्यानंतर कांहीं वर्षे पेशवाई कोणासच दिली नव्हती. परंतु शेवटीं ती त्यानें ख्वाजा मुझाफर यास दिली व तोहि मेल्यानंतर मीर महमद रेझाई यास दिली होती. परंतु त्या जागेस तो लायक नाहीं असें वाटल्यावरून आणि हुशार व चांगला पेशवा नेमावा या इच्छेनें महमद

---

१६६. निजाम-उद्दीन अहमदचा उतारा, ह. अ. अ. ( लि. ), पृ. २८२ व ३०१; ए. इं. मॉ., १९०७-८, पृ. २६ व १९१५-१६, पृ. ४०.

१६७. ह. अ. अ. ( लि.), पृ. ३०२–३.

१६८. ह. अ. अ. ( लि. ), पृ. ३०५.

कुत्बशाहाच्या आईनें आपला जांवई व शहा अली अरब शहा पीरजादे याचा मुलगा शहा महमद यास पेशवा केलें. शेख महमद ऊर्फ इब्न-इ-खातून यास नायब पेशवा नेमलें व त्यास डबीरीचेंहि काम सांगितलें. मनसुरखान हबशी रेकाबी लष्कराचा हवालदार होता त्यास महमद कुत्बशाहानें ख्वाजा अफजल तुर्कची मीर जुम्लत दिली होती. परंतु मनसुरखानास नीटसा कारभार करितां येईना व त्याला चांगलेसें लिहितांहि येत नव्हतें. त्यामुळें तो ब्राह्मण कारकुनांच्या आहारीं गेला. मलिक युसुफ, मलिक अंबर यांसारखे विश्वासू ख्वाजा सराई काढून टाकले. त्यानें गुर्जी व हबशी लोकांची एक लढाऊ गुलामांची तुकडी ठेवली होती. त्यांतील चौघांस फिरुझखान, आदमखान, याकुतखान व हमीदखान अशा पदव्या देऊन त्यांना सरदाऱ्या दिल्या. कासिम बेग कोतवालीच्या जागेवर, हसन बेग शिराझी नायब कोतवालीवर, कासिम बेग आर्दिस्तानी नाझिर-उल्मुल्कीवर कायम ठेवले. ख्वाजा अफजल तुर्कला मनसुरखानाच्या शिफारशीवरून सर खायली पुन्हां बहाल केली. इतिमतरावाकडे हिंदी फर्मानांची डबीरी, नारायणरावाकडे मुजुमदारी व सूर्यरावाकडे सबनिविशी पूर्ववत् चालविली. भर्मीराव व असीरावासारख्या नायकवाडींचेहि इतमाम पूर्ववत् चालविले.[१६९]

हि. १०३६ ( १२ सप्टेंबर १६२६ ते १ सप्टेंबर १६२७ इ. स.).— कुत्बशाहींत हजरत हसन व हुसेन यांच्या निधनानिमित्त ताजियाचा उत्सव मोहरमांत होत असे. अब्दुल्ला कुत्बशाहानें तोच रिवाज पुढें चालविला. याकरिता दरवर्षी बारा हजार होन खर्च होत. काळे व निळे कपडे देण्यांत येत. दाद महालाच्या पटांगणांत दोन मंडप उभारून त्यांत चवदा पंजे ठेवीत. सालाबादप्रमाणें या वर्षीहि चं. ६ मोहरम ( १७ सप्टेंबर १६२६ इ. स. ) रोजीं उत्सव चालू झाला. चं. १० मोहरमचे ( २१ सप्टेंबर १६२६ इ. स. ) रात्रीं पंजांची मिरवणूक निघाली. मिरवणुकींत अब्दुल्ला कुत्बशाहा अनवाणी चालत असे.[१७०]

मोहरममधील ताजियाच्या उत्सवाप्रमाणें कुत्बशाहींत महमद पैगंबराच्या जन्मदिवसाचा उत्सव होत असे. तो महमद कुत्बशाहानें बंद केला होता. त्यास पुन्हां सुरुवात झाली. चं. १७ रबि-उल-अव्वल हा महोत्सवाच्या मुख्य दिवस असे.

१६९. इ. अ. अ. ( लि. ), पृ. ३०३-५

१७०. इ. अ. अ. ( लि. ), पृ. ३०८-९.

दादमहालासमोरच हा उत्सव बारा दिवस चाले. यासाठीं दर वर्षी तीस हजार होन खर्च होत असत. या वर्षी हा जन्मदिवस २६ नवंबर १६२६ इ. स. रोजीं होता.[१७१]

हि. १०३७ ( २ सप्टेंबर १६२७ ते २० आगस्ट १६२८ इ.स.).—कासिम बेगनें मनमुरखानाच्या लोकांनीं अपमान केल्यावरून कोतवालीचा चं. ९ मोहरम ( १० सप्टेंबर ) रोजीं राजिनामा दिला. ही जागा लाहोरच्या मिर्झा सय्यद महमद अस्फहानी यास देण्याचा मनमुरखानाचा विचार होता. त्यास त्यानें बोलाविलें. परंतु त्याला येण्यास कालावधि लागेल म्हणून मनमुरखानानें मच्छलीपट्टणच्या मुल्ला महमद तकी तफ्रशी यास बोलावून आणलें. परंतु त्यास तीन महिनेपर्यंत कुत्बशाहाची भेटच झाली नाहीं. सरतेशेवटीं नायब कोतवाल हसन बेग यानें त्या जागीं दरम्यान चांगलें काम केल्यावरून त्यासच कोतवालीवर चं. १७ रबिलावल ( १६ नवंबर १६२७ इ. स. ) रोजीं कायम केलें. मीर महमद तकी तफ्रशीचा मुलगा मीर फसिह्-उद्दीन यास मच्छलीपट्टणास हवालदारी दिली व मीर मुल्ला महमद तकी यास मनमुरखानानें आपल्या नायब मीर जुल्मतीचें काम सांगितलें.[१७२]

हि. १०३८ (२१ आगस्ट १६२८ ते १० आगस्ट १६२९ इ. स.).—शहाजहानाकडून शेख मुहिउद्दिन पिरजादा येलची आला. तेव्हां सय्यद अबदुल्ला माज़िद्रानी यास पुढें सामोरा पाठवून त्याचा सत्कार करविला. नंतर मीर कासिम नाझिर-उल-मुमालिक यानें त्याचा सत्कार केला. शेख मुहिउद्दिन जेव्हां हौज-इ-दुर्गला आला तेव्हां कुत्बशाहा त्यासाच सामोरा गेला. त्या वेळीं येलचीनें कांहीं घोडे, दोन हत्ती वगैरे कुत्बशाहास नजर केले. माजी मिर्झा महमद अमीन मीर जुम्ला याचे बागेंत त्याची राहाण्याची सोय केली. त्याचेबरोबर शंभर स्वारें माणसांचा लवाजमा होता. प्रथम दरबारांत आला तेव्हां कुत्बशाहानें त्यास दोन घोडे व एक हत्ती बक्षिस दिले. शिवाय पांच हजार होन व चार हजार मण धान्यसामग्री त्याच्या खर्चास दिली. त्याचा दर महिन्याचा तीन हजार होनांचा खर्च कुत्बशाहास द्यावा लागे. त्याचेकडे एक लाख पन्नास हजार होनांचा ऐवज व पन्नास घोडे व दहा हत्ती गेले. तरी तो सारखा मागणी करूं लागला. शहा महमदानें त्याचा कारभार नीट मिटवावयाचा, पण तें त्याला जमलें नाहीं. शहाजहानाकडून शेख मुहिउद्दिनास

---

१७१. हा. अ. अ. (लि.), पृ. ३०७.
१७२. ह. अ. अ. ( लि. ), पृ. ३११.

परत बोलावण्यास अहदी आले. परंतु तो त्यांनाहि दाद देईना. शेख महमदाचा व बायकी कारभाराचा तो फायदा घेत हैद्राबादेसच राहिला.[१७३]

चं. १ मोहरमला ( २१ आगस्ट १६२८ इ. स. ) मनसुरखान हबशी वारला. तेव्हां त्याच्या सरखेलीच्या जागेसाठीं पुष्कळ लोकांनीं प्रयत्न केले. कुत्बशाहास बरेच नजरनजराणेहि दिले. परंतु मुल्ला महमद तर्की तफ्रशी हा सरखेलाजवळ दिवाणीचें काम पहात होता. मनसुरखानानेंहि त्याची शिफारस करून ठेवली होती. म्हणून त्यास चं. २३ सफर ( १३ सप्टेंबर १६२८ इ. स. ) रोज सरखेली दिली. यानेंहि त्या जागेसाटीं कुत्बशाहास बरीच पेशकश पाठविली होती. मुल्ला महमद तर्कीनें लवकरच कुत्बशाहाचा बराच विश्वास संपादला. ब्राह्मण कारकुनांचा पगडा कमी केला. हिशेबांतील अफरातफरीसहि आळा घातला. एक लाख तीस हजार होन अफरातफर केल्याचा नारायणराव मजुमदारावर आरोप ठेवून व त्यास कैद करून त्याचेकडून पैसे वसूल केले. त्याची मालमत्ता जप्त केली. नंतर, चौधरींचें बंड मोडलें. त्याच्या या कामगिरीवरून कुत्बशाहानें त्यास 'शरिफ उल्मुल्क' हा किताब व रत्नजडित कलमदान बहाल केलें. मोगली सैन्य दक्षिणेंत येणार असें समजल्यावरून त्यास पांच हजारी दिली. तेव्हां त्यानें दखनणी, आरब, अफगाण व इतर परदेशीय लोकांची फौज तयार केली. कुत्बशाहानें दादमहालाचे मैदानांत तिची पाहाणी केली तेव्हां त्याची बरीच वाहवा झाली.

याच वेळीं मनसुरखानाकडे असलेला ऐन उल्मुल्कीचा कारभार आदमखान हबशीकडे दिला व रेकाबी लष्कराची हवालदारी मनसुरखानाच्या मुलास दिली.[१७४]

शहा महमदास पेशवाई दिली होती. परंतु त्याचेकडून व्हावा तसा कारभार होईना. शहाजहानाचा येलची मुहिउद्दिन याचेंहि प्रकरण मिटेना. शहा महमदाच्या नालायकीमुळें तो अधिकाधिक चढून जाऊं लागला. शिवाय शहा महमद फितुरी करीत असल्याचाहि संशय आला. त्यानें आदिलशाहास गुप्त खलिता पाठविला होता. तो ख्वाजा महमद तुर्कनें वाटेंत पकडून कुत्बशाहास दाखविला. नंतर लंगरचा हवालदार शहा काझी याचेकडून लिहविलेला दुसरा खलिताहि त्याचे कलमदानांत लपवून ठेवलेला मिळाला. तेव्हां शहा महमदाकडून पेशवाई काढली व ती चं. ९ रमजान १०३८ हि. ( २३ एप्रिल १६२९ इ. स. ) रोजीं शेख महमद खातुन यास दिली.

१७३. ह. अ. अ. ( लि. ), पृ. ३१३-४.
१७४. ह. अ. अ. ( लि. ), पृ. ३१४-५.

पेशवाईवर येतांच खातूननें आसदखान व इतर मोगल अमीर उमरावांस पत्रें लिहिलीं. शहाजहानाकडून कुत्बशाहास तकलीफ न पोहोंचविण्याविषयीं शेख मुहिउद्दिनास ताकीद आणविली. या त्याच्या कामगिरीवरून त्यास बारा इमामच्या दरवाज्यापासून थेट नदीमहालापर्यंत पालखींत येण्याचा बहुमान दिला. हा कवी व ज्ञाते लोकांचा चहाता असल्यानें अशा लोकांस मोठमोठे हुद्दे मिळूं लागले.[१७५]

मुल्ला ओव्हैस खुषनवीस यास डबीरी मिळाली. लाहोराहून आलेला मीर सय्यद महमद अस्फहानी यास पांच हजार होनांचा वार्षिक तनखा देऊन त्यास व त्याच्या दोन मुलांस दरबारी सरदार केले. खर्चास एक गांव इनाम दिला.[१७६]

खैरातखान व महमद कुली बेग हे सुरतेवरून व वाटेंत शहाजहानाचेंहि पत्र घेऊन इराणांत गेले होते. त्यांस आबासी बंदरांत शहा आबास मेल्यानंतर चं. २२ जमादिलावल १०३७ हि. रोजीं शहा सफी बहादुरखान शाहा झाल्याची बातमी लागली. ती त्यांनीं कुत्बशाहास कळविली. ही खबर हैद्राबादेस हि. १०३८ साबानच्या अखेरीस ( १३ एप्रिल १६२९ इ. स. ) रोजीं कुत्बशाहास पोहोंचली.[१७७]

महमदनगर किल्ल्याच्या तट दुरुस्तीचें काम मलिक युसुफ व मलिक नूर महमद यांजकडे दिलें होतें. तें साबानच्या अखेरीस (१०–३ एप्रिल १६२९ इ. स.) पूर्ण झालें.[१७८]

हि. १०३९ ( ११ आगस्ट १६२९ ते ३० जुलै १६३० इ. स.).— नासिर उल्मुल्क यास मलिक अंबरची खास-इ-खेली दिली व त्याच्या मुलास त्याची सरनोबती सांगितली. मलिक अंबरास पुन्हां त्याचे जागेवर नेमलें. मलिक अंबरची एक हजार होनांची जहागीर जप्त केली होती. तीहि त्यास परत दिली. नासिर उल्मुल्कनें परदेशीय, अफगाण, रजपूत वगैरेंची एक नवीन फौज उभारली होती. या फौजेस तो रोज आठ मैल कूच करण्यास लावी.[१७९]

---

१७५. इ. अ. अ. ( लि. ), पृ. ३१६.
१७६. इ. अ. अ. ( लि. ), पृ. ३१६.
१७७. इ. अ. अ ( लि. ), पृ. ३१७-१८.
१७८. तटावरील शिलालेख, ए. इं. मॉ., १९१३-१४, पृ. ५०.
१७९. इ. अ. अ. ( लि. ), पृ. ३१९.

मुर्तुझानगराच्या बाजूस नेहमीं बंडें होत. म्हणून तीं मोडण्याकरितां मीर अबुल मआलीम उर्फ दिआनतखान यास मुस्तफानगर, मच्छलीपट्टण व समुद्रकिनाऱ्या-वरील इतर बंदरांचा सुभेदार करून मुर्तुझानगरास पाठविला होता. त्यानें बरा बंदोबस्त राखला होता. परंतु त्याचा तेथील लोकांनीं खून केला व कुत्बशाहास अर्ज केला कीं, आम्ही अत्यंत राजनिष्ठ आहोंत. दिआनतखान फार जुलुम करी म्हणून तो मारला गेला. परंतु कुत्बशाहानें दिआनतखानाच्या जागीं ख्वाजा महमद तुर्कीची नेमणूक केली. त्यानें तेथें जाऊन प्रथम चारशें पुंड लोकांना ठार केलें. त्यानें तेथील कारभार सुरळीत केला व नंतर १६३० इ. स.च्या दुष्काळांत पुष्कळ मेहनत घेऊन तेथें चांगली व्यवस्था राखली.[१८०]

या वर्षाच्या सुरुवातीस एक नवीन चार मजली महाल बांधला. त्यांत सुंदर तजविगाहि काढविल्या.[१८१]

हि. १०४० ( २१ जुलै १६३० ते २० जुलै १६३१ इ. स. ).— अबदुल्ला कुत्बशाहा गोवळकोंडा येथील बाग पाहण्यास गेला. तो तेथें एक महिना राहिला. बाग पाहून झाल्यानंतर त्यानें किल्ल्यांतील त्याच्या पूर्वजांच्या कबरींस भेट दिली. तेथील मुतावली लोकांस बक्षिसें वाटलीं.[१८२]

कुत्बशाहा गोवळकोंड्यास असतां शरिफ-इ-मुल्कनें त्यास विनंति केली कीं, कल्गूर येथील पेडा रेडीचा मुलगा अलमय्या चौधरी हा धनवान असून त्यानें दोन तीनशें स्वार ठेवले आहेत. त्यांच्या साहाय्यानें तो सरहद्दीवरील लुटालुटीस आदिल-शाहास मदत करितो. खंडणी देत नाहीं व दरबारासहि येत नाहीं. तेव्हां त्याच्या पारिपत्यार्थ बोलची बेग यास पाठवावें. कुत्बशाहानें त्याप्रमाणें हुकूम दिला. तेव्हां बोलची बेगनें झपाट्यानें एक दिवस व दोन रात्रींत कल्गूरपर्यंतचा प्रवास आटोपून अलमय्याच्या वाड्यांत गेला. दरवानास मारून थेट त्याच्या झोंपण्याच्या खोलींत शिरला व त्याला बेसावधपणें पकडलें. त्याचा शिरच्छेद केला. त्याचें शीर गोवळ-कोंड्यास आणून कुत्बशाहापुढें ठेवलें. तेव्हां कुत्बशाहानें एक घोडा व चौधरीची लूटून आणलेली मालमत्ता त्यास बक्षिस दिली.[१८२]

---

१८०. ह. अ. अ. ( लि. ), पृ. ३१९-२०.

१८१. ह. अ. अ. ( लि. ), पृ. ३२०.

१८२. ह. अ. अ. ( लि. ), पृ. ३२१.

शहाजहान परत दक्षिणेंत आल्यानंतर[१८३] शेख मुहिउद्दिनास ताकीद करून परत नेलें. त्याच्याबरोबर युसुफशहा ऊर्फ वफाखान यास बरोबर नजरनजराणे देऊन पाठविले. हा वयोवृद्ध व अनुभवशीर असल्यानें त्यानें मुहिउद्दिनाच्या गोवळकोंडा येथील वागणुकीबद्दल तक्रार केली. तेव्हां शहाजहानानें मुहिउद्दिनाची सर्व मालमत्ता जप्त केली आणि त्यास व त्याच्या सर्व नातलगांस कामावरून दूर केलें. ही बातमी वफाखानानें कुत्बशाहास कळविली. ती हैद्राबादेस चं. ७ रज्जब १०४० हि. ( ३० जानेवारी १६३१ इ. स. ) रोजीं पोहोंचली.[१८४]

शहाजहानानें तेलंगणावर स्वारी करण्याकरितां नासिरीखानास पाठविलें. कुत्बशाहास ही बातमी लागतांच त्यानेंहि अदमखान हबशी, अल्ला कुली बेग व इतर सरदार सरहद्दीवरील कौलसला पाठविले.[१८५] नासिरीखानानें प्रथम कंदाहारला वेढा देण्याचें ठरवून तो कंदाहारला आला व किल्यापासून एका कोसावर चं. २३ जमादिलावल ( १८ डिसेंबर १६३० इ. स. ) रोजीं तळ दिला. कंदाहारचा किल्लेदार या वेळीं याकुत खुदाबंदखानाचा मुलगा सादिक हा होता. नासिरीखानानें दुसऱ्या दिवशीं कंदाहार शहरावर हल्ला करण्याचें ठरविलें. परंतु कुत्बशाही सर्फराजखान त्यास तोंड देण्यासाठीं तोफा वगैरे डागून किल्ल्याचे पायथ्याशीं बसला होता. लढाई झाली. सर्फराजखान निजामशाही मुलुखांत पळून गेला. तेव्हां नासिरीखानानें कंदाहारास वेढा दिला. नंतर कुत्बशाही सैन्यानें आदिलशाही व निजामशाही रणदुल्लाखान, मुकरबखान व इतर सरदारांसह येऊन पुन्हां हल्ला चढविला. परंतु त्यांतहि कुत्बशाही सैन्याला तीन कोस मागें हटावें लागलें. इतक्या अवधींत नासिरीखानानें एकवीस सुरुंग खणविले. त्यांतील तिहींत दारू वगैरे भरून झाली. याच वेळीं नासिरीखानास अझमखान कुमक घेऊन आला. तेव्हां सुरुंग उडवून हल्ला द्यावयाचा बेत ठरला. एक सुरुंग फुकट गेला. परंतु बाकीच्या दोन सुरुंगांनीं शेरहाजी नांवाचा बुरुज अर्धा अधिक उडविला. सबंध दिवसभर लढाई चालूच होती. रात्रीं आणखी सुरुंग भरले, तेव्हां किल्यांतील लोक शरण गेले. चार महिने व

---

१८३. इ. स. १६३०चे सुरुवातीस शहाजहान बऱ्हाणपुरास आला. सुरत-लंडन-पत्र, १३ एप्रिल १६३० चें, इं. फॅ. इन इं., भा. ४, पृ. २२ व ३३.

१८४. ह. अ. अ. ( लि. ), पृ. ३२२.

१८५. ह. अ. अ. ( लि. ), पृ. ३२३.

एकोणीस दिवसांच्या वेढ्यानंतर कंदाहारचा किल्ला चं. १५ सव्वाल ( ७ मे १६३१ इ. स. ) रोजीं मोगली सैन्यानें ताब्यांत घेतला.[१८६]

इ. स. १६२०च्या जूनच्या पूर्वी शहाजहानानें बाकरखानास ओरिसांतून मनसुरगडावर जाण्याचा हुकूम दिला. त्याप्रमाणें त्यानें छत्रद्वारापासून दोन कोसांवर एका काळापहाड खिंडीच्या टोंकावर असलेल्या मनसुरगडाच्या आसपासचा मुलुख उध्वस्त केला. परंतु पावसाळ्यामुळें तो परतला. पावसाळा संपतांच तो पुन्हां चालून येईल म्हणून कासिमकोट्याचा सिपेहसालार मीर जंबील मुस्तफाखानाचा मुलगा सय्यद महमद यानें कुत्बशाहाकडे लिहिलें कीं, बाकरखान जंगी फौज बरोबर घेऊन येण्याच्या तयारींत आहे तरी मदत पाठवावी. कुत्बशाहानें सय्यद अबदुल्लाखानाबरोबर सुभान कुलीचा मुलगा शहा अली व एक बडा अमीर याकुतखान हबशी यास बरोबर देऊन पाठविलें. नायकवाडी व खास-इ-खेलचे हवालदारहि रवाना झाले. ही सेना काळागडास जाऊन पोहोंचली. बाकरखान त्याच वाटेनें येणार म्हणून तेथेंच तळ दिला. मोगलांशीं तोंड देण्यासाठीं सैय्यद मुस्तफाखान, सय्यद अबदुल्लाखान, शेरखान अहमदनगरी, धर्माराव, असीराव, राय कृष्णदेव व इतर मनेवार व नायकावाडी सज्ज होऊन राहिले. परंतु इतक्यांत सय्यद मुस्तफाखान वारला. तेव्हा कुत्बशाहानें सय्यद अबदुल्लाखानास सरलष्करी दिली व एक तरवार बक्षिस दिली. नंतर थोडेच दिवसांनीं शेरखान अहमदनगरीहि मेला. मनसुरगडावर चांगला बंदोबस्त राखला होता. बाकरखान चं. ८ जमादिलावल (३ डिसेंबर १६३० इ. स.) रोजीं मनसुरगडाजवळ आला. त्या वेळीं किल्ल्याच्या ईशान्येस कुत्बशाही सैन्य लढण्यास सज्ज होऊन राहिलें होतें. बाकरखानानें जोराचा हल्ला चढविला. त्यामुळें कुत्बशाही सैन्यास माघारी हटावें लागलें. परंतु मागें नदी व चिखल राहिल्यानें कुत्बशाही सैन्याचा पराभव झाला. शहा अली मारला गेला. बाकरखानानें किल्ल्यास वेढा दिला व तोफांच्या माऱ्यांत निकराचा हल्ला चढविला. कुत्बशाही किल्लेदारानें किल्ला बाकरखानास दिला. मोगली फौजेनें किल्ला ताब्यांत घेतला.[१८७] सय्यद अबदुल्लाखानानें कुत्बशाहाकडे मदत मागितली. कुत्बशाहानें ख्वाजा अफजल तुर्कला मुर्तुझानगराहून बोलावून चं. ७ रज्जब १०४० हि. ( ३० जानेवारी १६३१ इ.स.)

---

१८६. बादशाह-नामा, इलिअट डॉसन, भा. ७, पृ. २५-२७.

१८७. बादशाह-नामा, इलिअट डॉसन, भा. ७, पृ. १७-८; ह. अ. अ. (लि ), पृ. ३२३-४.

रोजीं सय्यद अबदुल्लाच्या मदतीस पाठविलें. बरोबर मुजा उल्मुल्क, शेर महमदखान व इतर दख्खणी सरदार दिले. राजा तबोजीरावाबरोबर सरहद्दीवरील जमीनदारांस सलकर्डी पाठविलीं व त्यांना सरहद्दीवरील संरक्षणार्थ मदत करण्या-बद्दल लिहिलें. मिया हुसेनीस राजमहेंद्रीचा बुरुज व तट नीट करण्यास पाठविलें. त्याचप्रमाणें किल्ल्याची सरबराई करुन ठेवण्याचाहि त्याला हुकूम झाला. बाकरखान राजमहेंद्रीवर चालून जाऊन वेढा घालण्यापूर्वीच ख्वाजा अफजल तुर्क तेथें जाऊन पोहोंचला. या वेळीं शहाजहानानें दक्षिणची मोहीम तहकूब करण्याचें ठरविलें व बाकरखानास परत बंगाल्यांत जाण्याचा हुकूम केला. शहाजहानानें एक अहदी हैद्राबादेस पाठविला. त्यालाहि कुत्बशाही मुलखांतून बाकरखानाकडे जाण्याची पेशव्यानें परवानगी दिली. त्याच्या मागोमाग सादिक बेग तुर्कास टेवलें. लवकरच बाकरखान मनमुरगडाहून बंगाल्यांत परत गेल्याची बातमी सय्यद अबदुल्लानें कुत्बशाहास कळविली.[१८८]

गेल्या दोनतीन वर्षांत जसा पाऊस पडावा तसा पडला नाहीं. त्यामुळें तांदुळाचा भाव दर होनास बारा मण होता तो सात मण झाला. इ. स. १६३०च्या पावसाळ्याचे सुरुवातीस ( जून ) हा भाव साडेतीन मणांवर आला. अर्धा पावसाळा गेला तरी पाऊसाचा एक थेंबहि पडला नाहीं. या अवर्षणानें पाण्याचा अगदींच तुटवडा पडला. शंभर गज खणलें तरी पाणी लागेना. तेव्हां कुत्बशाहानें जाहीर फर्मान काढलें कीं, सर्व लोकांनीं तीन दिवस उपवास पाळावा व मुसलमानांनीं उपवासाचे शेवटीं शुक्रवारीं धुळीनेंच हात धुवून निमाज पढावी व सर्व हिंदूंनी नदीवर जाऊन त्यांच्या रिवाजाप्रमाणें सामुदायिक प्रार्थना करावी. हुकुमाप्रमाणें पेशवा वगैरे सरदार, धर्मनिष्ठ व इतर मुसलमान नदीमहालाच्या मैदानांत जमले. काझी हसन ऊर्फ काझी मक्का यांस पेशनमाज केलें. त्यांनीं नमाज पढली. हिंदूंनींहि मुसा नदीवर जाऊन प्रार्थनेस प्रारंभ केला. तेथें हत्ती व उंट यांचेवर लादून नेलेले रुपये व अश्रफी पेशव्यानें गरीबांना व मुलांना वांटल्या. सायंकाळीं लोक परत आले. थोडासा पाऊस पडला. परंतु त्यानंतर कांहीं पडला नाहीं. पांगळचा सागर, हुसेन सागर, इब्राहीम पट्टणचा तलाव, हैद्राबादेंतील तलाव, खोल विहिरी वगैरेस कोठेंच पाण्याचा थेंब राहिला नव्हता. बागेंतील झाडें वाळून गेलीं. घरांत मेलेल्यांस व

---

१८८. ह. अ. अ. ( लि. ), ३२५–६; सुरत-बंटम-पत्र, ८ सप्टेंबर १६३१, इं. फॅ. इन इं., १६३०–३३, पृ. १६५.

त्याचप्रमाणें बाजारांत व इतरत्र मेलेल्यांस मूठमाती देण्यास कोणी मिळेना. अशी भयंकर स्थिति प्राप्त झाली. कुत्बशाहानें फर्मान काढून जेथें जेथें धान्य सामग्री सांठविली होती तेथून ती शहरांत आणविली. ती विकण्यास व सांठविण्यास आज्ञा केली. तेव्हां शहरांत खावयास मिळूं लागलें. इतरत्र सोन्याच्या भावानें धान्य मिळूं लागलें. तेव्हां कुत्बशाहानें सर्वत्र आणखी लंगरखाने काढले. येईल त्यास त्याच्या पोटापुरतें फुकट अन्न पुरविण्याचा हुकूम दिला. लोकांच्यांत चालण्याची शक्ति राहिली नाहीं म्हणून अन्न जवळपास मिळावें याकरितां लंगरखान्यांची संख्या वाढविली. आळीआळींतून लंगरखाने काढले. भुकेनें बेजार होऊन रस्त्यांत पडलेल्या लोकांसाठीं मोठमोठीं ( आष ) कांजीचीं तपेलीं गाड्यांवर घालून रस्त्यारस्त्यानें हिंडवावींत व चमच्यानें प्रत्येकाच्या तोंडांत कांजी घालीत जावें असे हुकूम दिले. सरदार, सरकारी नोकर व इतर मोठमोठ्या लोकांस या कामांत शक्य ती मदत करण्याचा हुकूम दिला. मोठमोठे सरदार व श्रीमंत शक्य तें अन्नदानहि देऊं लागले. पाणी लागेपर्यंत ठिकठिकाणीं विहिरी खणण्याचें काम सपाट्यानें चालू केलें. अशा तऱ्हेनें शक्य ते प्रयत्न केले. खास हैद्राबादेंतच एक लाखांवर माणसांस कफनी पुरविल्या. याशिवाय असंख्य लोक इतरत्र मेले असतील ते वेगळेच. याप्रमाणें या वर्षी आवर्षणानें कहर उडविला.[१८९]

मंगळवार चं. ६ रमझान हि. १०४० ( ३० एप्रिल १६३१ इ. स. ) रोजीं सायंकाळीं अबदुल्ला कुत्बशाहास मुलगी झाली. शरिफ-उल्मुल्कनें शंभर गाड्या साखर वांटली व अबदुल्लानें अंतर्गृहांत दरबार भरवून पडदानशीन स्त्रीवर्गास बरींच बक्षिसें दिलीं.[१९०]

---

१८९. ह. अ. अ. ( लि. ), पृ. ३२६-२७. या दुष्काळाचीं हृदयद्रावक वर्णनें जॉन व्हायनानें आपल्या ७ आक्टोबर १६३०च्या बातमीपत्रांत व सुरतेच्या इंग्रज व्यापाऱ्यांनीं आपल्या १७ नवंबर १६३० व ३१ डिसेंबर १६३० व इतर पत्रांतून दिलीं आहेत. ( ई. फॅ. इन इं., पृ. ४५, ९७, १२२, इ. ). बऱ्हाणपूर व गुजराथ येथेंहि मोठाच दुष्काळ पडला. ' माणसानें माणसास खाण्याची वेळ ' आली होती. गुजराथेंत व उत्तर हिंदुस्थानांतील कांहीं भागांत दुसऱ्या वर्षी अति वृष्टीनें दुष्काळ पडला. शके १५५३ आषाढ वद्याच्या पूर्वी " पुण्यांत दुष्काळ कहोर पडला. " रा. खं. १७, ले. २९., रा. खं. १५, ले. ४१४, भा. इ. स. मं., वा. इ., १८३८ चें, पृ. ५१, जेधे शकावली, इ. इ..

१९०. परिशिष्ट २, पृ. ३५.

चं. १९ सव्वाल हि. १०४० ( ११ मे १६३१ इ. स. ) रोजीं सकाळीं मुल्ला महमद तकी तफ़शी शरीफ उल्मुल्क पोलो खेळत असतां घोड्यावरून पडल्यामुळें आजारी होऊन वारला. या वेळीं त्याचें वय ३९ वर्षांचें होतें. तो मेल्यानंतर त्याच्या बायकांमुलांस बराच ऐवज वगैरे देऊन इराकला पाठविलें. नंतर दिवाणीकडील कारभार मीर नाझीर उल्मुल्क, मीर महमद मश्रिफ, नारायणराव मज्मुदार व इतर कामगारांकडून नवाब-इ-अलामी घेऊं लागला. परंतु त्यामुळें अव्यवस्था माजली.[१९१]

हि. १०४१ ( २१ जुलै १६३१ ते ८ जुलै १६३२ इ. स. ).—कुत्बशाहानें आदिलशाहास वार्षिक खंडणी दिली नव्हती.[१९२] ती वसूल करण्याकरितां शहा अब्दुल हसन आदिलशाहाकडून हैद्राबादेस आला. याच सुमारास ( जून १६३१ इ. स. ) मोगली सेना परत गेल्यानें मुरारि पंडितास स्वास्थ्य मिळालें. त्यानें सरहद्दीवर येऊन शहा महमद पीरजादा पेशवा होता त्या वेळीं (१६२९ इ. स.) कुत्बशाहाच्या सरहद्दीवरील लोकांनीं आदिलशाही मुलखांत लुटालुट केली होती व त्याबद्दल शहा महमदनें तो प्रांत परत वसविण्यास लागणारा खर्च देण्याचें कबूल केलें होतें. मुरारि पंडितानें हा खर्च तावडतोब देण्याची निकड लावली. वसूल मिळेना. तेव्हां त्यानें कौलसला वेढा दिला. एक महिनापर्यंत वेढा चालू ठेवला. किल्ल्यावर हल्लेहि चढविले. परंतु वेढा घालून बसण्यापेक्षां आपल्या वीस हजार मराठा फौजेनिशीं कुत्बशाही प्रांतांत लुटालुट करीत राहावें असें ठरवून त्याप्रमाणें वेढा उठविला व मुलुखांत जाळपोळ करूं लागला. तेव्हां कुत्बशाहानें बोलची बेग, खुदावर्दी सुलतान, काझिल बशखान, इतर मुसलमान सरदार, खास-खेलचे हवालदार अझदहाखान व इस्तिकलालखान, दशसहस्री सरदार जगदेवराव, भालेराव व असीराव, आणि इतर मनसबदारांस मुरारि पंडितावर चालून जाण्याची आज्ञा केली. इतक्यांत आदिलशाही व निजामशाही सैन्यें एकमेकांस मदत करीत आहेत असें समजतांच या जोड सैन्यास तोंड देण्यासाठीं ख्वाजा अफझल तुर्क, शेर महमदखान व इतर खास-इ-खेलच्या हवालदारांस लढाईवर जाण्यास तयारी करण्याची आज्ञा झाली. मुजा उल्मुल्कास कासिमकोट्यास राहण्याचा हुकूम झाला. अली बेगखान अफ्सर तुर्क, मेराम बेग, मुहमद सय्यद बेग बदक्षी, सय्यद बाबू, मख्दून मुल्क दफ्तरी व इतर

१९१. ह. अ. अ. ( मि. ), पृ. ३२८.

१९२. महमदनामा, शिवाजी निबंधावली २, पृ. ८१.

दख्खणी लोकांस जहांगिरी देऊन फौज उभारण्यास सांगितलें. दादमहालासमोर या फौजेची कुत्बशाहानें पाहाणी केली व त्यांच्या इतमामांप्रमाणें बक्षिसें दिलीं. मुरारि पंडिताच्या सैन्यांत फितुर करण्याचा प्रयत्न केला. तेव्हां बाबाजी काटे आदिलशाहींतून फुटून आपल्या दोन तीन हजार घोडदळासह कुत्बशाहास येऊन मिळाला. शत्रूकडील सैनिकांना सतावून त्यांचीं नाकें व कान कापून आणण्यास मनेवार सैन्याला हुकूम झाला. प्रत्येक नाकास व कानास एकेक होन देऊं केला. कुत्बशाही सैन्य चालून जात आहे इतक्यांत मुरारि पंडिताचा भाचा हैद्राबादेस आला. त्यानें शहाजहान दक्षिणी पातशाहांचा निर्दयपणें नाश करीत आहे, अशा प्रसंगीं सर्व दक्षिणी शाहांनीं एक होऊन त्यास तोंड देणें इष्ट आहे, शहाजहानाशीं तोंड देण्यासाठीं पैसा पाहिजे व सैन्याची मदतहि पाहिजे, ती देण्याचें नाकारलें म्हणून नाइलाजास्तव आदिलशाही सैन्यास कुत्बशाही मुलखावर चाल करावी लागली, तरी अशा प्रसंगीं मैत्री राखणें योग्य आहे, वगैरे बोलणें झाल्यावर चं. १५ सफर १०४१ हि. ( २ सप्टेंबर १६३१ इ. स. ) रोजीं तह झाला. त्याअन्वय कुत्बशाहानें आपलें सैन्य मुरारीच्या मदतीस रवाना केलें.[१९३] बाकी राहिलेल्या खंडणीनिमित्त कुत्बशाहानें दीड लाख होन आदिलशाहास दिले[१९४]

गेलीं दोनतीन वर्षें अवर्षणामुळें दुष्काळ पडला होता. या वर्षीं सर्वत्र अतिवृष्टि झाली. बुधवार चं. २७ सफर ( १४ सप्टेंबर १६३१ इ. स. ) रोजीं सकाळीं मुसा नदीस भयंकर पूर आला. दोनतीन प्रहर पाण्यास जोर होता. हैद्राबादेंतील बाग व घरें यांचा फार नाश झाला.[१९५]

चं. २४ जिल्हेज हि. १०४० ( १५ जुलै १६३१ इ. स. ) रोजीं मुल्ला तकीच्या मृत्यूमुळें दिवाणी कारभाराची रिकामी पडलेली जागा मिर्झा हमजा अस्त्राबादी यांस देऊन त्याच्याकडे या सर ख्वैलीसाठीं साठ हजार होनांचा महाल सोंपविला. परंतु त्याला हें हिशेबी काम जमेना. तो कारकुनांचे आहारीं

१९३. परिशिष्ट २, पृ. ३०–३.

१९४. महमदनामा, शिवाजी निबंधावली २, पृ. ८१.

१९५. परिशिष्ट २, पृ. ३६, गुजराथ, मच्छलीपट्टण वगैरे ठिकाणच्या अतिवृष्टीमुळें ओढवलेल्या आपत्तींचीं वर्णनें त्या वेळच्या इंग्लिश फॅक्टरीज्च्या रेकॉर्डस्मध्यें बरींच आलीं आहेत.

जाऊं लागला. म्हणून कुत्बशाहा स्वतःच तें काम पाहूं लागला. शेवटीं चं. ३ रबिउलआखर ( १९ आक्टोबर १६३१ इ. स. ) रोजीं मिर्झा हमजास दिवाणीच्या कामावरून दूर करून तें काम मिर्झा रुझ बिहान अस्फहानीस दिलें.[१९६]

इ. स. १६३१च्या सप्टेंबरांत आदिलशाहाशीं तह झाल्यानंतर विठोजी काटे नांवाचा शूर सरदार हैद्राबादेजवळ आला. तेव्हां त्यास कुत्बशाहानें एक घोडा व वस्त्रें वगैरे बक्षीस पाठविलीं. परंतु तो लवकरच आजारी होऊन वारला. कुत्बशाहानें माबोजी हरकारा निजामशाही यास त्याच्या व त्याच्या भावांच्या मुलांचा कारभार पाहण्यास नेमलें. मुलांच्या समाधानार्थ नारायणरावास पाठविलें. बक्षिसेंहि दिलीं. नारायणराव परत आल्यानंतर त्यानें कुत्बशाहाजवळ विटोजीच्या सैन्याची स्तुति केली. तेव्हां कुत्बशाहानें खास-इ-खेलचा हवालदार नासीर-उल्मुल्क यास दोन हजार घोडदळ घेऊन जाऊन विटोजीच्या सैन्यास दादमहालापुढें सन्मानानें घेऊन येण्यास सांगितलें. त्याप्रमाणें विटोजीचें सहा हजार घोडदळ व पायदळ दादमहालासमोर आलें व कुत्बशाहास मुजरा दिला. तेव्हां विठोजीच्या व त्याच्या भावाच्या मुलांस व त्यांच्या तीस इतर नातलगांस मराठा सैन्याच्या सरदाऱ्या दिल्या. विटोजीच्या मुलांस मोल्यवान वस्त्रें व रत्नखचित खंजीर पट्ट्यासह, रत्नांचा कंठा, २७ घोडे व पांच हत्ती दिले. इतर सरदारांसहि त्यांच्या योग्यतेनुरूप वस्त्रें वगैरे दिलीं. विठोजीच्या मुलास तीन लक्षांची जहागिरी दिली.[१९७]

कुत्बशाही दरबारांतील निजामशाही जुने वकील मीर जाफर व माबाजी हरकारा यांचे ऐवजीं फत्तेखानानें शहा अबुल हसनची नेमणूक केली. शहा अबुल हसन हैद्राबादेस आला. तेव्हां त्याचीहि कुत्बशाहानें त्याच्या योग्यतेप्रमाणें व्यवस्था लाविली. माबाजी हरकारा कुत्बशाही सरदार झाला व त्यास वार्षिक नेमणूक करून दिली. नंतर कांहीं दिवसांनीं मीर जाफरहि कुत्बशाही नोकरींत शिरला.[१९८]

मुरारपंडितानें घातलेल्या कौलसच्या वेढ्याचे प्रसंगीं अदमखान हबशी यानें बरीच ढिलाई दाखविली म्हणून त्याला काढून ऐन उल्मुल्कीची जागा नासीर उल्मुल्कास दिली. नासिरखानाची खास-इ-खेलच्या हवालदारीची जागा मुर्शिद कुली बेगच्या मुलगा कासीम बेग तुर्क यास दिली. मुरारीच्या लढाईच्या वेळीं राजमहेंद्रीहून ख्वाजा

१९६. ह. अ. अ. ( लि ), पृ. ३२९.

१९७. परिशिष्ट २, पृ. ३४–५.

१९८. परिशिष्ट २, पृ. ३७–८.

अफजल तुर्कास बोलाविलें होतें. तो हैद्राबादेस येतांच आजारी झाला व चं. १८ जमादिलाखर १०४१ हि. ( १ जानेवारी १६३२ इ. स. ) रोजीं वारला. तेव्हां त्याची जागा काझील बशखानास दिली व त्याची एक हजार घोडदळाची सरदारी बोलची बेग यास देऊन मुर्तुझानगराचा सुभा मीर फसिहउद्दीन मुहमदाकडे सोंपविला.[१९९]

याच सुमारास मोगली असफखानानें विजापुरास वेढा घातला. तेव्हां मोगलांचा तीन हजारी उमराव नासीरखान नांदेडाजवळ येऊन राहिला. सरहद्दीच्या संरक्षणाची आवश्यकता जाणून कुत्बशाहानें सरहद्दीवर नासीर उल्मुल्कास मुख्य सेनापती करून व त्याचे मदतीस बोलची बेग, खुदावर्दी काझिल बशखान, विटोजी काल्याचा मुलगा, अलमखान, शेर महमदखान, मुझाफरखान, धर्मराव व इतर हजारी नायकवाडी, जगदेवराव, भालेराव वगैरे सरदार रवाना केले. ते सरहद्दीवरील किल्ल्यांत जाऊन बंदोबस्तानें राहिले. चार लाख होनांचा जहागिरदार मलिक अंबर यास गोवळकोंडा किल्ल्याची डागडुजी व सफाई करण्यास आज्ञा झाली. त्यानें कामास सुरुवात केली. सरकारी शस्त्रागारांतून लोखंडी चिलखतें, जिरेटोप व पितळी पत्रे वांटले.[२००]

आगस्ट १६३१ इ. स.च्या सुमारास कुत्बशाहाचा वयोवृद्ध वकील वफाखान शहाजहानास भेटून मोगली वकील व एक हजारी उमराव शहा अलीबेग यास बरोबर घेऊन गोंवळकोंड्यास येण्यास निघाला. निजामशाहींतून रामगीरास आला. तेथें तो मेला. शहा अली बेग वफाखानाच्या मुलांसह हुसेनसागरास आला. मीर फसिहउद्दिनानें प्रथम त्याचें स्वागत केलें. चं. १० जमादिलावल ( २४ नवंबर १६३१ इ. स. ) रोजीं कुत्बशाहा हुसेनसागरास गेला. तेथें भेटी झाल्या. एकमेकांनीं एकमेकांस नजरनजराणे दिले. चं. १२ जमादिलावल ( २६ नवंबर १६३१ इ. स. ) रोजीं शहा अली बेगास राजधानीस बोलाविलें. चं. १७ ( १ डिसेंबर १६३१ इ. स. ) रोजीं दरबार भरला. मीर फसिहउद्दिन व करीमखान सरनोबत यांस पाठवून शहाजहानाच्या त्या वकिलास मोठ्या सन्मानानें आणविलें व त्यास व त्याचे मुलांस त्यांच्या योग्यतेनुरूप बक्षिसें दिलीं. रमझानचे अखेरीपर्यंत ( एप्रिल १६३२ इ. स.चा दुसरा आठवडा ) ते तेथेंच राहिले. शहाजहानानें कुत्बशाहाकडे

१९९. परिशिष्ट २, पृ. ३७.

२००. परिशिष्ट २, पृ. ४१-२.

तीन वर्षांची थकलेली नऊ लाख पगोड्यांची खंडणी मागितली. कुत्बशाहानें पांच लाख पगोडे रोख व दोन लाखांचें जडजवाहीर दिलें. मांडलिकत्व स्वीकारलें. राहिलेल्या रकमेची शहाजहानानें सूट दिली. कारण या वेळी शहाजहानास लढाई थांबवून परत जाणें प्राप्त झाल्यानें चं. १ जिल्काद (११ मे १६३२ इ. स.) रोजीं वकील व इतर मोगली मंडळी परत गेली. या वेळीं शहा अली बेगनें रिक्त हस्तें न जाऊं देण्याबद्दल चतुराईचें बोलणें लावलें. परंतु एकंदर परिस्थितीचा विचार करून त्याला रिकामेंच परतावें लागलें.[२०१]

अबदुल्ला कुत्बशाहा वयांत येतांच त्याची मातुश्री हयात बख्श बेगम हिनें हयातनगरास दाढी-वपनाच्या संस्काराचें मंगलकार्य केलें. त्याकरितां अबदुल्ला कुत्बशाहा हैद्राबादेहून चं. २४ रज्जब (५ फेब्रुवारी १६३२ इ. स.) रोजी सय्यदाबादेस गेला. दुसरे दिवशीं (६ फेब्रुवारी) तेथून मनसुराबादेस जाऊन राहिला व तिसरे दिवशीं (७ फेब्रुवारी) सकाळीं हयाताबादेस गेला. बारा दिवस समारंभ झाला. जिकडे तिकडे आनंदीआनंद झाला. बाराव्या दिवशीं (१९ फेब्रुवारी) सर्वांस योग्यतेनुरूप बक्षिसें दिलीं. हयात बख्श बेगमेनें या समारंभाप्रीत्यर्थ दोन लाख होनांचा खर्च केला. कुत्बशाहानें मातोश्रीस हत्ती, रत्नजडित पालख्या वगैरे दिल्या. शिवाय कांहीं गांवेंहि इनाम दिलीं.[२०२]

सोमवार चं. ११ जिल्काद १०४१ हि. (२१ मे १६३२ इ. स.) रोजीं कुत्बशाहास एक पुत्र झाला. हा चं. २९ जमादिलाखर १०४२ (३१ डिसेंबर १६३२ इ. स.) रोजीं रात्रीं वारला. याला त्याच्या आजोबाशेजारींच दफन केलें.[२०३]

कुत्बशाहा हयाताबादेहून परत आल्यानंतर असफखान विजापुराहून व बाकरखान कासिमकोट्याहून परत गेल्याची बातमी आली. तेव्हां सरहद्दीवर पाठविलेल्या सैन्यास परत येण्याचा हुकूम झाला. हें सैन्य १०४१ हि.च्या जिल्काद महिन्यांत

---

२०१. परिशिष्ट २, पृ. ४०, ४२–५, मॉन्युमेंटा हिस्टोरिआ इंडिआ, जर्नल ऑफ दि बॉंबे हिस्टॉरिकल सोसायटी, व्हॉ. १, नं. २, सप्टेंबर १९२८, पृ. १८५-६; निकोलस मनुची, व्हॉ. १, पृ. २०५.

२०२. परिशिष्ट २, पृ. ४५–७.

२०३. परिशिष्ट २, पृ. ४८ व ५९.

( १० मे ते ७ जून १६३२ इ. स. ) परत आलें. दादमहालासमोर प्रथम मुजरा झाला. तेव्हां सर्व सरदारांस त्यांच्या योग्यतेनुरूप बक्षिसें दिलीं.[२०४]

हि. १०४२ ( ९ जुलै १६३२ ते २७ जून १६३३ इ. स. ).— चं. १८ सफर १०४२ हि. ( २५ आगस्ट १६३२ इ. स. ) रोजीं रात्रीं मिर्झा रूझ बिहान वारला. तेव्हां त्याची जागा मीर फसिहउद्दीन यास दिली. रत्नखचित कमलदान दिलें. मीर फसिहउद्दिनानें रात्रंदिवस फार झटून काम केलें. परंतु हा मुर्तझा-नगराहून आल्यानंतर तेथें अव्यवस्था माजली. म्हणून तेथें खुदावर्दी मुल्तान यास वस्त्रें देऊन चं. ८ रबिउलाखर ( १३ आक्टोबर १६३२ इ. स. ) रोजीं मुर्तुझा-नगरास रवाना केलें.[२०५]

महाबतखानानें दौलताबादेस वेढा घातला. तेव्हां आदिलशाहानें या दक्षिणे-वरील मोगली परचक्राविरुद्ध दक्षिणी पातशाहांचा संघ करण्याचा प्रयत्न केला. त्यानें कुत्बशाहाकडे शेख डर्बीर या नांवाचा हेजीब पाठविला. तो चं. २७ सफर ( २३ आगस्ट १६३२ इ. स. ) रोजीं हैद्राबादेस आला. त्यानें आदिलशाही वकील शहा अबुल हसन याच्या साहाय्यानें बोलणें लावून कुत्बशाहानें किंवा आदिलशाहानें एकमेकांस विचारल्याशिवाय शहाजहानाशीं तह करूं नये, उलट मोगली सैन्यास दक्षिणेंतून काढून लावण्याचा दोघांनीं मिळून प्रयत्न करावा असें ठरलें. नंतर तो हेजीब विजापुरास परत गेला.[२०६]

आदिलशाही शहा अबुल हसन व शेख महमद रहिम यांनीं गोवळकोंड्यास आल्यानंतर अबदुल्ला कुत्बशाहाकडे त्याची बहीण महमद आदिलशाहास देण्यासाठीं मागणी केली. ती कबूल केल्यानंतर आदिलशाही सरलष्कर मुरारि पंडित व अंबरखान हबशी लग्नाच्या तयारीस विजापुराहून निघाले. सरहद्दीवर येतांच करिमखान सर नौबत व खास-इ-खेलचे चार हवालदार सामोरा जाऊन त्यांना घेऊन आले. दुसऱ्या मुक्कामास मिर्झा हमजानें त्यांचा सन्मान केला. तिसऱ्या दिवशीं नासीर उत्सुक भेटला. नंतर मलिक अंबर, मलिक अदम व मलिक अल्मास यांनीं सत्कार केला. शेवटीं मीर फसिहउद्दिनानं आपल्या लोकांनिशीं जाऊन त्यांचा सत्कार करून त्यांस तूर मुक्कामीं आणलें. तूर येथें मोठमोठे शामिआने उभारले होते. तेथें कुत्बशाहानें

२०४. परिशिष्ट २, पृ. ४७–८.
२०५. इ. अ. अ. (लि.), पृ. ३३०.
२०६. परिशिष्ट २, पृ. ६१.

जाऊन ता. १७. फेब्रुवारीच्या सुमारास दरबार भरला. नजरनजराणे व मानसन्मान झाले. चं. १९ साबान ( १८ फेब्रुवारी १६३३ इ. स. ) रोजीं रात्रीं आदिल-शाहाची बहीण मोठ्या लवाजम्यानिशीं नदीमहालांत गेली. तीस लाख होनांचा हुंडा दिला. काझीनें रात्रीं लग्न नोंदलें. नंतर हयात बख्श बेगमेनें पुष्कळ आहेर दिले. मोठा समारंभ झाला. मेजवान्याहि दिल्या. चं. २६ साबान रोजीं कुत्बशाहानें आपल्या बहिणीची राजधानीहून रवानगी केली. बरोबर मीर फसिहउद्दिन दिला. त्यास ऐशीं हजार होनांची जहागीर व घोडे वगैरे देऊन सन्मान केला. शेख महमद बिन खातून, काझी अहसन ऊर्फ काझी-इ-मक्का, शेख दादन मलिक दौलतखान, करीमखान सरनौबत, सय्यद बाबू, मखदुन-इ-मुल्क, खास-इ-खैलचे चार हवालदार चारशें घोडेस्वारांनिशीं आदिलशाही राणीस पोहोंचविण्यास तिच्या पालखीबरोबर होते. तूरला प्रथम मुक्काम झाला. साबानच्या शेवटच्या दिवशीं ( १ मार्च १६३३ इ. स. ) आपल्या बहिणीस निरोप देण्यास कुत्बशाहा तेथें गेला. आदिल-शाही सरदारांनीं दरबार भरून कुत्बशाहास मोठे मानसन्मान दिले. बक्षिसें वाटलीं. ५० हजार होन समारंभास व पांच लाख होन देस देण्यास खर्च झाला. मुरारि पंडित आदिलशाहाच्या या नूतन बेगमेस घेऊन रमजानच्या दुसऱ्या पंधरवड्यांत ( मार्चचा दुसरा आठवडा ) परतला. सरहद्दीपर्यंत बरेच सरदार त्यांस निरोप देण्यास गेले. मीर फसिहउद्दिन महमद व शेख महमद विजापुरापर्यंत पोहोंचविण्यास गेले. जुळवा ( मुखदर्शन ) समारंभहि झाला. कुत्बशाहाच्या बहिणीस हाजी बडी बी साहेबा असें संबोधूं लागले. नंतर कुत्बशाही सरदारांस आहेर वगैरे देऊन त्यांस परत जाण्यास निरोप दिला. ही मंडळी चं. १ मोहरम १०४३ हि. (२८ जून १६३३ इ. स.) रोजीं हैद्राबादेस परत आली.[२०७]

मुजा उल्मुल्क अमीरजादे माजिंद्राणी कासिमकोट्याहून कलमकला जात असतां शेर महमद खान चं. ६ जमादिलावल १०४२ हि. ( ९ नवंबर १६३२ इ. स. ) रोजीं कुत्बशाहास भेटला. तेव्हां त्याला दरबारी केलें. थोड्याच दिवसांनीं त्यास सरलष्कर करण्यांत आलें.[२०८]

चं. १३ जमादिलाखर ( १५ डिसेंबर १६३२ इ. स. ) रोजीं शेख

---

२०७. परिशिष्ट २, पृ. ४९-५५; बु. म. ५५९ व ५६३; महमदनामा, शिवाजी निबंधावली २, पृ. ८८.

२०८. परिशिष्ट २. पृ. ५५, ५८.

महमदाची पेशवाई व नबाव-इ-अलामी मीर महमद रेझाई अस्राबादी यास दिली. परंतु कुत्बशाहाच्या मनांतील किल्मिष लवकरच दूर झालें. 'शेख महमद कुत्ब-शाहाच्या वहिणीस पोहोंचवून परत आल्यानंतर पुन्हां त्यास पहिला सर्व अधिकार मोठ्या मानमरातबानें चं. १० मोहरम १०४३ हि. (७ जुलै १६३३ इ. स.) रोजीं दिला.[२०८]

चं. १७ जमादिलाखर (१९ डिसेंबर १६३२ इ. स.) रोजीं कासिम बेगची खास–इ–खेलीची हवालदारी त्याच्याकडून काढून मल्कि आदम यास दिली.[२०९]

साल अखेरीस (एप्रिल-मे १६३३ इ. स.) मिर्झा जलालउद्दिन महमद हसनी मेला. मुजा उल्मुल्कास गोवळकोंड्यास बोलाविलें. तेव्हां शेर महमद खानाच्या विनंतीवरून कासिमकोट्याचा कारभार त्याचा जांवई मीर रुस्तुम माजिंद्राणीकडे दिला. तेथें बंड झालें. तें बशीर महमदखान व मीर रुस्तुम यांस एकमेकांनीं एक-मेकांस साहाय्य करून मोडण्यास आज्ञा झाली. मुजा उल्मुल्क जिल्हेजच्या तिसऱ्या आठवड्यांत हैद्राबादेस आला.[२०९]

हि. १०४३ (२८ जून १६३३ ते १६ जून १६३४ इ. स.).— चं. १८ सफर १०४३ हि. (१४ आगस्ट १६३३ इ. स.) रोजीं मुजा उल्मु-ल्कास एक लाखाची जहागीर व एक हजार घोडदळ व एक हजार पायदळाची सरदारी दिली. नंतर दादमहालासमोर त्या सैन्यानें मुजरा दिला.[२०९]

दौलताबाद मोंगलांनीं घेतल्याचें वर्तमान समजतांच हेजाझखान दख्खणी व याकुतखान यांस कौलसचे सरहद्दीच्या संरक्षणार्थ रवाना केलें. निजामशाही सरहद्दी-वरील रामगीर किल्ल्याची डागडुजी वगैरे करण्याचें काम हसन बेग शिराझी यांजकडे देऊन व त्यास वीस हजार होन खर्चास देऊन रामगीर किल्ल्याची दुरुस्ती करविली. हसन बेग शिराझीची कोतवाली मिर्झा इब्राहीम इस्फहानीकडे सोंपविली होती. ती परत शिराझीकडे दिली. शिर अलीच्या गेटावरील हवालदार मिया हुसेनी यास पानगळास पाठविलें. विठोजी व मलिक नूर महमद यास मुस्तफानगरास रवाना केलें. याप्रमाणें सरहद्दीवरील बंदोबस्त केला.[२१०]

२०९. परिशिष्ट २, पृ. ५९.

२१०. परिशिष्ट, २, पृ. ५९-६०

या वर्षाचे सुरुवातीस ( जून १६३३ इ. स. ) मीर फसिहउद्दिन मुर्तझा-नगराहून परत आला. तेव्हां त्याची सर खेली मिर्झा हमजास देऊन त्यास तिकडे रवाना केलें. मीर फसिहउद्दिनास वस्त्रें दिलीं.[२११]

शेख महमदास ७ जुलै १६३३ इ. स. रोजीं पेशवाई दिल्यानंतर त्यास चं. ९ सव्वाल १०४३ हि. ( २९ मार्च १६३४ इ. स. ) रोजीं मुद्दाम दरबार भरवून जुम्लत-इ-मुल्कीचे अधिकार व वस्त्रें दिलीं. दोन घोडे व चांदीची पालखी बक्षिस दिली. त्याच्या बहिणीचा मुलगा वयांत आल्यावरून त्यास सरकारी कारभार सांगितला. दुसऱ्या दिवसापासून ( ३० मार्च ) ते कारभार करूं लागले. त्यांचे तैनातीस मखदुन-इ-मुल्क व सय्यद बाबू त्यांच्या प्रत्येकीं एक हजार पायदळ व शंभर घोड्यांसह दिले. दर गुरुवारीं नवाब-इ-अलामीनें खास-इ-खेलच्या सैन्यासह मृत शाहांच्या कबरींस भेट द्यावी अशी आज्ञा झाली.[२१२]

अबदुल्ला कुत्बशाहानें हैद्राबादेंत तोली मशीद बांधली.[२१३]

अब्दुल्ला कुत्बशाहानें मच्छलीपट्टण, निझामपट्टण, भिमलीपट्टण वगैरे बंदरांत इंग्लिश लोकांस व्यापार करण्याची परवानगी दिली.[२१४]

हि. १०४४ ( १७ जून १६३४ ते ६ जून १६३५ इ. स. ).—जझार-सिंग बुंदेल्यावर खानदुराण जमादिलाखराच्या सुरुवातीस ( नवंबर १६३४चा तिसरा आठवडा ) चालून गेला. तेव्हां डिसेंबरच्या सुरुवातीस बुंदेल्यानें आपलीं माणसें व जडजवाहीर गोवळकोंड्यास पाठविलें. मोगली सैन्य गोंवळकोंड्याच्या हद्दींत शिरलें. बुंदेल्याची मालमत्ता वगैरे वाटेंतच पकडून ताब्यांत घेतली.[२१५]

इराणच्या पातशाहाकडे पाठविलेला खैरातखान सरनौबत इमाम कुली बेग येसावल यास बरोबर घेऊन हि. १०४४त इराणाहून निघून कंदाहारचे रस्त्यानें हिंदुस्थानांत आला. प्रथम शहाजहानास भेटून नंतर तो हैद्राबादेस गेला. ते येत असल्याची बातमी चं. १ जिल्काद (९ एप्रिल १६३५ इ. स.) रोजीं कुत्बशाहास

२११. परिशिष्ट २, पृ. ५६ व ६१.

२१२. परिशिष्ट २, पृ. ५६-७.

२१३. ए. इं. मॉ., १९१७-८, पृ. ५०.

२१४. इं. फॅ. इन इं., १६३४-३६, पृ. १४-२०; मॉन्युमेंटा हिस्टॉरिआ इंडिआ, जर्नल ऑफ दि बाँबे हिस्टॉरिकल सोसायटी, व्हॉ. १, नं. २, सप्टेंबर १९२८, पृ. १८८.

२१५. बादशाह-नामा, इलिअट डॉसन, भाग ७, पृ. ४९-५०.

मिळाली. तेव्हां त्यांस प्रथम मीर मुअझउद्दिन महमद मुशर्रीफ व नंतर शेख महमद तहीर वगैरे सामोरा गेले. त्यांचा सत्कार केला. चं. १७ जिल्काद ( २५ एप्रिल ) रोजीं कुत्बशाहा खैरातावादेस गेला व तेथें त्यांचे नजरनजराणे घेतले. चं. २२ जिल्काद ( ३० एप्रिल ) रोजीं दरबार भरवून त्यांस बऱ्याच मोल्यवान वस्तू नजर दिल्या. शिवाय इराणच्या वकीलाच्या खर्चास मुझाहिदपुरचा महाल दिला. खैरातखानानें बरेच नजरनजराणे दिले. कुत्बशाहानेंहि त्यास सन्मान दिला.

हि. १०४५ (७ जून १६३५ ते २५ मे १६३६ इ. स.).—शहाजहानानें चं. १० साबान जुलुस ९ ( ९ जानेवारी १६३६ इ. स. ) रोजीं[२१६] कुत्बशाहास एक फर्मान काढलें. त्यांतील आशय असाः—" आम्ही असें ऐकतों कीं, तुमच्या राज्यांतील लोक नीट धर्मानें चालत नाहींत. तुम्हीहि त्यांच्या उच्छृंखल वर्तनास मना करीत नाहीं व त्यांना योग्य तें शासनहि देत नाहीं. तरी आम्ही तुम्हांस असें फर्मावतों कीं, तुम्ही आपल्या मुलखांत अशी अव्यवस्था चालूं देऊं नये. कोणीं केलीच तर त्यास ताबडतोब शासन करावें. तुम्ही असें जर न केलें व आमच्या म्हणण्याप्रमाणें वागण्याचें न ठरविलें तर आम्हांस तुमचा मुलूख घेणें भाग पडेल. आणि त्या विलायतेंतील पैसा व माणसें आमचींच आहेत असें समजावें लागेल. शिवाय आम्हांस असेंहि समजतें कीं, तुम्ही आपल्या मुलखामध्यें इराणच्या शाहाच्या नांवानें खुत्बा पढवितां. आतां तुम्ही आमचे चाकर झालां असतां तुम्हांस इराणच्या शाहास रुजू असण्याची गरज काय ? तरी खुत्बा पढणें तो आमच्याच नांवानें पढला पाहिजे. सोबत पाठविलेल्या दिवाणांच्या कागदांवरून पेशकशीची रक्कम किती येणें आहे ती समजेल; ती सर्व आदा करावी. हें फर्मान घेऊन येणारा अबदुल लतीफ हा आमचा विश्वासू व अनुभवी मनुष्य आहे. तो या फर्मानांतील सर्व मजकूर नीट समजून देईल. तुमचे वडील मोहंमद कुत्बउल्मुल्क मरहुम यांनीं आमच्या चाकरीच्या बाबतींत जें लक्ष्य पुरविलें व त्यांनीं आमची जी योग्य चाकरी केली त्यामुळें त्यांचेवर कृपा करून त्यांचेकडे तो मुलुख ठेवला होता हें तुम्हांस जाहीर असावें. जर तुम्ही आपल्या दौलतीविषयीं सदिच्छा दाखविलीत व आमचे हुकुम पाळण्याची शर्त मान्य केलीत तर तुमच्या मुलुखास आमचे कडून

२१६. यांतील ताजा कलम चं. १५ साबानचा (१४ जानेवारी १६३६ इ. स.) आहे.

तोषीस पोहोंचणार नाहीं. तरी वर लिहिलेल्या पेशकशीच्या प्रीत्यर्थ सुंदर व उत्कृष्ट जवाहीर आणि उमदे व चांगले हत्ती — तुमच्या वडिलांनीं दाकसमंदर व बशीर या नांवांचे हत्ती मागें पाठविले होते तसे — व नजरनजराणा घेऊन तुमचा मनुष्य आम्चेकडे पाठवावा. तुम्हांस या बाबतींत जें आम्हांस सांगावयाचें तें मुल्ला अबदुल्ला लतीफ समजून देईलच. तरी आम्ही तुम्हांस जें फर्माविलें आहे त्याचा अंमल ताबडतोब करून पेशकशीची रक्कम लतीफचे हातीं निदान नवरोजाच्या दिवशीं (१० मार्च १६३६ इ. स.) तरी दौलताबादेस आमचे हातीं येईल अशी व्यवस्था झाली पाहिजे. जवाहीर व हत्ती असे असावेत कीं, ते आम्हांस पसंत पडतील. शेवटीं आपण अशी खात्री असूं द्यावी कीं, वरील फर्मानाप्रमाणें आपलेकडून वर्तन न घडेल तर आमचें सैन्य तुमच्या मुलुखांत घुसेल आणि त्यामुळें तुमच्या मुलखाचें व मुलखांतील लोकांचें जें नुकसान होईल त्यास तुमचेंच आचरण कारण असें समजलें जाईल." [२१७]

बुंदेल्याचा मुलगा उदेभान व भाऊ शामदेव गोवळकोंड्यास पळून गेले होते. म्हणून खानदुराण यास कंदाहार व नांदेडच्या बाजूस जाळपोळ करण्याचा शहाजहानानें हुकूम दिला. चं. ८ रमझान (६ फेब्रुवारी १६३६ इ. स.) रोजीं तो स्वारीवर निघाला. कुत्बशाहानें उदेभान व शामदेव यांस कैद करून शहाजहानाकडे पाठविले. चं. ७ सव्वाल (५ मार्च १६३६ इ. स.) रोजीं ते बऱ्हाणपुरास पोहोंचले. [२१८]

शहाजहानाचें फर्मान घेऊन अबदुल लतीफ गोवळकोंड्यास आला. आदिलशाहानें पांच कोस पुढें सामोरा जाऊन त्याला मोठ्या सन्मानानें गोवळकोंड्यास आणलें. कुत्बशाहानें सुनीपंथाचा स्वीकार केला. खुत्बाहि चार खलिफा व शहाजहानाच्या नांवानें वाचण्यास सुरवात केली. चांदीच्या व सोन्याच्या नाण्यांवर शहाजहानाचेंच नांव छापूं लागले. पन्नास लाखांची पेशकशहि नवरोजाचे दिवशीं (चं. १२ सव्वाल = १० मार्च १६३६ इ. स.) येऊन दाखल झाली. अशा रीतीनें सर्व अटी मान्य केल्यावरून त्याचेवर कृपा करावी म्हणून कुत्बउल्मुल्क निजामशाहास वार्षिक चार लाख होनांची खंडणी देत होता ती शहाजहानानें दोन लाखच

२१७. बादशाहनामा ( फारसी मूळ ) भाग १, प्रकरण २, पृ. १३०-३३.
२१८. बादशाहनामा, इलिअट डॉसन, भाग ७, पृ. ५२.

घेण्याचें ठरविलें.[२१९] नंतर जिल्हेज हि. १०४५(मे १६३६ इ. स.)त कुत्ब-शाहानें सोन्याच्या पत्र्यावर तहनामा कोरून शहाजहानाच्या मान्यतेस पाठविला. त्यांतील शर्ती अशा: "मी तुमचा दास असें कबूल करतों कीं, (१) या मुलुखांत खुत्बा पढणें तो नेहमीं तुमच्याच नांवानें पढला जाईल, जुन्या चालीप्रमाणें पढला जाणार नाहीं; (२) चांदीच्या व सोन्याच्या नाण्यांवर तुमचेकडून जे शिक्के तयार करून पाठविले आहेत तेच मारले जातील; (३) निजाम उल्मुल्कास जी चार लाख होनांची खंडणी देत होतों त्यांपैकीं दोन लाख होन खंडणी नऊ जुलुसपासून मी आपणांस कोणतीहि सबब न सांगतां सालोसाल विनतक्रार आपणाकडे पोहोंचती करीन, आणि कोणी पातशाहाजादा दक्षिणच्या सुभ्यावर असेल तर ती त्याजपाशीं देईन व नसेल तर त्या सुभ्यावर जो कोणी बादशाहाकडून नेमला जाईल त्याजकडे ती पोहोंचती करीन; (४) जुलुस आठ साल अखेरपर्यंत माझ्या नांवावर जी बत्तीस लक्ष रुपयांची बाकी काढली आहे तींपैकीं आठ लाख रुपये खंडणीच्या दोन लाख होनांबरोबर दरबाराकडे पाठवून देईन; (५) पेशकशीच्या ऐवजीं पाठवावयाच्या जवाहीर, हत्ती, घोडे व इतर जिनसा यांच्या येथील किंमती व आपल्या तेथें ठरविण्यांत येणाऱ्या किंमतींत जी कांहीं तफावत पडेल तीहि विनतक्रार भरपाई करून देईन व यानंतर पेशकशीच्या ऐवजीं केव्हांहि पाठविण्यांत येणाऱ्या जिनसांच्या बाबतींत हेंच बंधन राहील; (६) यापुढें बादशाहाच्या शत्रूंशीं मनापासून शत्रुत्व ठेवीन; (७) मी मुल्ला अब्दुल लतीफ याच्या समोर शपथ घेऊन जें कबूल केलें आहे त्याच्या बाहेर वर्तन करणार नाहीं; तसें केल्यास मला राज्यावरून दूर करण्याचा हक्क बादशाहाला आहे; (८) आदिलखानी लोकांनीं जर माझ्या मुलुखांत आक्रमण केलें तर त्यांच्या त्या दांडगाईच्या वेळीं बादशाहाच्या दक्षिणेंतील सुभेदारांनीं मला मदत करावी व जर अशी मदत देण्यांत त्यांनीं दुर्लक्ष केलें व त्यामुळें माझें आदिलखानी लोकांकडून नुकसान झालें तर त्या नुकसानीची भरपाई पेशकशीच्या आठ लाख रुपयांमधून करून घेण्याची मला परवानगी असावी." कुत्बशाहानें हा सुवर्णपत्रावरील तहनामा शेख महमुद तहीर नांवाच्या वकिलाबरोबर पाठविला. त्याजबरोबर गजमोती नांवाचा हत्तीहि पाठविला व कळविलें कीं, जें पाठविलें तेवढेंच जडजवाहीर मजजवळ आहे. यापेक्षां अधिक नाहीं. एक रत्न आहे परंतु तें आपणांकडे पाठविण्यायोग्य नाहीं.

२१९. महमदनामा, शिवाजी निबंधावली २, पृ. ९३.

इकडील सर्व मजकूर आमचा वकील निवेदन करील.[२२०] हा तहनामा शहाजहानास मान्य झाला व त्यांतील शेवटच्या अटीप्रमाणें आदिलशाहाशीं केलेल्या तहांत अशी अट घातली कीं, ' तुम्हीं दक्षिणेंत सर्वांत मोठे जमिनदार आहांत तरी तुम्हीं कुत्बउल्मुल्काशीं वडील भावाप्रमाणें वागावें व त्याच्या मुलखास कोणत्याहि प्रकारें तोषीस लावूं नये. पैसा, मुलुख अगर इतर रीतीनें कांहींहि पेशकशी वगैरेच्या निमित्तानें त्यास देण्यास लावूं नये. मांजरा नदी ही राज्यांची सीमा समजावी. तुमच्या व त्यांच्या पूर्वजांचे जे ऋणानुबंध झाले ते जाणून समाधानानें राहावें. "[२२१] ही अट आदिलशाहानें मान्य केली.

हि. १०४६ (२६ मे १६३६ ते १५ मे १६३७ इ. स.).—शहाजहानानें चं. ७ रबिलाखर १०४६ हि. १७ माहे शहरेवर ९ जुलुस (२९ आगस्ट १६३६ इ. स.) रोजीं कुत्बशाहास अहदनामा पाठविला. त्यांतील सारांश असा:—"कुत्बउल्मुल्क यानें जाणावें कीं, ज्या अर्थी ते आमचे चाकर बनले आहेत आणि त्यांनीं आपल्या मुलखामध्यें आमच्या नांवानें खुत्बा पढावयास लाविला आहे व आमच्या शुभ नांवानें नाणीं ( दिनार व दिरम ) पाडण्याचें ठरविलें आहे; व त्याचप्रमाणें ठरवून दिलेली पेशकशहि त्यांनीं दरबाराकडे भरली आहे व यापुढें निजामउल्मुल्कला जें कांहीं देत होते त्यापैकीं दोन लाख होन दर वर्षी सरकारी खजिन्यांत खंडणी म्हणून देण्याचें शपथपूर्वक वचन दिलें आहे त्याअर्थी त्यांचे सर्व जुने गुन्हे माफ करून त्यांस क्षमा केली आहे. आणि त्यांच्याकडे हल्लीं जो मुलुख आहे तो त्यांचेकडे ठेवला आहे. आतां त्यांच्या वंशजांनीं या अटींप्रमाणें वागावें, विरुद्ध आचरण करूं नये. तसेंच आम्ही किंवा आमचीं मुलें अगर आमचे उमराव यांनीं त्यांच्या मुलखास उपद्रव देऊं नये. आणि सुवर्णपत्रावर लिहिलेल्या तहाच्या अटींविरुद्ध जाऊं नये. हा करार वंशपरंपरेनें कायम राहावा."[२२२] याप्रमाणें तह कायम झाल्यानंतर आदिलशाहा व कुत्बशाहा यांचेंहि सख्य झालें.

---

२२०. बादशाहनामा, मूळ फारसी, भाग १, प्रकरण २, पृ. १७८–९; डाग रजिस्टर, १६३६, पृ. २५०.

२२१. महमदनामा, शिवाजी निबंधावली २, पृ. ९३; प्रो. सरकार, औरंगजेब, व्हॉ. १, पृ. ३८.

२२२. बादशाहनामा, मूळ फारसी, भाग १, प्रकरण २, पृ. २१०.

मच्छलीपट्टण येथें डच व तेथील सुभेदार सय्यद महमद यांच्यांत तंटा लागला. परंतु अबदुल्ला कुत्बशाहानें चं. २९ जमादिलाखर ( १७ नवंबर १६३६ इ. स.[२२२] ) रोजीं फर्मान काढून दोघांसहि ताकीद करून डचांस व्यापार करण्याची परवानगी कायम केली. हें फर्मान ता. १८ डिसेंबर १६३६ रोजीं[२२३] मच्छलीपट्टणास पोहोंचलें. तेव्हां तें त्या वेळच्या रिवाजाप्रमाणें मोठ्या समारंभानें शहरांत नेलें.[२२४]

इंग्रज व मच्छलीपट्टणचा सुभेदार सय्यद महमद यांच्यांत मलाक्ल ( Malawola ) गांवाच्या भाडेपट्ट्यावरून व कराच्या रकमेंत ८०० पगोडे अधिक मागितल्यावरून भांडण लागलें. त्यावरून गोवळकोंडा येथील इंग्रजांच्या रॉजर्स नांवाच्या अधिकाऱ्यास कैद करून मारझोड केली. कांहीं सरदारांच्या मध्यस्थीनें त्याची नंतर मुक्तता झाली. परंतु त्यास गोवळकोंड्याबाहेर जाण्यास लवकर परवानगी दिली नाहीं.[२२५]

हि. १०४९ ( २५ एप्रिल १६३९ ते १२ एप्रिल १६४० इ. स. ).—ता. २७ नवंबर १६३९ रोजीं अबदुल्ला कुत्बशाहा आपल्या पांच हजार लवाजम्यासह मच्छलीपट्टणास गेला. तेथें तो ८ डिसेंबर १६३९पर्यंत राहिला. डच व इंग्रजांच्या वखारींत आपल्या बायकांमुलांसह जाऊन त्या पाहिल्या. डचांनीं ३०० पगोडे, घोडे, हत्ती व इतर रत्नें पेशकश दिलीं. कुत्बशाहास इतर लोकांकडून सुमारें आठ लाख पगोडे किंमतीची पेशकश मिळाली.[२२६]

हि. १०५० ( १३ एप्रिल १६४० ते १ एप्रिल १६४१ इ. स. ).—अबदुल्ला कुत्बशाहानें खैरातखानाकडून बाजारपेठ व एक मोठा कुवा रज्जब महिन्यांत ( आक्टोबर १६४० इ. स. ) बांधला.[२२७]

---

२२३. जुन्या पद्धतीप्रमाणें ही तारीख दिली आहे. डच नवी पद्धत वापरीत असत. त्यामुळें त्यांच्या किंवा मूळांतील तारखेपेक्षां ही १० दिवसांनीं अलिकडची दिली आहे.

२२४. मॉन्युमेंटा हिस्टॉरिआ इंडिआ, जर्नल ऑफ दि बॉंबे हिस्टॉरिकल सोसायटी, व्हॉ. १, अं. २, सप्टेंबर १९२८, पृ. १९०-१.

२२५. मॉन्युमेंटा हिस्टॉरिआ इंडिआ, जर्नल ऑफ दि बॉंबे हिस्टॉरिकल सोसायटी, व्हॉ. १, नं. २, सप्टेंबर १९२८, पृ. १९०; मच्छलीपट्टण ते बंटम-पत्र, १ डिसेंबर १६३६चें–इं. फॅ. इन इं., १६३३-३६, पृ. ३२५-६.

२२६. मच्छलीपट्टण ते इराण, पत्र, १४ डिसेंबर १६३९चें, इं. फॅ. इन इं., १६३७–४१, पृ. २२१–२२.

२२७. ए. इं. मॉ., १९१३–४, पृ. ५५ व १९०७–८, पृ. २७.

हि. १०५२ ( २२ मार्च १६४२ ते ११ मार्च १६४३ इ. स. ).— रज्जब महिन्यांत ( आक्टोबर-नवंबर १६४२ इ. स. ) अबदुल्ला कुत्बशाहानें खैरातखानाकडून अंबरखाना व एक मोठें धान्यगृह बांधलें.[२२८]

अबदुल्ला कुत्बशाहाचा सरदार गाझी अली यानें उदयगिरी घेतला.[२२९]

अर्मागांवच्या नायकावर स्वारी करून त्याचा बराच मुलुख काबीज केला. कुत्बशाही सैन्यानें किल्ले गंडकी ( Cowle Galdanche ) येथें तळ दिला.[२३०] श्रीरंगरायानेंहि त्याचा मुलुख घेतला. तेव्हां तिरुमल वेंकटप्पानें कुत्बशाही सैन्याची मदत मागितली. ही कुणकुण कळतांच श्रीरंगानें त्यास कैद केलें. त्याचा मुलुखहि घेतला. तेव्हां तिरुमलाचा भाऊ व इतर नातलगांनीं सैन्य जमविण्याचा प्रयत्न केला व अर्ध्या दिवसाच्या मुक्कामावर तळ देऊन राहिलेल्या कुत्बशाही सैन्याची मदत घेऊन तिरुमलास सोडविण्याची खटपट केली. कुत्बशाही सैन्य तिरुमलाच्या मदतीस चालून गेलें.[२३१]

हि. १०५३ ( १२ मार्च १६४३ ते २९ फेब्रुवारी १६४४ इ.स. ).— कुत्बशाही सैन्य कर्नाटकांतील नायकवाडीकडून त्यांचा मुलुख काबिज करण्याची खटपट करीत होतें.[२३२]

हि. १०५४ ( १ मार्च १६४४ ते १७ फेब्रुवारी १६४५ इ. स. ).— जुलै १६४४त गाझी अली यानें मच्छलीपट्टणजवळील सर्व मुलुख काबिज केला; पुलिकतापासून तीन मैलांवर तळ देऊन राहिला. किल्ला ताब्यांत देण्याबद्दल बोलणें लावलें. परंतु किल्ला मजबूत. सहज हातीं येण्यासारखा नव्हता. म्हणून वेढा दिला नाहीं. आगस्ट महिन्याचे अखेरीस श्रीरंगरायाच्या विरुद्ध उठलेला जिंजीचा नायक

२२८. ए. इं. मॉ., १९१३–१४, पृ. ५७ व १९०७–८, पृ. २७.

२२९. V. R. ii, Nell. 790; B. and V. C. 1385. सिवेलचा ‘ दक्षिण हिंदुस्थानांतील ऐतिहासिक शिलालेख ’, पृ. २७८.

२३०. मद्रास ते बंटम, पत्र, २० सप्टेंबर १६४२; इं. फॅ. इन इं., १६४२–४५, पृ. ४४.

२३१. मद्रास ते बंटम, पत्र, ४ जानेवारी १६४३ व कन्सल्टेशन, २९ डिसेंबर १६४२, इं. फॅ. इन इं., १६४२–५, पृ. ७० व ८०; डाग रजिस्टर १६४१–२, पृ. २७२–९५ व १६४३–४, पृ. २४४ व २५४.

२३२. मद्रास ते बंटम, पत्रें, २५ आगस्ट १६४३ व २८ जानेवारी १६४४, इं. फॅ. इन इं., १६४२-५, पृ. ११५ व १५४.

कुत्बशाहास येऊन मिळाला. श्रीरंगराय अर्मागांवचा नायक व कृष्णापा नायक यांस बरोबर घेऊन डचांचे मदतीस आला. लढाई झाली. तींत गाझी अली व इतर मोठमोठे कुत्बशाही सरदार मारले गेले. कुत्बशाही सैन्य उधळून लावलें. नंतर अर्मागांवच्या पलीकडे कुत्बशाही सैन्य पुन्हां जमूं लागलें.[२३३]

महमद आदिलशाहाचा मुलगा अली याची मुंता करण्याचा समारंभ सोमवार चं. ६ रमजान ( २८ आक्टोबर १६४४ इ. स. ) रोजीं झाला. गुरुवार चं. १० रोजीं मिरवणूक निघाली. या वेळीं अबदुल्ला कुत्बशाहानें आदिलशाहास बराच आहेर पाठविला.[२३४]

हि. १०५५ (१८ फेब्रुवारी १६४५ ते ७ फेब्रुवारी १६४६ इ. स.).— मागील वर्षांत श्रीरंगरायावर त्याचे मांडलिक नायक उठले होते. आदिलशाहानेंहि त्याचे राज्यांत मोहिम चालू ठेवली होती. इ. स. १६४५ आक्टोबरानंतर कुत्बशाहानें मीर जुम्ला यास त्याचेवर पाठविलें. मीर जुम्ला चालून गेला. उदयगिरी व दुसरे दोन किल्ले घेतले. तेथील सरदार मल्लय्या पळून गेला. नंतर मीर जुम्ला वेलोरास गेला व किल्ल्यास वेढा दिला. तेथें श्रीरंगाचें सैन्य चालून आलें. परंतु तें पराभूत झालें. मीर जुम्ल्यानें नंतर कर्नाटकांतील बराच मुलुख आक्रमिला.[२३५]

अबदुल्ला कुत्बशाहानें महमद आदिलशाहास नजराणा पाठविला. तो जिल्हेजच्या मुरवातीस ( जानेवारी १६४६ इ. स.चा पहिला आठवडा ) त्यास रसूलपुरास मिळाला.[२३६]

हि. १०५६ (८ फेब्रुवारी १६४६ ते २७ जानेवारी १६४७ इ. स.).— पुलिकत व सेंट थोमचा मुभा मीर जुम्लास दिला. त्यानें सर्वत्र हिंडून मुलखाची व्यवस्था

२३३. मद्रास ते कौंसिल, पत्रें, ५ जुलै १६४४ व ८ सप्टेंबर १६४४, इं. फॅ. इन इं., पृ. १८४ व १९३; डाग रजिस्टर, १६४४-५, पृ. ३२५, हेग ट्रॅन्सक्रिप्ट्स, मा. १, भा. १४, नं. ४३१.

२३४. महमदनामा व बुसातिन सलातिनांत रज्जब महिना दिला आहे. महमदनामा, पृ. १०६ व बु. स., ३६३. परंतु त्यांत दिलेले सोमवार, गुरुवार व शुक्रवारांप्रमाणें रज्जब महिना चुकीचा ठरतो. रज्जबच्या ऐवजीं रमजान धरल्यास तारिख वारांच्या तपशीलास मेळ बसतो.

२३५. मद्रास ते सुरत, पत्रें, २१ जानेवारी १६४६ व १० फेब्रुवारी १६४६, इं. फॅ. इन इं., १६४६-५०, पृ. २५-६; डच रेकॉर्डस, इ.

२३६. महमदनामा, शिवाजी निबंधावली २, पृ. १०८.

लावली. दुष्काळानें कर्नाटकांत बराच कहर उडविला. मीर जुम्ल्यानें आपला तळ जिंजीपासून दोन दिवसांच्या मुक्कामावरील वेलोरास दिला होता. त्याला तोंड देण्यासाठीं जिंजीचा नायक किंवा श्रीरंगराय पुढें येण्यास धजेना. मीर जुम्ल्यानें आपल्या सैन्यांत युरोपीय लोकांचा भरणा करण्याचा सपाटा लाविला.[२३७]

हि. १०५७ ( २८ जानेवारी १६४७ ते १६ जानेवारी १६४८ इ. स. ).—इंग्रजांनीं तोफा वगैरे पुरविल्यावरून मीर जुम्लानें त्यांचेकडील येणें माफ केलें व कुत्बशाहाचें फर्मान आणवून देऊन त्यांस व्यापाराच्या बऱ्याच सवलती मिळवून दिल्या.[२३८]

चं. २० जिल्काद ( ७ डिसेंबर १६४७ इ. स. ) रोजीं कुत्बशाहा आदिलशाहाविरुद्ध कट करीत असल्याची बातमी मिळाली. तीवरून आदिलशाहानें शासन देण्यासाठीं खानखानास कुत्बशाहावर नेमलें. कुत्बशाहानें नजरनजराणे पाठवून समजूत घालण्याचा प्रयत्न केला. परंतु खानखान जानेवारीच्या दुसऱ्या आठवड्यांत हसनाबादेहून जिंजीकडे जाण्यास निघाला.[२३९]

चं. ६ जिल्हेज ( २३ डिसेंबर १६४७ इ. स. ) रोजीं अबदुल्ला कुत्बशाहाचा वकील हाजी नसीरा यानें आदिलशाहास कळविलें कीं, शहाजी भोंसल्याकडून 'मला तुमच्या आश्रयाखालीं घ्या' अशा अर्थाचें पत्र आलें. परंतु शहाजीची या वेळची व यापूर्वीचीहि अनेक वेळची विनंति आम्ही अमान्य केली व आदिलशाहाच्या नोकरींतच राहावें असें त्यास कळविलें.[२४०]

हि. १०५८ (१७ जानेवारी १६४८ ते ४ जानेवारी १६४९ इ. स.).—जिंजीचा विजयराघव नायक व मदुरेचा तिरुमल नायक यांच्यांत वैमनस्य आलें. तेव्हां तिरुमलानें कुत्बशाहीची मदत घेतली. मीर जुम्लास जिंजीस वेढा घालण्यास सांगितलें. मीर जुम्ला जिंजीवर चालून जातांच विजयराघव घाबरला. त्यानें किल्ला मीर जुम्लास देऊं केला. मीर जुम्ला आपणांस धाब्यावर बसवून किल्ला घेत आहे असें पाहातांच त्यानें आदिलशाहाकडे मदत मागितली. विजापुरी सैन्य

२३७. मद्रास ते सुरत, पत्रें, ४ व २१ जानेवारी १६४७, इं. फॅ. इन इं., १६४६-५०, पृ. ७० व ७४.

२३८. मद्रास, पत्र, ९ आक्टोबर १६४७, इं. फॅ. इन इं., १६४६-५०, पृ.१६७.

२३९. महमदनामा, शिवाजी निबंधावली २, पृ. १२०-१.

२४०. सारसंग्रह, नं. ५३९, पृ. ११७.

तिरुमलाची बाजू घेऊन चालून आलें. कुत्बशाही व आदिलशाही सैन्यें परस्परांपासून अवघ्या दोन दिवसांच्या अंतरावर छावणी देऊन राहिलीं होतीं. या दोन्ही सैन्यांनीं देश उध्वस्त करण्याचा सपाटा लावला. तेवनापट्टण, पोर्टो नोव्हो,* पांडेचरी वगैरे मुलुखाची फारच दुर्दशा उडविली. थोड्याच अवधींत मुसलमानी सैन्यें एक झालीं. तेव्हां तिरुमल विजयराघवास मदत करूं लागला. नंतर मीर जुम्ला व आदिलशाही सरदारांचें पटेनासें झाल. किल्लाहि कठीण, लवकर पडणार नाहीं, हें पाहून मीर जुम्ल्यानें वेढ्याचें काम आदिलशाही सैन्याकडे सोंपवून आपण मुलुखाच्या बंदोबस्ताकरितां म्हणून प्रथम गंडिकोट्यास जाऊन बसला. मुस्तफाखान ता. ९ नवंबर रोजीं वारला. ही बातमी समजतांच मीर जुम्लानें कडप्पा प्रांतांत घुसून मुलूख बळकाविण्यास सुरुवात केली.[२४१] मोगल-कुत्बशाहा-आदिलशाहा यांचा इ. स. १६३६त जो तह झाला त्या तहान्वयें जिंजीच्या वेढ्यांत आदिलशाहानें मध्यें पडण्याची जरूर नव्हती, तसें त्यानें केल्यानें तहाच्या अटी मोडल्या गेल्या वगैरे शहाजहानाकडे कुत्बशाहानें तक्रार केली.[२४२]

हि. १०६० ( २५ डिसेंबर १६४९ ते १४ डिसेंबर १६५० इ.स.).—कुत्बशाहानें आदिलशाहास चार लाख होन व चार उत्तम रत्नें दिलीं व त्याची गंडिकोटा व कोकनवाडीचा मुलुख घेण्याबद्दल अनुमति मिळविली. ही मिळतांच मीर जुम्लानें इ. स. १६५०च्या सुरुवातीस गंडिकोटा घेतला. तेथून तो चंद्रगुतीवर चालून गेला व तांहि घेतला.[२४३]

हि. १०६१ ( १५ डिसेंबर १६५० ते ४ डिसेंबर १६५१ इ.स. ).—मीर जुम्लानें उत्तर कर्नाटकांतील बराच भाग काबिज केला व उत्पन्नहि वीस लाख पगोड्यांवर नेलें. शिवाय हिंदु नायकांकडून दरसाल चाळीस लाख पगोड्यांची खंडणीहि मिळविली. त्याचे पाशीं खासगत चार हजार घोडदळ, तीनशें हत्ती, चार पांचशें उंट, दहा हजार बैल व दहा जहाजें झालीं. त्याचा व्यापारहि फार मोठा

२४१. मद्रास, पत्र, २३ सप्टेंबर १६४८, इं. फॅ. इन इं., १६४६–५०, पृ. २१५; पोर्तुगीज रेकॉर्डस् १६४८, सारसंग्रह, ले. ५४८–९, पृ. ११९; महमदनामा, शिवाजी निबंधावली २, पृ. १२२–३; ला मिशन दु मदुरे, व्हा. ३, पृ. ४५६; बालकृष्णकृत शिवाजी दि ग्रेट, व्हॉ. १. पृ. १२२–२५; बु. स., ५११.

२४२. प्रो. सरकार, मॉडर्न रेव्ह्यु, जुलै १९२३.

२४३. महमदनामा, शिवाजी निबंधावली २, पृ.१३१-३२; मद्रास, पत्र, १८ जानेवारी १६५१, इं. फॅ. इन इं., १६५१-४, पृ. २२-३.

व दूरवर होता. मोगलांशींहि त्यानें दोस्ती केली होती.[२४४] या संपत्ति व शक्तीमुळें तो चढून गेला. त्यानें आदिलशाहींतहि थोडी गडबड केली. तेव्हां आदिलशाहानें इ. स. १६५१च्या अखेरीस खान महमदास त्याचेवर पाठविलें. मीर जुम्ला चंद्रगुत्तीस होता. तेथें खान महमद चालून गेला. मीर जुम्ला किल्ल्यांत जाऊन बसला. आदिलशाही बाजी घोरपड्याच्या सैन्यानें हल्ला चढविला. तेव्हां मीर जुम्लानें महमदखान लोदीस त्याच्यावर पाठविलें. परंतु त्यांत कुत्बशाही सैन्याचा पुरा मोड झाला.[२४५]

हि. १०६२ (५ डिसेंबर १६५१ ते २२ नवंबर १६५२ इ. स.).—सबंध जानेवारी महिना आदिल-कुत्बशाही युद्धांत गेला. खान महमदानें मीर जुम्लास गोवळकोंड्याच्या एका डोंगरांत अडकावून ठेवलें. दोन्ही सैन्यांचा बराच नाश झाला. शेवटीं आदिलशाही सैन्यानें गोवळकोंड्यावर अकस्मात् हल्ला चढविला. तेव्हां मीर जुम्लानें (फेब्रुवारीचे सुरुवातीस) आदिलशाहास सहा लाख होनांची खंडणी दिली. तह झाला. कुत्बशाहाचा सर्व मुलुख परत दिला.[२४६]

हि. १०६४ (१२ नवंबर १६५३ ते ३१ आक्टोबर १६५४ इ. स.).—आदिलशाहाचें वाढतें सामर्थ्य पाहून मीर जुम्लानें कर्नाटकांतील हिंदु नायकांस त्याच्याविरुद्ध उठविण्याचा प्रयत्न केला. आदिलशाही सरदारांशीं सख्यत्वानें न वागतां त्यांच्याशीं अडवणुकीचेंच वर्तन स्वीकारिलें. म्हैसूरच्या नायकास असेंच भरीस घातलें. औरंगजेब दख्खनचे सुभेदारीवर आल्यानें मीर जुम्ला याचें विशेषच फावलें. त्यानें म्हैसुरकरांस औरंगजेबाची मदत मिळवून देण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यानें ती नाकारल्यानें मीर जुम्लाहि म्हैसुरकरांचे मदतीस गेला नाहीं. शेवटीं वेलूरचा किल्ला आदिलशाहानें घेतला व खान महमदास मीर जुम्ल्यावर पाठविलें. मीर जुम्ल्यानें कर्नाटकांतील मुलुखाचा स्वतंत्र पातशाहा होण्याचें मनांत आणलें व

---

२४४. लिटल्टन व वेंकटचें मद्रासहून पत्र, १७ जानेवारी १६५१, ई. फॅ. इन इ., १६५१-४, पृ. १२; हेग ट्रॅन्स्क्रिप्ट्स्, मा. १, भा. १७, नं. ५१८.

२४५. महमदनामा, शिवाजी निबंधावली २, पृ. १३२; मनुची, भा. १, पृ. २३४.

२४६. महमदनामा, शिवाजी निबंधावली २, पृ. १३२; मद्रास, पत्रें, १४ जानेवारी व १२ फेब्रुवारी १६५२, इं. फॅ. इन इं., १६५१-४. पृ. ९९ व १११.

त्याप्रमाणें त्यानें आदिलशाहाशीं बोलणें लावलें. त्यामुळें कुत्बशाहा व मीर जुम्ला यांच्यांत बेबनाव उत्पन्न झाला.[२४७]

हि. १०६५ ( १ नवंबर १६५४ ते २० आक्टोबर १६५५ इ. स.).—अब्दुल्ला कुत्बशाहानें मीर जुम्ला यास गोवळकोंड्यास आणण्याबद्दल पुष्कळ प्रयत्न केला. मीर जुम्लाची स्वतंत्र होण्याची खटपट चालूच राहिली. तो राज्यच बळकावितो कीं काय याची लोकांस भीति वाटूं लागली.[२४८]

हि. १०६६ ( २१ आक्टोबर १६५५ ते ९ आक्टोबर १६५६ इ. स. ).—मीर जुम्ल्यानें शहाजहानाशीं बोलणें लावून मोगलांच्या नोकरींत शिरण्याचें ठरविलें. औरंगजेबानें मीर जुम्लास तावडतोब मिळवून घेण्याचा प्रयत्न केला. त्याचेकडे महमद अमीन नांवाचा मनुष्य पाठविला. मीर जुम्लाचा मुलगा मीर महमद अमीन याजकडेहि बोलणें लावलें. मीर महमद अमीन याचा स्वभाव मुळांतच उद्दाम होता. तो आपल्या बापाच्या संपत्तीच्या व सामर्थ्याच्या जोरावर खास कुत्बशाहाशींहि बेपर्वाईनें वागत असे. मीर जुम्लाची बायको व इतर नातलग गोवळकोंड्यास होते. त्यामुळें त्याला मोगलांकडे सहज निघून जातां आलें नाहीं. औरंगजेबाजवळ चाललेलें हें खलबत उघडकीस येतांच कुत्बशाहास राग आला. शेवटीं मीर जुम्ल्यानें औरंगजेबाकडे संरक्षणार्थ अर्ज केला. तो त्यानें शहाजहानाकडे रवाना केला. ही बातमी समजतांच कुत्बशाहानें मीर महमद अमीन व मीर जुम्लाच्या इतर नातलगांस कैद केलें. मीर महमद अमीन यानें दारूच्या धुंदींत कुत्बशाहाच्या खास बैठकीवर निजल्यानें व त्याची बैठक खराब केल्यावरून त्यास २१ नवंबर १६५५ रोजीं कैद केलें. कैद करितांना मीर जुम्ल्याच्या लोकांनीं थोडासा विरोध केलाच. शहाजहानानें ता. ३ डिसेंबर १६५५ रोजीं फर्मान काढून मीर जुम्ला व त्याच्या मुलास आपल्या नोकरींत घेतलें. या फर्मानाबरोबरच शहाजहानानें कुत्बशाहास एक खलिता लिहून मीर जुम्लास मोगली हद्दींत आपल्या सर्व मालमत्तेसह येऊं देण्या-

---

२४७. हेग ट्रॅन्सक्रिप्टस्, माला १, भाग १९, नं. ५५० व ५५१; मद्रास, पत्र, १८ सप्टेंबर १६५४, इं. फॅ. इन इं., १६५१-४, पृ. २९०; महमदनामा, शिवाजी निबंधावली २, पृ. १३३; बु स., पृ. ५३६.

२४८. मद्रास, पत्र, १७ डिसेंबर १६५५, इं. फॅ. इन इं., १६५५-६०, पृ. ४०.

विषयीं लिहिलें होतें. हें पत्र औरंगजेबास ता. १८ डिसेंबर १६५५ रोजीं मिळालें. त्यानें कुत्बशाहाचें पत्र हैद्राबादेस रवाना केलें. त्यापूर्वी औरंगजेबानें मीर जुम्लास कैद केल्याची बातमी शहाजहानास कळविली व जरूर पडल्यास कुत्बशाहावर चालून जाण्याची परवानगीहि मागितली होती. परंतु मीर जुम्लाच्या सूचनेप्रमाणें औरंगजेबानें अकस्मात् हल्ला घातल्यास कुत्बशाहाकडून राज्य हिसकाविणें शक्य होतें. कुत्बशाहाचें उत्तर येण्यापूर्वीच व शहाजहानाकडून दुसऱ्या खलियास फर्मान येण्यापूर्वीच औरंगजेबानें आपला मुलगा सुलतान महमद यास चं. ८ रबिलाखर ( २६ डिसेंबर १६५५ ) रोजीं कूच करून नांदेडास मुक्काम करण्यास सांगितलें. ' सुलतान महमद आपल्या चुलत्याकडे ओरिसाच्या मार्गानें बंगाल्यांत जात आहे तरी त्यास कुत्बशाहींतून जाण्यास वाट मिळावी ' म्हणून कुत्बशाहास कळविलें.[२४९] सुलतान महमद नांदेडास ता. ७ जानेवारी १६५६ रोजीं आला. अधिक कुमक येण्याची व पुढील हुकुमाची तो वाट पहात होता. शहाजहानानें औरंगजेबाच्या दुसऱ्या पत्राचें उत्तर पाठवून त्यास कुत्बशाहावर लढाई करण्याची परवानगी दिली. ती ता. ७ जानेवारी रोजीं पोहोंचली. या फर्मानांत मीर जुम्ला व त्याच्या सर्व नातलगांस सोडण्याची ताकीद होती. हें फर्मान औरंगजेबानें कुत्बशाहाकडे पाठविलें व त्याचबरोबर सुलतान महमदास कुत्बशाही मुलखांत घुसण्यास सांगितलें. तो ता. १० जानेवारी रोजीं नांदेडाहून निघाला व ता. २३ जानेवारीस हैद्राबादेजवळ आला. दुसरें फर्मान व सुलतान महमद चालून आलेला पाहतांच कुत्बशाहानें मीर महमद अमीन व इतर मंडळी व नोकरचाकर यांस सोडलें व सुलतान महमदाच्या हवालीं केलें. स्वामिनिष्ठेचें पत्रहि त्याचबरोबर रवाना केलें. सुलतान

२४९. अकीलखान रझी, मनुची व बर्नीअर यांनीं दिलेली ही हकीकत (हादिकतमध्येंहि ही दिली आहे) प्रो. सरकार यांच्या मतें बरोबर नाहीं. परंतु ज्या अर्थी शहाजहानाचें लढाईस परवानगी देणारें फर्मान बऱ्याच उशीरानें आलें त्या अर्थी तत्पूर्वी सुलतान महमद मीर जुम्लानें सुचविल्याप्रमाणें कुत्बशाही घशांत टाकण्यास जात आहे असें बाह्यतः तरी दाखविणें शक्य नव्हतें. यामुळें प्रो. सरकार यांचें या बाबतींतील मत ग्राह्य वाटत नाहीं. सरकार, औरंगजेब, व्हॉ. १, पृ. २५२, बर्नीअर पृ. २०, मनुची, व्हॉ. १ पृ. २३४, परिशिष्ट २ पृ. ७१. कर्नाटकाचे बाबतींतहि सर्व जबाबदारी मीर जुम्लावर टाकून अबदुल्ला कुत्बशाहास मी तुमची बाजू घेऊन प्रयत्न केला हे सांगण्यांत तरी औरंगजेबानें कुत्बशाहाशीं जें वर्तन ठेवलें तें दारा व इतर मंडळीच्या भीतीनें आंत एक व बाहेर एक असेंच होतें असें दिसून येतें. सरकार, औरंगजेब, व्हॉ. १, पृ. २४६ टीप.

महमद हुसेनसागरास आल्यानंतर त्याजकडे जडजवाहिराचा मोठा नजराणा पाठविला. औरंगजेब २० जानेवारीस दौलताबादेहून निघाला. ता. २१ जानेवारी रोजीं कुत्बशाहाचा वकील त्यास जाऊन भेटला. परंतु अद्यापि सर्व मालमत्ता रुजू केली नाहीं या सबबीवर त्या वकीलाचें त्यानें ऐकलें नाहीं. रोजचे रोज नवीन नवीन नजराणे कुत्बशाहा पाठवीत होता. कुत्बशाही वकीलाची अशी संभावना झालेली पाहतांच कुत्बशाहानें आपली सर्व मालमत्ता, जडजवाहीर वगैरे ता. २२ जानेवारी रोजीं रात्रीं गोवळकोंड्यास नेलें. औरंगजेबानें सुलतान महमदास कुत्बशाहास ठार मारण्याचा हुकूम केला होता. परंतु सुलतान महमद हुसेनसागरास येण्यापूर्वीच कुत्बशाहा गोवळकोंड्याच्या किल्ल्यांत जाऊन बसला. ता. २४ रोजीं सुलतान महमद हैद्राबादेंत शिरला. ता. २२च्या रात्रीपासून तें ता. २४च्या दुपारपर्यंत शहरांत भयंकर लुटालुट झाली व जाळपोळ केली. कागदसंग्रह, ग्रंथसंग्रह वगैरेंचा नाश केला. सुलतान महमदानें स्थिरस्थावर करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. परंतु फारसा उपयोग झाला नाहीं. कुत्बशाहानें रोज मोल्यवान नजराणे व माणसें पाठवून तह करण्याचा शक्य तो प्रयत्न चालूच ठेवला होता. शेवटीं कुत्बशाहानें विजापुरकरांची मदत मागितली. ता. ६ फेब्रुवारीस औरंगझेब हैद्राबादेस आला. तेव्हां कुत्बशाही सैन्यानें हल्ला चढविला. सायंकाळपर्यंत लढाई झाली. तींत दोन्हीहि बाजूंचें बरेंच नुकसान झालें. रात्रीं कुत्बशाही सैन्य जंगलांत व किल्ल्यांत आश्रयास गेलें. दुसऱ्या दिवशीं गोवळकोंड्याचा वेढा चालू झाला. औरंगजेबाच्या अपेक्षेप्रमाणें शाहिस्तेखानाकडून मदत यावी ती आली नाहीं व आवशाच्या तोफाहि आल्या नाहींत. त्यामुळें अकस्मात् छापा घालून कुत्बशाही बुडविण्याचा डाव फसला. कुत्बशाही सैन्य बाहेरून सारखे हल्ले चढवीत होतें. किल्ल्यावरून तोफांचाहि मारा चालू होता. परंतु त्याच वेळीं तहासाठींहि कुत्बशाहा सारखी खटपट करीत होता. शहाजहानाकडे माफीची याचना केली. उलट औरंगजेबाची आकांक्षा वाढत होती. कुत्बशाही राज्य गिळंकृत करण्याचा त्याचा विचार होता. त्यानें शहाजहानास कुत्बशाहाची अगर त्याच्या तर्फे दारा वगैरेंनीं केलेली विनंति मान्य करूं नये असेंच लिहिलें. परंतु शहाजहानानें दाराच्या विनंतीवरून कुत्बशाहानें खंडणी दिल्यास लढाई थांबविण्याचा हुकुम दिला. तो औरंगजेबास ता. २४ फेब्रुवारी रोजीं मिळाला. परंतु कुत्बशाहाची विनंति मान्य केल्याचें ता. ८ फेब्रुवारीचें फर्मान कुत्बशाहास पोहोंचूंच दिलें नाहीं. मार्चचे सुरवातीस कुत्बशाहानें आपला जांवई

मीर महमद यास औरंगजेबाकडे पाठवून बोलणें लावलें. शाहिस्ताखान व सुलतान महमद यांच्या तर्फे हयात बख्क्ष बेगमेनें स्वतःच भेट घेण्याची इच्छा प्रदर्शित केली. शहाजहानाचें फर्मान आलेंच होतें व शाहिस्तेखान व सुल्तान महमदानें कुत्बशाहाची बाजू घेतल्यानें मागील खंडणीची बाकी व एक कोट रुपयांची पेशकश व कुत्बशाहाची दुसरी मुलगी हिचें सुलतान महमदाशीं लग्न या अटींवर तह करण्याची तयारी दाखविली. परंतु पेशकशीची रक्कम जबरदस्त असल्यानें तह कायम होण्यास बराच अवधि लागला. दरम्यान लढाई चालूच होती. कुत्बशाहाचा सरलष्कर मुसाखान यानें किल्ला लढविला. रात्रंदिवस झटून मेहनत घेतली. मोगलातर्फे मीर-इ-मीरान तोफखाना चालवीत होता. तो ता. २७ मार्च रोजीं मारला गेला. नंतर ता. २९ रोजीं शहाजहानाचें औरंगजेबास वेढा तावडतोब उठविण्याबद्दल फर्मान आलें. त्यांत औरंगजेबाच्या वर्तनाबद्दल शहाजहानानें राग प्रदर्शीत केला होता. नाइलाजास्तव ता. ३० मार्च रोजीं औरंगजेबानें गोवळ-कोंड्याचा वेढा उठविला. नंतर चार दिवसांनीं सुलतान महमदाचें कुत्बशाहाच्या दुसऱ्या मुलीशीं लग्न झालें. ता. १० मार्च रोजीं कुत्बशाहाची मुलगी सुल्तान महमदाच्या डेऱ्यांत दाखल झाली व कुत्बशाहानें औरंगजेबासमोर कुराण हातीं घेऊन राजनिष्ठ राहण्याची शपथ घेतल्यानंतर शहाजहानाचें माफी केल्याचें फर्मान, तह-नाम्याच्या अटी मान्य केल्याचें शहाजहानाच्या दसकतीचें फर्मान, वस्त्रें वगैरे ता. १३ एप्रिल रोजीं कुत्बशाहाकडे पाठविलीं. हयात बख्क्ष बेगम व औरंगजेबाचा जनान-खाना यांच्या विनंतीवरून पेशकशीच्या २५ लाख रुपयांच्या पहिल्या हप्त्यांतून दहा लाखांची सूट मिळाली व नंतर शहाजहानानें खंडणीच्या किंमतीच्या फरका-बद्दल द्याव्या लागणाऱ्या पैशांतून वीस लाखांची सूट दिली. कुत्बशाहाला रामगीरचा प्रांतहि हातचा घालवावा लागला. मोगली सैन्य ता. २१ एप्रिल रोजीं हैद्राबादेहून निघालें व कंदाहारावरून परत दौलताबादेस गेलें.[२५०]

मोगली सैन्य परतल्यानंतर कुत्बशाहानें गोवळकोंड्याच्या तट दुरुस्तीचें वगैरे काम मुसाखानाकडे सोंपविलें. किल्ल्यासभोंवतालील चार मैलांपर्यंतचीं घरें वगैरे पाडून खंदक बांधण्यास सुरुवात केली. तटहि उंच केला. धर्माचार्य नांवाच्या खास

२५०. सरकार, औरंगजेब, व्हॉ. १, पृ.२११–४१; मनुची, व्हॉ. १, पृ. २३१–४, बादशाहनामा, इलिअट डॉसन, व्हॉ. ७, पृ. १०६–१९; ए. ई. मॉ., १९१३–१४ पृ. ५२–५५.

अधिकाऱ्याची त्या कामावर देखरेख होती. हें काम बरींच वर्षे चाललें. हि. १०७७ ( इ. स. १६६६ )त तें पूर्ण झालें.[२५१]

कुत्बशाहाशीं एप्रिलमध्यें तह झाला. परंतु मीर जुम्लानें मिळविलेला कर्नाटकांतील प्रांत त्याची जहागीर म्हणून मोगलांकडे द्यावा असा औरंगजेबानें आग्रह धरला. त्यानें वारंवार लिहून व मीर जुम्ला शहाजहानास भेटला तेव्हां त्यांच्या तर्फे बोलणें लावून कुत्बशाहास फर्मान आणलें कीं, कर्नाटक प्रांतांतील तुमचे सर्व अधिकारी काढून घ्यावेत व मीर जुम्लास कुत्बशाही राज्यांत पूर्ववत् व्यापार करूं द्यावा. अबदुल्ला कुत्बशाहास हा हुकूम मान्य करणें भाग होतें. परंतु कुत्बशाही सरदारांनीं कर्नाटकाचा ताबा हातून न जाऊं देण्याचे शक्य ते प्रयत्न केले व मीर जुम्लाच्या सरदारांस ताबा देण्यास दिरंगाई केली. मीर जुम्लानें दहा हजार घोडदळ पाठविलें. या सैन्यास ५०,००० कर्नाटकी सैन्य मिळालें. परंतु कुत्बशाही सरदारांनीं कर्नाटकांतील जमिनदार व मांडलिक यांस चिथावून त्यांस बंडास प्रवृत्त केलें. श्रीरंगरायासहि उठवून त्यास आपला मुलूख परत घेण्यास उत्तेजित केलें. श्रीरंगरायाचा सासरा वेंगम नायक हा ८००० सैन्यानिशीं पेटापोलमवर चालून गेला. परंतु मीर जुम्ल्याचा सरदार मीर सय्यद अली त्यास तोंड न देतां पुलिकतास गेला. तेव्हां कोन्नरचेटीनें पुलिकत व पुनामलीस वेढा घातला. जिकडे तिकडे अशा तऱ्हेनें गोंधळ माजल्यामुळें मीर जुम्लाच्या सरदारांचा धीर सुटत चालला. तिरुपति, चिंगलप्पुट, पुलिकत वगैरे प्रांत श्रीरंगानें घेतला. कुत्बशाही सरदारांनींहि शक्य तो अडथळा केला.[२५२]

हि. १०६७ (१० आक्टोबर १६५६ ते २८ सप्टेंबर १६५७ इ. स.).—श्रीरंगानें मीर जुम्ल्याच्या कर्नाटकांतील सरदारांचा पराजय केला व कुत्बशाही कर्नाटकांतील बराच भाग त्यानें परत घेतला.[२५२]

औरंगजेबानें इ. स. १६५७त आदिलशाहीवर स्वारी करण्याची तयारी केली. मीर जुम्लास तिकडे जाण्याचा हुकूम झाल्यानें कर्नाटकाचा बंदोबस्त व्हावा तसा राहूं शकला नाहीं. औरंगजेबानें कुत्बशाहास पत्रें लिहून त्याच्या

---

२५१. ए. इं. मॉ., १९१३–१४, पृ. ५२–५५; मद्रास ते सुरत, पत्र १६ जुलै १६५६, इं. फॅ. इन इं., १६५५–६०, पृ. ९१.

२५२. सायमंडचें पत्र, २ ऑगस्ट १६५६, मद्रास पत्रें, ७ जुलै १६५६, २१ आक्टोबर १६५६, ५ नवंबर १६५६, व २८ जानेवारी १६५७, इं. फॅ. इन इं., १६५५–६०, पृ. ९०–९९; सरकार, औरंगजेब, व्हॉ. १, पृ. २४२–५१.

वर्तनाबद्दल त्याला जरबहि देण्याचा प्रयत्न केला. परंतु शहाजहानाच्या दुखण्यानें व आदिलशाहावर केलेल्या स्वारीचा फायदा घेऊन कुत्बशाहानें मीर जुम्लाच्या सरदारांपासून प्रांत सोडविण्याची खटपट चालूच ठेवली. शेवटीं गंडिकोटा, सिद्धौत वगैरे किल्ले घेतल्यानें कुत्बशाहास पुन्हां कर्नाटकांत हातपाय पसरण्यास अवसर मिळाला.[२५२]

हि. १०६८ (२९ सप्टेंबर १६५७ ते १८ सप्टेंबर १६५८ इ. स.).—मीर जुम्ल्याचा सरदार तुपाकी कृष्णप्पा यानें फोर्ट सेंट जॉर्जला सप्टेंबर १६५७त वेढा घातला. तोफांच्या अभावीं त्या वेढ्यापासून कांहींच निष्पन्न झालें नाहीं. शेवटीं १९ एप्रिल १६५८ रोजीं वेढा उठविला.[२५३]

बळीरावानें पुनामल्लीस वेढा घातला होता. तोहि कृष्णाप्पा व अय्यापा नायकांच्या सांगण्यावरून त्यानें उठविला.[२५३]

कृष्णाप्पानें चिनातांबी मुदलिआर यास पुलिकतवर पाठविलें. त्यानें तेथें जाऊन मीर जुम्ल्याचा सरदार सय्यद अली यास ठार मारलें व शहर ताब्यांत घेतलें. पुनामल्लीच्या लोकांनीं बंड केलें. म्हणून मुदलिआर पुलिकतहून पुनामल्लीवर चालून गेला.[२५३] तुपाकी कृष्णाप्पाहि त्यास जाऊन मिळाला. परंतु पुनामल्लीच्या लोकांनीं कुत्बशाहाच्या मदतीवर विश्वासून किल्ला निकरानें लढविला. आक्टोबर १६५८ मध्यें कुत्बशाहाचा सरदार कुली बेग यानें जाऊन लढाई दिली. त्यांत तुपाकी कृष्णाप्पाचा पूर्ण पराभव झाला. तो जखमी होऊन कैद झाला. नंतर कुली बेगनें मद्रासच्या सभोंवतालील सर्व मुलुख काबिज केला.[२५४]

हि. १०६९ (१९ सप्टेंबर १६५८ ते ८ सप्टेंबर १६५९ इ. स.).—चंद्रगिरीचा राजा व कुत्बशाह यांची लढाई चालूच होती.[२५५]

कुत्बशाहानें मच्छलीपट्टणास ब्राह्मण सुभेदार त्या मुलुखाचा बंदोबस्त करण्यास पाठविला. त्यास डच व इंग्रज वखारवाल्यांनीं पेशकशी दिल्या.[२५६]

---

२५३. मद्रास, पत्रें, १४ जून, २२ जुलै व आगस्ट १६५८, इं. फॅ. इन इं., १६५५–६०, पृ. १७४–६.

२५४. मद्रास, पत्र, २८ आगस्ट १६५८, इं. फॅ. इन इं, १६५५–६६, पृ. १७५–६; हेग ट्रॅन्सक्रिप्टस, मा. १, भा. २३, नं. ६३९.

२५५. मद्रास, पत्र, ८ आगस्ट १६५९, इं. फॅ. इन. इं., १६५५–६६ पृ. २५७.

२५६. मच्छलीपट्टण, पत्र, १८ जाने. १६६० इं. फॅ. इन. इ., १६५५-६०, पृ. २५८-९६.

हि. १०७० ( ९ सप्टेंबर १६५९ ते २७ आगस्ट १६६० इ.स.).—मीर जुम्लाच्या कर्नाटका या प्रांतांत नीट व्यवस्था लागेना. म्हणून औरंगजेबानें मीर अहमद खाफीस मुस्तफाखान असा किताब देऊन या वर्षाचे सुरुवातीस बंदोबस्ताकरितां पाठविलें.[२५७]

हि. १०७१ (२८ आगस्ट १६६० ते १६ आगस्ट १६६१ इ. स.).—नेलोर परगण्यांत एक देऊळ पाडून मशिद बांधली.[२५८]

औरंगजेबानें शाहिस्तेखानास दक्षिणेंत शिवाजीवर पाठविल्यावरून तो जानेवारी १६६१च्या सुमारास दक्षिणेंत आला. कुत्बशाहानें आपली खंडणी चुकती केली होती. परंतु ती रुपयांत दिली होती. औरंगजेबानें ती पगोड्यांत पाहिजे असल्याचें कळविलें. नवीन १२८ पगोड्यांची किंमत जुन्या १०० पगोड्यांइतकी उतरल्यानें कुत्बशाहानें थोडी दिरंगाई लावली. तेव्हां शाहिस्तेखानास ती जरब दाखवून वसूल करण्याचा हुकूम झाला असल्यानें त्यानें गोवळकोंड्यावर चालून जाण्याचें ठरविलें. कुत्बशाहानें सैन्याची भरती करण्यास सुरुवात केली व किल्ल्याचीहि डागडुजी केली. ४० लाख होन खंडणीबाबत भरले. शेवटीं तफावतीचीहि भरपाई केल्यानें लढाईचा प्रसंग टळला.[२५९]

इंग्रज, डच वगैरेकडील कर वसूल करण्यासाठीं कुत्बशाहानें मुसलमान सरदार मोठ्या सैन्यानिशीं मच्छलीपट्टणास रवाना केला.[२६०]

डचांनीं आपल्या कौलीअरच्या तर्फे सेंट थोमवरून पोर्तुगीजांना काढून लावण्याबद्दल बोलणें लावलें. कुत्बशाहा आजारीच असल्यानें त्यानें मीर हकीम मुल्क

२५७. आलमगीरनामा, हिंदी, देवीप्रसादजी मुन्शिफकृत भा. १, पृ. ४७.

२५८. V. R. ii Nellor. 787; B. and V. C. 1331. सिवेलकृत 'दक्षिण हिंदुस्थानांतील शिलालेख' पृ. २८२.

२५९. ऑन मेरा हिस्टॉरिआ इंडिया, १६६१, जर्नल ऑफ दि बॉबे हिस्टॉरिकल सोसायटी, व्हॉ. २, नं. २, सप्टेंबर, १९२९, पृ. २६४-५; मद्रास, पत्र, १९ फेब्रुवारी १६६१, इं. फॅ. इन इं., १६६१-४, पृ. ३५; मनुशी, भा. २, पृ. २५; डाग रजिस्टर १६६१, नवीन भाग १८, पृ. ३२१.

२६०. मच्छलपट्टण, पत्र, १५ फेब्रुवारी १६६१, इं. फॅ. इन इं., १६६१-४, पृ. ३९.

( Mr. Hakkim Molk ) सरलष्कर याजकडे तो कारभार सोंपविला. कांहींहि निश्चित झालें नाहीं.[२६१]

अब्दुल्ला कुत्बशाहानें आपली तिसरी मुलगी अबुल हसन यास दिली. मुसाखान व सय्यद मिरजाफर यांनीं तें लग्न जुळविण्यांत बरीच खटपट केली.[२६२]

हि. १०७२ ( १७ आगस्ट १६६१ ते ५ आगस्ट १६६२ इ.स.).— कुत्बशाही सरलष्कर रेझा कुली उर्फ नेकनामखान यानें सेंट थोमच्या पोर्तुगीजांजवळ दोन मोठ्या तोफा मागितल्या. त्या त्यांनीं देण्याचें नाकारलें. या कारणावरून रेझा कुलीनें किल्ल्यास वेढा दिला. यापूर्वी डच टपून बसले होते. तेव्हां त्यांची मदत मिळणें शक्य नव्हतें. म्हणून पोर्तुगीजांनीं इंग्रजांची मदत मागितली. ती त्यांनीं दिली नाहीं. उलट रेझा कुली व सेंट थोमच्या शहरवासीयांनीं त्यांस मदत न केल्याबद्दल दोष दिला. नेकनामखानानें जोराचे हल्ले चढविले व दाणागोटाहि बंद केला. शेवटीं पोर्तुगीजांनीं सेंट थोम ता. १ मे १६६२ रोजीं नेकनामखानाचे हातीं दिला व पोर्तुगीज मद्रासला पळून गेले. नेकनामखानानें ५००–६०० घोडेस्वार सेंट थोमच्या संरक्षणार्थ ठेवले.[२६३]

हि. १०७३ ( ६ आगस्ट १६६२ ते २५ जुलै १६६३ इ. स. ).— तंजावरचा नायक व आदिलशाहा यांची लढाई चालू असल्यानें नेकनामखान आपल्या सैन्यानिशीं तिरुवेल्लूराला जाऊन बसला.[२६४]

मच्छलीपट्टणचा सुभेदार फतुल्लाखान याचें आणि इंग्रजांचें भांडण आलें. कुत्बशाहाचा सरखैल ( the next man to the king ) सय्यद मीर जाफर याजकडे मारहाण केल्याबद्दल तक्रार नेली. कुत्बशाहानें ती अमान्य केली व नुकसान झालेंच असेल तर त्याचा विचार करण्याचें आश्वासन दिलें. फतुल्लाखानानें

२६१. मॉन्युमेंटा हिस्टॉरिआ इंडिया, १६६१, जर्नल ऑफ दि हिस्टॉरिकल सोसायटी, व्हॉ. २, नं. २, सप्टेंबर १९२९, पृ. २६०–६५.

२६२. परिशिष्ट १, पृ.६–१२ व परिशिष्ट २, पृ. ७९–८२.

२६३. मनुशी, भा. ३, २७५–६; मद्रास, पत्रें, ११ मार्च, ७ एप्रिल व १२ मे १६६२, ३० जानेवारी १६६३, इं. फॅ. इन इं., १६६१–४, पृ. १४६, २५८–६४.

२६४. मद्रास, पत्र, १६ नवंबर १६६२, इं. फॅ. इन इं., १६६१–४, पृ. १७४.

कुत्बशाही तराफयांस समुद्रांतील परवाने देण्यांत दिरंगाई केली होती. ते इंग्रजांनीं तावडतोब दिले.[२६५]

मार्च १६६३त मच्छलीपट्टणास बंड झालें. मोठमोठ्या लोकांत मारामारी लागली. बरेच लोक प्राणास मुकले. २००० घोडदळ व २०००० पायदळ बंदोबस्तास गेलें.[२६६]

हि. १०७४ ( २६ जुलै १६६३ ते १४ जुलै १६६४ इ. स. ).— नबाब मीर जाफर कांहीं दिवस आजारी पडून १६३३च्या जुलैंत वारला.[२६६अ]

इंग्रजांकडून करवसुलीचा हप्ता बरोबर आला नाहीं. तेव्हां नेकनामखानानें आपल्या तीसचाळीस हजार सैन्यासह फोर्ट सेंट जॉर्जजवळ इ. स. १६६३च्या आक्टोबर-नवंबरांत तळ दिला. इंग्रजांचा व नेकनामखानाचा हिशेब मिटेना. कुत्बशाहानें कांहीं जरुरीच्या कामासाठीं नेकनामखानाला परत गोंवळकोंड्यास तावडतोब बोलाविल्यानें हिशेब तसाच गोंधळांत राहिला. शेवटीं इंग्रजांनीं मुसाखानास पेशकश व इतर नजरनजराणे पाठवून भांडण मिटविण्याचा प्रयत्न केला.[२६७]

सयामच्या राजाचा हेजीब कुत्बशाहाच्या मुलाखतीस आला. बरोबर बरेच हत्ती वगैरे सामान आणलें होतें.[२६८]

हि. १०७५ ( १५ जुलै १६६४ ते ४ जुलै १६६५ इ. स. ).— ( आक्टोबर-नवंबर १६६४ ) गोंवळकोंड्यांत हिंदु-मुसलमानांत मोठी तेढ आली. त्याचा इतरत्रहि परिणाम झाला.[२६९]

---

२६५. मच्छलीपट्टण, कन्सल्टेशन, ४ नवंबर, मद्रास, पत्र, १७ डिसेंबर १६६२, १० जानेवारी १६६३, इं. फॅ. इन इं., १६६१–४, पृ. १७३, १७५–६.

२६६. मच्छलीपट्टण, पत्र, २ एप्रिल १६६३, इं. फॅ. इन इं., १६६१–६४,पृ.२६८.

२६६अ. मद्रास, पत्र, २० जुलै, १६६३, ओल्ड मद्रास व्हेस्टिजिस, भा. १, पृ. २१२.

२६७. मद्रास, पत्रें, ३० जुलै, १० डिसेंबर १६६३, ७ जानेवारी व १८ आक्टोबर १६६४ व ९ जानेवारी १६६६, इं. फॅ. इन इं., १६६१–४, पृ. २७७–८.

२६८. मद्रास, पत्र, १६ व २५ एप्रिल १६६४, इं. फॅ. इन इं., १६६१–४, पृ. ३६३–४.

२६९. मद्रास, पत्र, १८ डिसेंबर १६६४, इं. फॅ. इन इं., १६६१–४, पृ. ३८२–४.

या वर्षाचे सुरुवातीस शिवाजीला आदिलशाहा व कुत्बशाहा यांची आंतून मदत असल्यामुळें त्यानें सुरत लुटलें असा आरोप ठेवून सुरतेच्या नुकसानीची भरपाई करण्याबद्दल औरंगजेबानें कुत्बशाहाशीं बोलणें लावलें.[२७०]

डच वखारवाल्यांनीं सरखेल सय्यद मुझाफरातर्फे पुलिकतच्या वखारीस कोट बांधण्याची कुत्बशाहाची परवानगी मिळविली.[२७०]

कुत्बशाहानें औरंगजेबाकडे जो खंडणीचा भरणा केला होता त्यांतील पुलिकत येथें पाडलेल्या रुपयांबद्दल बरीच तक्रार आली. त्यावरून नेकनामखानानें डचांस दोष दिला. कुत्बशाहाहि आपल्या अधिकाऱ्यांच्या निष्काळजीपणाबद्दल त्यांच्यावर रागावला.[२७०]

या वर्षाचे अखेरीस डच वखारवाल्यांनीं कुत्बशाहास उत्तम हत्ती नजर केला. कुत्बशाहानें डचांस मच्छलीपट्टण येथें अदाह्य घरें बांधण्यास परवानगी दिली. मच्छलीपट्टणांत तेथील सुभेदाराच्या जुलमामुळें लागलेलीं भांडणें मिटलीं व लोक स्थिरस्थावर होऊं लागले.[२७१]

हि. १०७६ (५ जुलै १६६५ ते २३ जून १६६६ इ. स.).—इ. स. १६६५च्या मार्चच्या अखेरीस जयसिंग दक्षिणेंत आला. येतांच कुत्बशाहा व आदिलशाहा यांच्याशीं मागील खंडणी वगैरेबद्दल बोलणें लावून लढाईची दहशत दाखविली. परंतु या दोन्हीहि शाहांनीं पडतें घेऊन तह कायम ठेवण्याचा प्रयत्न केला. जयसिंगानें निर्णयात्मक कांहींच ठरूं दिलें नाहीं. त्यामुळें कुत्बशाहानें नेकनामखानास मोठ्या सैन्यानिशीं संरक्षणार्थ सरहद्दीवर ठेवलें व जयसिंग-शिवाजी यांची लढाई चालू असतां मोगलास स्वामिनिष्ठेचीं पत्रें पाठवीत राहून शिवाजीसहि सैन्याची वगैरे मदत केली.

जयसिंगानें या दक्षिणी त्रयींतून शिवाजीस प्रथम फोडून त्याला आदिलशाहाशीं लढण्यास उद्युक्त केलें. नंतर जुलै-आगस्टमध्यें कुत्बशाहाशीं बोलणें लावून त्याला आदिलशाहास मदत न करण्याविषयीं लिहिलें. त्याचप्रमाणें मैत्री वृद्धिंगत करण्यासाठीं कांहीं सुटी वगैरेहि देण्याचें आश्वासन दिलें. नंतर २९ डिसेंबर १६६५

---

२७०. मॉन्युमेंटा हिस्टॉरिआ इंडिआ, ९ आक्टोबर १६६४चा वृत्तांत, जर्नल ऑफ दि बॉंबे हिस्टॉरिकल सोसायटी, व्हॉ ३, नं. २, सप्टेंबर १९३०, पृ. २७८-९, २८२.

२७१. मॉन्युमेंटा हिस्टॉरिआ इंडिआ, जर्नल ऑफ दि बॉंबे हिस्टॉरिकल सोसायटी, व्हॉ. ४, नं. १, मार्च १९३१, पृ. ७७.

रोजीं जयसिंग सैन्यासह विजापुराजवळ आला. तेव्हां कुत्बशाहानें नेकनामखानास आदिलशाहाच्या मदतीस जाण्यास सांगितलें. नेकनामखानाबरोबर बारा हजार घोडदळ व चाळीस हजार पायदळ होतें. जयसिंगानें कुत्बशाही सैन्य आदिलशाहाच्या मदतीस येत आहे असें ऐकून ता. ५ जानेवारी १६६६ रोजीं वेढा उठविला व मोगली सैन्यास मागें परतण्याचा हुकूम दिला. कुत्बशाही सैन्य जानेवारीच्या अखेरीस विजापुरास पोहोंचलें. आदिलशाहानें नेकनामखान व त्याच्या सैन्यास शहरांत सन्मानानें आणण्याचा हुकुम दिला व अलीबुरुजासमोर मुजरा घेतला. नंतर आदिलशाही सैन्य एका बाजूवरून व कुत्बशाही सैन्य दुसऱ्या बाजूवरून मोगलावर हल्ले चढविण्यास विजापुराहून निघालें. मोगली सैन्य आपल्या मुलुखांत गेल्यानें कुत्बशाही सैन्यास लढाई देण्याचा प्रसंगच आला नाहीं. शेवटीं मोगल-आदिल-कुत्बशाहा यांचा तह झाला व त्यांचीं सैन्यें आपआपल्या राज्यांत परत गेलीं.[२७२]

मद्रासच्या पोर्तुगीज व कांहीं इंग्रज वखारवाल्यांनीं गडबड केल्यावरून नेकनामखानानें तेथील सैन्याकडून फोर्ट सेंट जॉर्जला वेढा देवविला.[२७२अ]

हि. १०७७ ते १०७९ (२४ जून १६६६ ते २१ मे १६६९ इ.स.).—कर्नाटकांत या वेळपर्यंत तनखा देऊन सरकारी सुभेदार नेमले जात असत. त्याऐवजीं या वर्षी तेथें लहान लहान जहागिरी निर्माण करून त्या ठराविक भाडेपट्टयानें अगर खंडणीनें दिल्या.[२७३]

शिवाजी आग्र्याहून १७ आगस्ट १६६६ रोजीं निसटला. गोवळकोंडा प्रांतांतून हैद्राबादेवरून तो परत दक्षिणेंत आला. येतांच कुत्बशाहाशीं खलबत करून दोघांनीं मिळून राज्यांचा विस्तार करण्याचें ठरविलें. लढाईची चांगली तयारी केली. सर्व प्रकारची मदत कुत्बशाहानें द्यावी व शिवाजीनें किल्ले काबिज करावेत

---

२७२. प्रो. सरकार, औरंगजेब, व्हॉ. ४, पृ. १०१, १०६, ११४, ११८, १२३; फिंच मॅन्यु, भा. १, पृ. ३३६; सारसंग्रह, पृ. २८७; बु. स. ६०२–५; पेडापोलम, पत्र, २३ जानेवारी १६६६, इं. फॅ. इन इं., १६६५–७, पृ. २२८.

२७२अ. मद्रास, पत्र, २० एप्रिल १६६६, सुरत, पत्र, १८ डिसेंबर १६६५. इं. फॅ. इन इं., १६६५–७.

२७३. मच्छलीपट्टण, पत्र, ७ जानेवारी १६६७, इं. फॅ. इन इं., १६६५–७, पृ. २५४.

असें ठरलें. आदिलशाहींतील व नंतर मोगली हद्दींतील बरेच किल्ले घेतले. त्यांपैकीं एकदोन फक्त कुत्बशाहाच्या हवालीं झाले. बाकीचे शिवाजीनें बळकाविले.[२७४]

हि. १०८० (२२ मे १६६९ ते १० मे १६७० इ. स.).— (आक्टोबर १६६९) कुत्बशाहाच्या हेजिबानें औरंगजेबाची भेट घेतली. एक हजार मोहरा व पंधरा हत्ती नजर दिले.[२७५]

हि. १०८२ (१ मे १६७१ ते १८ एप्रिल १६७२ इ. स.).— अबदुल्ला कुत्बशाहानें मुसाखानाकडून एक मशिद बांधविली.[२७६]

हि. १०८३ (१९ एप्रिल १६७२ ते ८ एप्रिल १६७३ इ. स.).— रविवार चं. ३ मोहरम हि. १०८३ (२१ एप्रिल १६७२) रोजीं अबदुल्ला कुत्बशाहा वारला.[२७७] अबदुल्ला कुत्बशाहानें मृत्यूपूर्वी आपल्या वजिरांस बोलावून आणून आपले मागें राज्य अबुल हसन यास देण्याबद्दल सांगितलें होतें. परंतु अबदुल्ला कुत्बशाहा मरतांच त्याची वडील मुलगी 'फतिमा खानन ऊर्फ मा साहेबा खानिझ-इ-कातन' हिनें आपल्या सावत्र मुलास तख्तावर बसविण्याचा प्रयत्न केला. तिचा नवरा मिर्झा निजामउद्दीन अहमद यास त्याच्या चढेल स्वभावामुळें मोठमोठ्या वजिरांपैकीं कोणींच साहाय्य केलें नाहीं. फतिमा खाननें आपल्या तुर्की व सिद्दी नोकरांच्या साहाय्यानें राजवाडा ताब्यांत घेतला. परंतु मुसाखान, सय्यद मुझाफर आणि त्याचे पेशकर मादण्णा व आक्कण्णा व मलिक मिष्क मिया यांनीं स्थिरस्थावर करून अबुल हसन यास तख्तावर बसविलें. मिर्झा अहमद व त्याचा मुलगा मीर अली यांस कैद केलें.[२७८]

अबदुल्ला कुत्बशाहास एक मुलगा व तीन मुली झाल्या. मुलगा आठ महिन्यांचा होऊन ३१ डिसेंबर १६३२ रोजीं रात्रीं वारला.[२०३]

---

२७४. मुंतखब-उल लुबाब, इलिअट डॉसन, व्हॉ. ७, पृ. २८६–७; मच्छलीपट्टण, पत्रें, १६ जुलै व ३ आणि २१ सप्टेंबर व सुरत, पत्र, नवंबर १६६६, इं. फॅ. इन इं., १६६५–७, पृ. २४५, २४७, २४९, १७५–६; जेधे शकावली.

२७५. औरंगजेबनामा, भाग २, देवीप्रसाद मुन्सिफकृत, पृ. १९.

२७६. शिलालेख, ए. इं. मॉ., १९१७–८, पृ. ५०.

२७७. कबरीवरील शिलालेख, ए. इं. मॉ., १९०७–८, पृ. २६, १९१५–६, पृ. ४०; परिशिष्ट २, पृ. ६७;

२७८. परिशिष्ट १, पृ. १४–५ व परिशिष्ट २, पृ. ८८–९०.

अबदुल्ला कुत्बशाहास बुधवार चं. ६ रमझान हि. १०४० ( ३० एप्रिल १६३१ इ. स. ) रोजीं एक मुलगी झाली.[१९०] ही बहुधः वडील मुलगी असावी. हिचें लग्न मिर्झा निजामउद्दिन अहमदाशीं झालें. हा इराणचा शाहा आब्बास दुसरा याचा भाचा असून[२७९] मदिनाचा रहिवाशी होता. याचें पहिलें लग्न मक्केस झालें. या पत्नीपासून त्याला सय्यद अली नांवाचा एक मुलगा मदिना येथें जुलै १६४२ इ. स.त झाला. त्यानंतर मिर्झा निजामउद्दिन हैद्राबादेस आला व त्याचें अबदुल्ला कुत्बशाहाच्या वडील मुलीशीं इ. स. १६५६ पूर्वी लग्न झालें. याचा मुलगा सय्यद अली मासुम हाहि १८ डिसेंबर १६५७ रोजीं हैद्राबादेस आला. हे दोघेहि हैद्राबादेस राहात असत. मिर्झा निजामउद्दिन हा कुत्बशाही सरदारांशीं नीटपणें वागत नसे. त्यास स्वतंत्र अधिकार दिला नव्हता. हा व सय्यद अली यांस अबदुल्ला वारतांच कैदेंत टाकलें. मिर्झा अहमद कैदेंत असतांनाच शनवार चं. २६ सफर हि. १०८५ रोजीं ( २३ मे १६७४ इ. स. ) सायंकाळीं वारला.[२७९] त्याची बायको फतिमा खानन ऊर्फ मा साहेबा खानिझ-इ-कातन ही चं. २० सव्वाल हि. १०८७ ( १६ डिसेंबर १६७६ इ. स. ) रोजीं वारली.[२८०] तिचा सावत्र मुलगा सय्यद अली इ. स. १६८२चे सुरुवातीस कैदेंतून पळाला व बऱ्हाणपुरास जाऊन औरंगजेबास भेटला. त्यानें त्याला नोकरींत घेतलें. दीडहजारी दिली. सय्यद अली औरंगजेबाबरोबर औरंगाबादेला ( २२ मार्च १६८२ इ. स. ) आला. त्यानें त्याला औरंगाबादेची फौजदारी ( Haris ) दिली. तेथें तो बरेच दिवस होता. नंतर त्याला माहुर वगैरे किल्ल्यांची हवालदारी मिळाली. नंतर तो बऱ्हाणपुरचे दिवाणीचे कामावर होता. पुढें कांहीं दिवसांनीं यात्रेस जाण्याची परवानगी घेऊन मेशेद, इस्पहान वगैरे ठिकाणीं गेला. शेवटीं त्यानें शिराझ शहरीं पाठशाळा काढली व तेथेंच तो इ. स. १७०५त वारला. यानें बरेच ग्रंथ लिहिले.[२८१]

अबदुल्ला कुत्बशाहाची दुसरी मुलगी औरंगझेबाचा वडील मुलगा सुलतान महमद यास दिली होती. तिचें ४ एप्रिल १६५६ रोजीं लग्न झालें व ती ता. १०

---

२७९. कबरीवरील शिलालेख, ए. इं. मॉ., १९२३–४, पृ. ३२.

२८०. कबरीवरील शिलालेख, ए. इं. मॉ., १९१५–६, पृ. ४०; ए. इं. मॉ., १९०७–८, पृ. २६वर तिचे कबरीवरील याच शिलालेखांतील तारीख १३ सव्वाल हि. १०८७ ( ९ डिसेंबर १६७६ इ. स. ) दिली आहे.

२८१. परिशिष्ट १, पृ. ५; परिशिष्ट २, पृ. ८३–८६.

एप्रिल रोजीं सुलतान महमदाकडे गेली.[२५०] सुलतान महमद ८ जून १६५९ रोजीं सुजास मिळाला. नंतर आठ महिन्यांनीं तो परत बापाकडे आला. औरंगजेबानें त्याला ग्वाल्हेर येथें कैदेंत ठेवलें. इ. स. १६७२च्या डिसेंबरांत त्यास कैदेंतून मुक्त करून दिल्लीस आणलें. नंतर तो ३ डिसेंबर १६७६ रोजीं वारला.[२८२]

अबदुल्ला कुत्बशाहाची तिसरी मुलगी अबुल हसन ऊर्फ तानाशाहा कुत्बशाहास दिली होती. हिचें इ. स. १६६०त लग्न झालें. हिला अबदुल्लाच्या मृत्यूपूर्वी दोन मुली व एक मुलगा झाला होता.[२८३] या मुलालाच बंदी सुलतान या नांवानें संबोधलें गेलें असावें. औरंगजेबानें यास कुत्बशाही बुडविल्यानंतर दरबारांत दाखल करून घेतलें होतें. परंतु कुत्बशाही सरदार याला मान देतात हें पाहून त्याला दरबार मना केला.[२८४]

अबदुल्ला कुत्बशाहानें आरबी व फारसी जाणणारे लोक जवळ ठेवून तत्कालीन उत्तम उत्तम ग्रंथ वाचवून घेतले होते. याच्या कारकीर्दीत लेखकवर्गास बरेंच उत्तेजन मिळालें व पुष्कळ ग्रंथ लिहिले गेले. 'बऱ्हाण-इ-काटेआ' नांवाचा फारसी शब्दकोश अबदुल्ला कुत्बशाहासच ग्रंथकर्त्यानें अर्पण केला. मंगळवार हा आठवड्याच्या सुटीचा दिवस ठरविला. पुष्कळ शाळा ( मदारिस-इ-अली ) काढून त्यांवर पगारी शिक्षक नेमले.[२८५]

२०. **मीर जुम्ला:**—महमद सय्यद हा इराणांतील आर्दिस्तानचा राहणारा. हा एका तेलाच्या व्यापाऱ्याचा मुलगा. हा तरुणपणींच ( १६३० इ. स. ) हैद्राबादेस आला व एक जडजवाहीर विकणाऱ्या व्यापाऱ्याजवळ राहून बराच पैसा मिळविला. इ. स. १६३६च्या अखेरीपर्यंत तो व्यापारच करीत असावा.[२८६] लवकरच अबदुल्ला कुत्बशाहाच्या मर्जीत आल्यानें त्याला त्यानें नोकरींत घेतलें. नोकरींत घेतल्यावरहि त्यास स्वतंत्र व्यापार करण्याची परवानगी होती. मिर्झा हमजास इ. स. १६३३त सरखेली दिली होती.[२११] बहुधः इ.स. १६३७त मिर्झा

२८२. प्रो. सरकार, औरंगजेब, व्हॉ. ३, पृ. ४३–४.
२८३. परिशिष्ट १, पृ. १४–५.
२८४. परिशिष्ट २, पृ. १८२–३.
२८५. परिशिष्ट २, पृ. ५७–८ व ६८.
२८६. सुरत डायरी, २५ डिसेंबर १६३६, इं. फॅ. इन इं., १६३३–३६, पृ. ३१५.

इमजाची सरखैली सय्यद महमद अमीनास दिली असावी.[२८७] सय्यद महमदानें व्यापारासाठीं स्वतःचींच गलबतें (Junks) बांधण्यास सुरुवात केली. पहिलें ८०० टनी गलबत नरसापुरास इ. स. १६३८ जुलैंत बांधलें.[२८८] इराणापर्यंत हीं गलबतें जाऊं लागलीं. इ. स. १६४३त इंग्रज वखारवाल्यांसहि शेंकडा दीड टक्के व्याजानें रकमाहि देऊं केल्या. मीर महमद अमीन इ. स. १६४६च्या अखेरीस 'गोवळकोंडा राज्यांतील सर्वसत्ताधीश वजीर व सरखैल' समजला गेला.[२८९] इ. स. १६४५च्या अखेरीस कुत्बशाहानें कर्नाटकांत श्रीरंगावर स्वारी केली. सय्यद महमदास मुख्य सेनापती नेमलें. बहुधः त्या वेळीं सय्यद महमदास मीर जुम्लतीचा अधिकार मिळाला असावा.[२९०] इ. स. १६४६च्या अखेरीस त्याला 'अल-नवाब' म्हणून संबोधूं लागले असावेसें दिसतें.[२९१] इ. स. १६४७च्या पावसाळ्यांत तो युरोपिअन लोक नोकरीस ठेवूं लागला. मोठमोठ्या तोफाहि त्यानें विकत वगैरे घेतल्या.[२९२] इ. स. १६५१च्या सुरुवातीस मीर जुम्ल्याच्या सत्तेचें व संपत्तीचें पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे. "सर्व राज्याचा कारभार जवळ जवळ त्याच्याच अनुमतीनें चालतो. कुत्बशाहाच्या खालोखाल यालाच सर्वजण मान देतात. त्यानें वार्षिक वीस लाख पगोड्यांचा प्रांत अधिक मिळवून दिला आहे. कर्नाटकाचा जवळ जवळ सर्वच भाग त्यानें जिंकला. या प्रांतांत सर्व तऱ्हेचें कापड होतें. जडजवाहीर, लोखंड, पोलाद, सोडा वगैरे जिन्नस येथें बरेच मिळतात. हिंदु राजांकडून वार्षिक चाळीस लाखांची खंडणी वसूल करतो. त्याच्या खास मालकीचे चार हजार घोडे, तीनशें हत्ती, चारपांचशें उंट, दहा हजार बैल असून त्याचा व्यापार गोवळकोंडा, विजापूर, व मोगली प्रांतांत चालतो. शिवाय पेगु, तेनासरी, आचीन, आराकन, इराण,

२८७. मच्छलीपट्टण, पत्र, २६ सप्टेंबर १६३७, इं. फॅ. इन इं., १६३७–४१, पृ. ३०. या पत्रांत सरखैलीचा प्रथम उल्लेख आला आहे.

२८८. सुरत, पत्र, २६ जुलै १६३८, इं फॅ. इन इं.,१६३७–४१, पृ. ८०.

२८९. सुरत, पत्र, १७ जानेवारी १६४३, इं. फॅ. इन इं., १६४२–४५, पृ. ८८.

२९०. मद्रास, पत्र, २१ जानेवारी १६४६ व १० फेब्रुवारी १६४६, इं. फॅ. इन इं., १६४६–५०, पृ. २५६. या पत्रांत प्रथमतःच सय्यद महमदास मीर जुम्ला म्हटल्याचें आढळतें.

२९१. मद्रास, पत्र, ४ जानेवारी १६४७, इं. फॅ. इन इं., १६४६–५०, पृ. ७०.

२९२. मद्रास, पत्र, ९ आक्टोबर १६४७, इं. फॅ. इन इं.,१६४६–५०, पृ. १६६.

बंगाल, मक्का, मेदक, मालदीव व मादागस्कर या बंदरांतहि त्याचीं गलबतें जातात व व्यापार करतात. त्याचीं सध्यां दहा मोठीं गलबतें असून तो आणखीहि बांधीत आहे. "[२९३] इ. स. १६५५च्या अखेरीस त्यानें जवळजवळ दीडशें कोस लांबीचा प्रांत कुत्बशाहींत सामील केला. परंतु इ. स. १६५५त त्याला स्वतंत्र होण्याची इच्छा झाली. आदिलशाहाकडे प्रथम बोलणें लावलें. परंतु तेथें त्याच्या इच्छेप्रमाणें घडून न आल्यामुळें त्यानें औरंगजेबातर्फे शहाजहानाशीं बोलणें लावलें. त्यामुळें त्याच्यांत व कुत्बशाहांत वैमनस्य आलें. शेवटीं अबदुल्ला कुत्बशाहानें त्याचीं मुलेंमाणसें कैद करून मालमत्ताहि २१ नवंबर १६६५ रोजीं जप्त केली. परंतु मीर जुम्ला व त्याचा मुलगा महमद अमीन यांस मोगली नोकरींत घेतल्यानें त्यांस २३ जानेवारी १६५६ रोजीं मोगली सैन्यांत मुक्त करण्यांत आलें. नंतर औरंगजेबानें गोवळकोंड्यास वेढा घातला. तो चालू असतां ता. २० मार्च १६५६ इ. स. रोजीं मीर जुम्ला औरंबजेबाला हैद्राबाद येथें भेटला. परंतु शहाजहानाचा कडक हुकूम आल्यामुळें सबंध कुत्बशाही मोगलांच्या घशांत घालण्याचा त्याचा बेत फसला. एप्रिल १६५६त तह झाला. त्यांत कर्नाटक प्रांत मीर जुम्ल्याची जहागीर झाली व त्यास कुत्बशाहींत पूर्ववत् व्यापार करण्याची परवानगी राहिली. परंतु यानंतर कर्नाटकाचा कारभार त्याला स्वतःस पाहणें अशक्य झाल्यानें दक्षिणेंतील हिंदु राजे व कुत्बशाहा यांनीं आस्ते आस्ते तो प्रांत घेतला.[२५०] औरंगजेबानें मीर जुम्ल्यास दिल्लीस ७ मे १६५६ रोजीं रवाना केलें. तो तेथें ७ जुलै १६५६ला गेला. मीर जुम्ल्यास मुआझ्झमखान असा किताब देऊन त्यास शहाजहानानें आपला मुख्य वजीर केलें. नंतर २६ नवंबर १६५६ रोजीं त्याला विजापुरच्या स्वारींत औरंगजेबास मदत करण्यासाठीं जाण्याचा हुकूम झाला. मीर जुम्ला दिल्लीहून १ डिसेंबर रोजीं निघाला व १८ जानेवारी १६५७ रोजीं औरंगाबादेस आला. २८ फेब्रुवारी रोजीं बिदराजवळ गेला व २ मार्चला बिदरास वेढा घातला. पावसाळ्यापर्यंत वेढा चालूच राहिला. मध्यंतरीं मीर जुम्ल्यानें आपलें सैन्य कुलबर्ग्यापर्यंत नेऊन बरीच लुटालूट केली. परंतु आदिलशाहाशीं तह करण्याचा हुकूम आल्यावरून औरंगजेबास दक्षिण पादाक्रांत करण्याच्या मीर जुम्ल्याच्या आकांक्षेस आळा घालावा लागला. पुन्हां औरंगजेबानें तहान्वयें परेंडा घेण्याच्या इराद्यानें आदिलशाहाशीं लढाई सुरू केली. इकडे

---

२९३. लिटलटन व वेंकटचें मद्रासहून पत्र, १७ जानेवारी १६५१, इं. फॅ. इन इं. १६५१-४, पृ. १२.

शहाजहान आजारी झाला व त्याचें दुखणें दिवसेंदिवस वाढूं लागलें. त्यानें दारास तख्ताचा वारस केलें. तेव्हां दारानें औरंगजेबाचा मदतगार मीर जुम्ला यास दक्षिणेंतील लढाईची सबब सांगून त्याची मुख्य वजिरी दूर केली. त्याचा मुलगा महमद अमीन दरबारांत काम पाहात असे त्याला दरबार मना केला. परेंडा घेतल्यानंतर परत दरबारीं यावें असा शहाजहानच्या नांवानें मीर जुम्ल्यास हुकूम काढला. औरंगजेबानें मीर जुम्ल्यास २८ सप्टेंबर १६५७ रोजीं परेंडावर पाठविलें. त्याच्या अपेक्षेप्रमाणें किल्ला हातीं येण्याचें चिन्ह दिसेना. तरी त्याला अशा वाटत होतीच. औरंगजेबानें आदिलशाहीचा बेत ओळखला व त्यानें ४ नवंबर १६५७ रोजीं सुलतान महमदास मीर जुम्ल्याच्या मदतीस रवाना केलें. तरीहि किल्ला हातीं येईना. औरंगजेबाचा तर दिल्लीच्या राजकारणाकडे अधिकाधिक ओढा पडूं लागला. तेव्हां त्यानें सुलतान महमदास परत बोलावून सुलतान मुआझ्झमाला परेंडावर पाठविलें. परंतु किल्ला हातीं येईना. इकडे औरंगजेब तख्तासाठीं प्रयत्न करूं लागल्याचें समजतांच मीर जुम्ल्यास दिल्लीस येण्याविषयीं डिसेंबर १६५७त ताकीदपत्रें धाडलीं. उलट औरंगजेबानें या पत्रांचा फायदा घेऊन मीर जुम्ल्यास तांतडीनें परत बोलाविलें. तो १ जानेवारी १६५८ रोजीं औरंगाबादेस पोहोंचला. त्यास औरंगजेबानें भेटण्यास बोलाविलें. तो नाखुषीनें त्याला भेटला. परंतु औरंगजेबानें त्याला तात्काळ कैद केलें. नंतर औरंगजेब तख्तावर येतांच त्याची दौलताबादेहून सुटका झाली. तो दौलताबादेहून निघून प्रथम औरंगजेबास भेटला. त्यास खान-इ-खानन असा किताब देऊन त्याला जानेवारी १६५९त सुजा बिहार प्रांतांत पळून गेला होता त्याच्या पाठलागार्थ पाठविला. १२ मे १६६० पर्यंत त्याला सुजाशींच झगडावें लागलें. नंतर मीर जुम्ल्यास बंगालच्या सुभेदारीवर पाठविलें. त्यानें कुचविहार व आसामचा प्रांत काबीज केला. परंतु या मोहिमेवर असतांनाच तो डिसेंबर १६६२त आजारी झाला व नंतर डाक्का येथें १ एप्रिल १६६३ रोजीं वारला.[२९४] मीर जुम्ल्याचा मुलगा महमद अमीन कांहीं दिवस दिल्लीस होता. शेवटीं त्याला लाहोरची सुभेदारी दिली होती. तेथें तो बरींच वर्षे होता. मीर जुम्ला मरतांच त्याचा दक्षिणेंतील व्यापार व दर्यावर्दी व्यवहार सर्व बुडाला.

---

२९४. प्रो. सरकार, औरंगझेब व्हॉ. १, पृ. २५८–३११, ३४१–६३; व्हॉ. २, पृ. २३७–८८, व्हॉ. ३, १५६-७९; परिशिष्ट २, पृ. ७०, ७४-९; मद्रास, पत्र, नवंबर १६५६ व २८ जानेवारी १६५७, व्हेस्टिजेस ऑफ ओल्ड मद्रास, भा. १, पृ. १६५–८.

२१. अबुल हसनचें पूर्ववृत्तः—अबुल हसनच्या पूर्वजांची अगर घराण्याची कांहींच माहिती अद्यापि उपलब्ध नाहीं. त्याच्या बापाच्याहि नांवाचा कोठें उल्लेख आढळत नाहीं. तो अरब असून चांगल्या व प्रसिद्ध घराण्यांतील होता. तो गोवळकोंड्यास आला व कुत्बशाहास भेटला. तेव्हां त्याच्या फारसी बोलीवरून व इराणी पेहराव व वागणुकीवरून त्यास कुत्बशाहानें आपल्या नौकरींत ठेवलें. एक लहानसा सुभा दिला. आस्ते आस्ते तो वाढत वाढत मोठ्या हुद्यावर आला व वारला. त्यास जहागिर वगैरे मिळाली नसल्यानें त्याच्या मृत्यूनंतर अबुल हसनला गरिबींत दिवस काढावे लागले. अबदुल्ला कुत्बशाहाच्या घोडदळांत त्यानें नौकरी धरली व त्यास दरमहा दहापंधरा पगोड्यांचें वेतन मिळूं लागलें. बापाच्या मृत्यूनंतर त्यानें जवळजवळ चवदा वर्षे अशा हलाखींत काढलीं.[२९५]

याच सुमारास अबदुल्ला कुत्बशाहानें आपल्या तिसऱ्या व आवडत्या मुलीसाठीं सुल्तान महमद नांवाच्या एका सय्यद घराण्यांतील तरुणाची योजना केली होती. परंतु त्याला आपण पातशाहाचा जांवई होणार या कल्पनेनें पछाडल्यामुळें तो राज्यांतील मोठमोठ्या सरदारांशीं व वजिरांशीं अगदीं उद्दामपणाचें वर्तन करूं लागला. त्या योगानें त्याचें व कुत्बशाहाचा वडील जांवई मीर महमद याचेंहि वांकडें आलें. शेवटीं कुत्बशाहाच्या वजिरांनीं –बहुधः मुझाफरखानानें– सुल्तान महमदाऐवजीं दुसरा एखादा उच्च घराण्यांतील व स्वरूपवान् वर शोधावा असें अबदुल्लाच्या मनांत भरवून दिलें. अबदुल्लानें मुसाखान व सय्यद मीर जाफर यांचा सल्ला घेतला. त्यांस मुझाफरखानाचा विचार पटला. कुत्बशाहानें वर शोधण्याचा त्या वजिरांना हुकूम दिला. त्यांनीं अबुल हसनची निवड केली. सय्यद मीर जाफर यानें अबुल हसन यास घरीं बोलावून आणलें व त्याला इकडे तिकडे कुशल प्रश्न विचारून त्याच्या बापाच्या थोरवीबद्दल बरीच प्रशंसा केली. त्याच्या त्या वेळच्या दैनावस्थेबद्दल दिलगिरी प्रदर्शित केली. मोठी नोकरी मिळणें शक्य असल्यास मदतहि देण्याचें आश्वासन दिलें. या अवधींत कुत्बशाहानें अबुल हसनास पडद्याआड्न चांगलें पाहून घेतलें. त्याचें रूप त्याला प्रथम पसंत आलें नाहीं. मीर जाफरनें काळजीनें व गरीबीनें त्याची चर्या तेवढी प्रफुल्ल दिसत नाहीं, परंतु त्यास थोडीशी सुस्थिति प्राप्त होतांच तो सुंदर दिसेल असें सांगितलें. कुत्बशाहानें प्रयत्न करून पाहाण्याची आज्ञा दिली. मीर जाफरनें आपल्या सराफास (पोतदारांस?) अबुल हसनची खासगी

२९५. परिशिष्ट १, पृ. २–३.

गांठ घेऊन त्याला लागेल तो पैसा देण्याचा व त्यास अशा प्रकारची आज्ञा आहे हें न समजूं देण्याचा हुकूम दिला. सराफांनीं अबुल हसनशीं मैत्री संपादिली. त्यास थोडथोडा पैसाहि कर्जाऊ देऊं लागले. दोनतीन हजार होनांपर्यंत कर्ज दिलें. बहुधः थोडा अधिक खर्च करून व मेजवान्या देऊन नोकरींत बढती करून घेण्याचा उपाय सुचविला असावा व अशा तऱ्हेनें प्राप्ती वाढतांच कर्जफेड करण्याची सवडहि त्यांनीं दिली असावी. पैसा मिळूं लागतांच त्यानें घोडे, नोकरचाकर वगैरे ठेवले व याप्रमाणें सुखानें आयुष्य जाऊं लागतांच थोड्याच महिन्यांत तो चांगला दिसूं लागला. मीर जाफरनें त्याच्या चर्येत व वर्तनांत बराच बदल झालेला पाहतांच त्यानें पुन्हां त्यास कुत्बशाहास दाखविण्याची खटपट केली. तेव्हां तो कुत्बशाहाच्या मनांत भरला व त्यानें अबुल हसन वारंवार त्याच्या नजरेस पडेल अशी व्यवस्था करण्याचा हुकूम दिला. दिवसेंदिवस अबदुल्लाच्या मनांत तो जास्तच भरूं लागला. शेवटीं अबदुल्ला कुत्बशाहानें आपली मुलगी अबुल हसन यास देण्याचा नक्की बेत केला. हा गुप्तपणें केलेला निश्चय मूर्त स्वरूपांत आणण्याची आज्ञा झाली. सुलतान महमद किंवा मीर अहमद यांस दखलहि लागूं दिली नाहीं.[२९६]

एके दिवशीं सायंकाळीं कुत्बशाहानें जाफर बेग, डबीर व एक घोडेस्वार अबुल हसनला आणण्यास रवाना केला. त्या वेळीं अबुल हसन आपल्या मित्र-मंडळींस मेजवानी देण्यांत दंग झाला होता. सरकारी अधिकारी दाराशीं आलेले पाहतांच तो बराच गोंधळला. विशेषतः कुत्बशाहाकडील अंगरखा पुढें करतांच तर तो अगदींच घाबरला. त्याला तो अंगरखा विषारी असून कुत्बशाहानें आपल्याला मारण्याच्याच उद्देशानें पाठविला असावा असें वाटून त्यानें डबीरास 'आपण कांहीं एक गुन्हा केला नसून अगदीं इमानानें वागत आलों आहों. जर कांहीं अलीकडे अधिक खर्च करून माझ्या कुलास योग्य अशा इतमामानें वागतों हाच जर गुन्हा

---

२९६. परिशिष्ट १, पृ. ३-१०, परिशिष्ट २, पृ. ७९-८१. लग्नाचा हा मजकूर विशेष संभवनीय दिसतो. हा समकालीन माणसानें लिहिला असल्यानें महत्त्वाचा आहे. हें कारस्थान गुप्त असल्यानें लोकांनीं अबुल हसनच्या लग्नाविषयीं अनेक तर्क केले असल्यास नवल नाहीं. अबदुल्ला कुत्बशाहासारखा शाहा आपल्या आवडत्या मुलीला वाटेल तो वर पकडून आणून तिचें त्याच्याशीं लग्न लावील ही गोष्ट अशक्य आहे. इतिहासकारांना खरें कारण व हें लग्न कसें घडून आलें याची हकीकत न समजल्यामुळें त्यांनीं दैवी चमत्कार, साधूंचे आशीर्वाद वगैरेसारखीं कारणें दिलीं आहेत. (परिशिष्ट २, पृ. ८१-३) परंतु तीं व्यवहारास धरून नाहींत.

वाटत असेल तर तसें न करण्याची ' त्यानें हमीहि दिली. शेवटीं हताश होऊन तो अंगरखा घेतला व इमानानें व नेकीनें नोकरी करणारांचा अशा तऱ्हेनें नाश न करितां सांभाळच करावयास पाहिजे, असा कुत्बशाहास निरोप सांगून अंगांत तो अंगरखा चढविण्यास सुरुवात केली. जाफर बेग व डबीर यांनीं अंगरखा चढविण्यास मदत केली व नंतर सलाम करून त्यास सांगितलें कीं, कुत्बशाहानें तुमच्यावर राग धरून तुम्हांस मारण्यासाठीं आम्हांस पाठविलें नसून तुम्हांस तो मानसन्मान देणार आहे म्हणून घेऊन जाण्यासाठीं धाडलें आहे. तेव्हां आमच्याबरोबर तुम्हांस आनंदानें व ताबडतोब आलें पाहिजे. शेवटीं उत्तम सजविलेल्या घोड्यावर त्यास बसावयास सांगितलें. अबुल हसन भीतभीत घोड्यावर बसला व जाफर बेग व डबीर यांच्यामध्यें राहून जाऊं लागला. कुत्बशाहाच्या महालांत जातांच त्याचें त्याच रात्रीं ( इ. स. १६६० ) अबदुल्ला कुत्बशाहाच्या तिसऱ्या मुलीशीं लग्न लागलें.[२९७]

या लग्नाची बातमी दुसरे दिवशीं जाहीर होईपर्यंत ती मीर अहमद किंवा सुलतान महमद यांस समजली नव्हती. दुसरे दिवशीं सुल्तान महमद गोवळकोंड्याहून पळून गेला व मीर जुम्ल्याचा मुलगा महमद अमीन हा या वेळीं दक्षिणेंत होता त्यास भेटला. नंतर सुलतान महमदास महमद अमीनानें आपली मुलगी देऊन त्याचें तिच्याशीं लग्न लावलें. सुलतान महमद मोगलांचे नोकरींत शिरला.[२९८]

अबुल हसनचें लग्न झाल्यानंतर त्याला चांगले दिवस लागले. कुत्बशाहानें त्याचेकडे स्वतंत्र कारभार सोंपविला नव्हता, तरी त्याची मर्जी दिवसेंदिवस वाढतच होती. त्यास जरूर तें द्रव्य मिळत असे व तोहि राज्यकारभारांत ढवळाढवळ न करितां कुत्बशाहाची मर्जी सांभाळून वागत असे. वजीर व सरदार यांचीहि त्याचेवर बरीच मर्जी असे. याप्रमाणें अकरा वर्षे लोटलीं. त्यास दोन मुली व एक मुलगाहि झाला. शेवटीं अबदुल्लानें आपल्या मुख्य वजिरांस बोलावून आणून त्यांस त्याच्या मागें अबुल हसन यास राज्य द्यावें व तसें करण्यांत शक्य ती मदत करावी याविषयीं त्यांचेकडून कुराण हातीं देऊन शपथाहि घेवविल्या. अबदुल्ला मृत्यु पावतांच अबुल हसन ऊर्फ तानाशाहा कुत्बशाहीच्या तख्तावर आरूढ झाला.[२९९]

---

२९७. परिशिष्ट १, पृ. ११-१३.

२९८. परिशिष्ट १, पृ. १३; परिशिष्ट २, पृ. ८८.

२९९. परिशिष्ट १, पृ. १३-१४. अबुल हसन किती समजुतदार व धोरणी होता हें यावरून दिसून येतें.

२२. **अबुल हसन ऊर्फ तानाशाहा कुत्बशाहा**:—अब्दुल्ला कुत्बशाहा वारल्यानंतर अबुल हसन ऊर्फ तानाशाहा कुत्बशाहा रविवार चं. ३ मोहरम हि. १०८३ ( २१ एप्रिल १६७२ इ. स. ) रोजीं मुसाखान, सय्यद मुझाफर व त्याचे दोन पेशकर मादण्णा व आकण्णा यांच्या साहाय्यानें तख्तनशीन झाला.[२७८]

हि. १०८३ ( १९ एप्रिल १६७२ ते ८ एप्रिल १६७३ इ. स. ).— ( एप्रिल–मे १६७२ इ. स. ) शिवाजीचा हेजीब निराजीपंत भागानगरास जाऊन एक लक्ष होनांचा तह करून भागानगरीहून सहासष्ट हजार होन घेऊन शिवाजीकडे जेष्ठ शुद्ध ५मी ( २१ मे १६७२ इ. स. ) रोजीं परत आला.[३००]

अबुल हसन राज्यावर येण्यापूर्वीच नेकनामखान वारला होता.[३०१] त्याचे जागीं मुसाखानाची ता. २५ एप्रिल पूर्वीच नेमणूक झाली होती. मुसाखानास खान-इ-खानन असा किताब दिला.[३०२] सय्यद मुझाफर याजकडे सरखैली होती. ती मुसाखानास दिली व सय्यद मुझाफरखानास पेशवाई व दिवाणीचें काम सांगितलें. मीर जुमला हा किताब दिला. मादण्णा यास मज्मुदारी व आकण्णा यास सबनिविसी दिली.[३०३]

---

३००. जेधे शकावली.

३०१. नेकनामखानाच्या कबरीवरील शिलालेखांत त्याच्या मृत्यूची तारीख चं. १० जिल्हेज हि.१०८३ व कबर पुरी झाल्याची तारीख चं. १२ जमादिलाखर हि. १०८४ दिली आहे.( ए. इं. मॉ., १९०७-८, पृ. २५ व १९१५–१६, पृ. ३९). परंतु यांतील मृत्यु. तिथीच्या वर्षांचा आंकडा चुकीचा असावा. तो हि. १०८२ पाहिजे. नेकनामखानाचा ता. २३ फेब्रुवारी १६७२चा कौल उपलब्ध आहे. ( ओल्ड मद्रास व्हेस्टिजिस, भा. १, पृ. ३४४ ) त्यानंतर २५ एप्रिलच्या कन्सल्टेशनमध्यें त्याच्या मृत्यूची व मुसाखान त्याच्या जागीं नेमल्याची व त्यानें २३ फेब्रुवारीचा कौल कायम केल्याची वार्ता गोवळकोंड्याहून मद्रासेस पोहोंचल्याचा उल्लेख आहे ( ओल्ड मद्रास व्हेस्टिजिस, भा.१,पृ. ३४८ ). ता. ५ फेब्रुवारीच्या पत्रांत नेकनामखान आजारी असून जमिनीस खिळल्याचा उल्लेख आहे. ( सदर पृ. ३४७ ) यावरून नेकनामखान चं. १० जिल्हेज हि. १०८२ ( ३० मार्च १६७२ इ. स. ) रोजीं वारला असावा.

३०२. परिशिष्ट १, पृ. १६; मद्रास कन्सल्टेशन, २५ एप्रिल १६७२ इ. स., ओल्ड मद्रास व्हेस्टिजिस, भा. १, पृ. ३४८.

३०३. परिशिष्ट १, पृ. १६, चं. १० रज्जब हि. १०८१ ची ( १४ डिसेंबर १६७० इ. स. ) फर्मानें, भा. इ. सं. म. त्रैमासिक, व. १३, अं. ४, चैत्र १८५५; पृ. ६६-८

माहे रुव्वाल हि. १०८३ (जानेवारी १६७३ इ. स.)त कुत्बशाहाचा होजिब जडजवाहीर व चिनी भांडीं औरंगजेबाकडे नजर घेऊन गेला. तेव्हां त्यास त्यांऐवजीं तीन लाख रुपये नक्त देण्याचा हुकूम झाला.[३०५]

ता. १० जुलै १६७२ इ. स. रोजीं फ्रेंच आरमार सेंट थोमजवळ येऊन उतरलें. डी ला हाय हा या आरमाराचा मुख्य सेनापति होता. त्यानें सेंट थोम येथील मुसलमानी अधिकाऱ्याकडे धान्यसामग्री देण्याबद्दल विनंति केली. ती अमान्य केली. तेव्हां ता. १२ रोजीं डी ला हायनें मागें मच्छलीपट्टणास फ्रेंच लोकांस वाईट रीतीनें वागविल्यावरून व या वेळींहि मदत देण्याचें नाकारलें म्हणून हल्ला करण्याचें ठरविलें व चार लढाऊ गलबतें व शंभर लोक घेऊन किनाऱ्यावर आला. कुत्बशाही सुभेदारानें त्यास विरोध केला. तेव्हां त्यानें गलबतांतून तोफांचा मारा चालू ठेवून किनाऱ्यावर उतरला. गांवांत शिरला. तेथील हवालदारानें दाणागोटा पुरविण्याचें कबूल केलें. परंतु तो नेण्यासाठीं फ्रेंचांचीं माणसें येतांच त्यांस तो न देतां घालवून लावलें. ता. १४ जुलै रोजीं फ्रेंचांनीं आपले शंभर लोक व चार तोफा कॅ. रिबेरबरोबर शहराच्या उत्तरेस पाठविल्या व मुख्य सैन्य दक्षिणेस ठेवलें. दुसरे दिवशीं लढाईची इतर सामग्री वगैरे उतरतांच डी ला हायनें हवालदारास दाणागोटा न पुरविल्यास हल्ला चढविण्याची भीति घातली. कुत्बशाही हवालदारानें लढाईस सुरुवात केली. फ्रेंच गलबतांतून तोफा उडवूं लागले. किल्ल्याच्या दक्षिणेच्या बाजूस मुख्य हल्ला झाल्यानें कुत्बशाही सैन्य तिकडे गेलें. किल्ल्यांतील लोकांनींहि चांगलेंच शौर्य दाखविलें. तेव्हां फ्रेंचांना मागें हटावें लागलें. उत्तरेकडे कुत्बशाही सैन्य नाहीं हें पाहून रिबेरनें आपले लोक तटास शिड्या लावून आंत उतरविले. किल्ल्यांतील लोकांची कत्तल केली व किल्ला ताब्यांत घेतला. डी ला हाय पश्चिम दरवाजानें किल्ल्यांत गेला. यांत कुत्बशाहाकडील ३०-४० लोक मारले गेले व शंभरस्वार कैद झाले. बावीस तोफा व दारुगोळा फ्रेंचांस मिळाला. शहर लुटलें गेलें. परंतु हवालदाराच्या वाड्याखेरीज इतर ठिकाणीं त्यांना कांहींच प्राप्ती झाली नाहीं. नंतर किल्ल्याचे तट वगैरे दुरुस्त केले. गलबतांवरील तोफाहि आणविल्या. दाणागोटा मिळविण्याचा प्रयत्न केला, परंतु लोक त्यांस तो देईनात. तेव्हां आदिलशाही शेरखान लोदीकडून तो आणण्यासाठीं गलबतें पाठविलीं.

---

३०५. देवीप्रसादजी मुन्सिफकृत औरंगजेबनामा, हिंदी, भा. २ पृ. ४१-२.

कुत्बशाहाकडील तेथील सैन्याचा सेनापती बाबासाहेब व त्रिंबक बसरा राज व मंडल नायक यांनीं फ्रेंचांस दाणागोटा न मिळूं देण्याची खटपट चालविली. सेंट थोमजवळील कोदंबकम येथें सैन्य ठेवलें. अशा रीतीनें अडवणुक झालेली पाहतांच फ्रेंचांनीं या सैन्यावर हल्ला केला. परंतु कुत्बशाही घोडदळानें पाठलाग केल्यानें फ्रेंच जेमतेम सेंट थोम येथें जाऊन पोहोंचले. ता. २४ आगस्ट रोजीं कुत्बशाही २००० सैन्य सेंट थोमजवळ गेलें व कांहीं घरें जाळलीं. डी ला हायनें पुढें जाऊन तोंड दिलें. ४०० कदमांवर असलेल्या एका देवळांत तळ दिला. कुत्बशाही सैन्यास आणखी मदत आली व तें सैन्य एक हजार घोडदळ व चार हजार पायदळांपर्यंत गेलें. ता. ३ सप्टेंबर रोजीं कुत्बशाही सैन्यानें पश्चिम बाजूस तळ देऊन किल्ल्यास वेढा घातला. डी ला हायनेंहि सैन्य वाढवून किल्ल्याची मजबुती केली. नंतर दहापंधरा दिवसांनीं कुत्बशाही सैन्यानें आपला तळ पुढें सरकाविला. ता. १९ सप्टेंबर रोजीं कुत्बशाही सैन्यानें किल्ल्यावर तोफांचा मारा सुरू करण्यास प्रारंभ केला. ता. २० रोजीं लढाई झाली. तींत फ्रेंचांकडील दोन सरदार पडले. सप्टेंबरच्या अखेरीस रिबेरेनें एका मशिदीच्या आश्रयानें राहिलेल्या कुत्बशाही सैन्यावर हल्ला चढविला. त्यांत थोडेंसें नुकसान झालें. ता. १० आक्टोबर रोजीं मुसलमानी सैन्यानें सेंट लुई बुरजावर हल्ले चढविण्यास सुरुवात केली. फ्रेंचांस २०० अधिक सैनिकांची पोर्टो नोव्होहून २१ आक्टोबरला मदत आली. तेव्हां ता. २१ आक्टोबर रोजीं डी ला हायनें दोन कंपन्या व २०० नावाडी यांच्या साहाय्यानें तोफांच्या जोरावर हल्ला चढविला. कुत्बशाही सैन्यांतील २०० लोक मेले. ता. ६ नवंबर रोजीं मुसलमानी सैन्यानें फ्रेंचांच्या आघाडीवर हल्ला चढविला व त्यांत त्यांचे तीन सरदार मारले गेले. नवंबर महिन्याच्या अखेरपर्यंत सारखे हल्ले चालूच होते. नंतर कोलबर्ट बुरुजाकडे कांहीं सैन्य गेलें व तेथें हल्ले चढवूं लागलें. ता. ५ डिसेंबरलाहि लढाई झाली. तींत मुसलमानांची सरशी झाली व ते पुढें सरसावले. थोडेच दिवसांनीं डी ला हायास थोडीशी जखम झाली व रिबेरे बराच जखमी झाला. ता. १४ डिसेंबर रोजीं कुत्बशाही सैन्यानें फ्रेंचांची एक चौकी मारली. या लढाईत फ्रेंचांचे बरेच लोक मारले गेले. बाकी राहिले त्यांना पकडून त्यांची कत्तल करण्यांत आली. ता. १६ डिसेंबरला कुत्बशाही सैन्यानें पोर्ट रोयल, कोलबर्ट व सेंट लुई बुरुजांवर हल्ले चढविले. नंतर दोन दिवसांनीं दक्षिणेकडूनहि मारा करण्यास सुरुवात केली. फ्रेंच तटदुरुस्ती वगैरे सारखी करीत राहिले. ता. २५ डिसेंबरला कोलबर्ट बुरुजाजवळ चकमक

झाली. तींत २०–२५ लोक डी ला हायनें ठार केले व पश्चिम बाजूस खंदक खणण्यास प्रारंभ केला. ता. ६ जानेवारी १६७३ रोजीं मार्टिन डी ला हायला येऊन मिळाला. त्यानें इंग्रजांची मदत मिळविण्याचा प्रयत्न केला, परंतु तो सफल झाला नाहीं. या महिन्यांत फ्रेंचांची बरीच पिच्छेहाट झाली. मुसल्मानांचेहि शंभरएक लोक मारले गेले होते. फेब्रुवारीच्या सुरुवातीस फ्रेंचांस पोर्टो नोव्होहून आणखी दोनशें सैनिकांची मदत आली. ता. १२ फेब्रुवारीस पुन्हां हल्ला चढविला व कुत्बशाही सैन्यांतील एक मोठी तोफ काबिज केली. परंतु दुसऱ्याच दिवशीं मुसल्मानी सैन्यानें ती हिसकाविली. ता. २७ फेब्रुवारीस फ्रेंचांनीं कोलबर्ट बुरुजाजवळ पुन्हां निकराचा हल्ला चढविला. हातघाई झाली. तींत मुसलमानांकडील दोनशें लोक मारले गेले. दुसऱ्या दिवशीं पुन्हां चकमक उडाली. तींत मंडल नायक मारला गेला. बाबासाहेब व त्रिंबकराजास थोडया जखमा झाल्या. मुसलमानी सैन्य माघारीं पुनामल्लीस गेलें. फ्रेंचांनीं मुसलमानी सैन्यानें तयार केलेले खंदक वगैरे बुजवून टाकले व एक तुकडी त्रिप्लिकेनला पाठविली. या तुकडीनें तेथील एका देवळाचा ताबा घेऊन त्याची मजबुती केली. ती तुकडी तेथेंच चौकी बांधून राहिली.

या अवधींत डच व फ्रेंच यांचें युद्ध चालू झालें व फ्रेंचांस मच्छलीपट्टण वगैरे ठिकाणीं त्रास होऊं लागला. दाणागोटा मिळावा तोहि नीटसा मिळेना. तेव्हां मार्च महिन्याच्या अखेरीस डी ला हाय व मार्टिन मच्छलीपट्टणास गेले व तेथील सुभेदाराच्या तर्फे कुत्बशाहास व सय्यद मुझफरखानास पत्रें पाठवून बोलणें लावलें. मात्र मुसल्मानी गलबतं धरणें, जाळणें वगैरे कार्यक्रम डी ला हायनें चालूच ठेवला.[३०६]

हि. १०८४ ( ९ एप्रिल १६७३ ते २८ मार्च १६७४ इ. स. ).—मीर जुम्ला व दिवाण मुझफरखान आणि सरखेल व खान-इ-खानन मुसाखान यांचें वांकडें आलें. अबुल हसननें तें भांडण मिटविण्याकडे मुद्दामच दुर्लक्ष केलें. उलट तें विकोपाला जाऊन या दोन बळजबरी व सर्वशक्तिमान समजणाऱ्या वजिरांनीं एकमेकांचा पाडाव करावा अशी त्याची इच्छा होती. त्यामुळें अबुल हसननें राज्यकारभार या दोघांवर सोंपवून आपला काल राजनीति व इतर कारभारासाठीं नियम वगैरे लिहून काढण्यांत खर्च करूं लागला. मुसाखान व त्याचे लोक लांच खातात व सैन्याचे पगार योग्य रीतीनें देत नाहींत वगैरे गोष्टी मुझफरखानानें तानाशहाच्या

३०६. मार्टिन वगैरेंच्या हकीकती, ओल्ड मद्रास व्हेस्टिजिस, भाग १, पृ. ३१२–६.

कानावर घातल्या. परंतु त्यानें त्या मनावर घेतल्या नाहींत. मुझाफरखानानें मुसाखानाच्या हिशेबनिसांस कैद केलें. त्यावरून मुसाखानास राग आला व तो आपल्या लोकांनिशीं दिवाणाच्या वाड्याकडे मुझाफरखानास ठार करण्याच्या उद्देशानें गेला. परंतु मुझाफरखान जात्या भित्रा असल्यानें त्यानें स्वसंरक्षणार्थ निवडक लोक ठेवले होते व त्यांचे पगार वगैरे वेळचे वेळेवर देऊन त्यांस खुष राखले होते. त्यांनीं मुसाखानास वाड्यांत शिरूं दिलें नाहीं. नंतर तानाशाहाकडून निरोप आल्यावरून व इतर मोठमोठ्या सरदारांनीं मध्यस्थी केल्यावरून मुसाखान नाइलाजास्तव परतला. मुझाफरखान मात्र फार घाबरला व तो तावडतोब तानाशाहाकडे गेला व असें झाल्यास कामाचा निभाव कसा लागेल वगैरे सांगून संरक्षणार्थ विनंति केली. मुझाफरखान घरीं आला व तानाशाहानें मुसाखानास सांगून पाठविलें कीं, दोघांनीं एकविचारें राहावें अशी वर्तणूक ठेवली पाहिजे. परंतु मुसाखानानें उलट मुझाफरखानास पुष्कळ अपशब्द वापरले. शेवटीं तानाशाहाची त्यानें क्षमा मागितली. कांहीं दिवसांनीं तानाशाहानें मुसाखानास भेटण्यास बोलावलें. परंतु मुसाखान जाण्यास कचरूं लागला. शेवटीं बरीच दिरंगाई केल्यानंतर राजमहालांत गेला. राजमहालाच्या आवारांत जातांच त्याला बेडी घालून कैद केलें. राजाची अवज्ञा करणें, सरकारी नोकरांस मारहाण करणें, अफरातफर करणें, मोगली वकिलास खंडणी योग्य प्रकारें न देऊन पातशाहापादशाहांत वांकडें आणणें वगैरे आरोप त्याचेवर ठेवले व त्याची मालमत्ता वगैरे जप्त केली. त्यांत कोल्हारचें बरेंच जडजवाहीर मिळालें.[३०७] तानाशाहानें मुसाखानाकडील कर्नाटकाची सुभेदारी व सेनापतित्व मिष्क मियानकडे चं. २३ रबिलावलापूर्वीच (२९ जून १६७३ इ. स.) दिलें होतें. सरखैलीचा व इतर कारभार तानाशाहा स्वतःच पाहूं लागला.[३०८]

---

३०७. परिशिष्ट १, पृ. १७–९.

३०८. परिशिष्ट १, पृ. १९. चं. २३ रबिलावल हि. १०८४च्या (१९ जून १६७३ इ. स.) मुकुंद घोरपडे यास काढलेल्या फर्मानांत "कर्नाटकचा सुभा मुसाखान यांजकडून दूर करून मिया मुष्क यांस दिला आहे," असा उल्लेख आहे. भा. इ. सं. मं. त्रैमासिक, वर्ष १३, अंक ४, पृ. ६८. मलिक मिष्क 'कर्नाटकी सैन्याचा सेनापति' असा उल्लेख हि. १०८५च्या मोहरमच्या (एप्रिल १६७४ इ. स.) फर्मानांत आहे. ए. इं. मॉ., १९१७–८, पृ. ५२.

हुकूम काढणें तो ' मादो भानजी ( मादण्णा ) मज्मुदार ' तानाशाहाच्या ' परवानगीनें ' काढूं लागला.[३०९]

इ. स. १६७४च्या मुरुवातीस औरंगजेबानें इस्लामखानाचा मुलगा मीर अबदुल रहमान यास हैद्राबादेस पाठविलें.[३१०]

मोगलांशीं लढाई चालू ठेवण्यासाठीं कुत्बशाहानें शिवाजीस पैशाची वगैरे मदत गुप्तपणें दिली.[३११]

सेंट थोमचा वेढा चालू होता. डी ला हाय व मार्टिन यांनीं मच्छलीपट्टणच्या सुभेदारातर्फे बोलणें लावून एक लाख क्राउन्स पेशकश दिल्यास सेंट थोम फ्रेंचांस देण्याचें फर्मान आणवून देण्याचें कबूल केलें. डी ला हाय ता. २४ जूनला सेंट थोमला परत आला. नंतर थोडेच दिवसांनीं मुसाखानानें मच्छलीपट्टणच्या सुभेदाराच्या व मुझाफरखानाच्या झालेल्या या बेतास विरोध केल्याचें समजल्यावरून फ्रेंचांनीं पुन्हां पूर्ववत् लढाईची तयारी ठेवली. डी ला हाय सेंट थोमला येण्यापूर्वीच डच आरमार तेथें येऊन ठेपलें होतें. त्यांनीं डी ला हायवर हल्ला चढविला. परंतु तो कसा तरी बचावून सेंट थोमला पोहोंचला. २९ जूनपासून लढाईस सुरुवात केली. आगस्टच्या सुरुवातीस बाबासाहेबाच्या जागीं चिनापली मिर्झाची नेमणूक झाली. ता. १० आगस्ट रोजीं रात्रीं डी ला हायनें हल्ला चढविला. परंतु मुसलमानी घोडदळानें त्याला पळावयास लावलें व त्याचे बरेच लोक मारले. सप्टेंबरच्या सुरुवातीस पांचशें हॉलंडर्स सेंट थोमला येण्यास निघाले व रिक्लॉफ फॉन गोअन्स पुलिकतहून डच सैन्याचा दुसरा काफिला घेऊन निघाला. ११ सप्टेंबर

---

३०९. कुत्बशाही फर्मान चं. ५ सव्वाल हि. १०८४( ३० डिसेंबर १६७३ इ. स.)चें, गोपिनाथरावकृत (कामकोटी पीठाचे ताम्रपट, पृ. ११९–२०).हा ताम्रपट चुकीचा वाचला गेल्यामुळें तो इ. स. १७१०चा असून औरंगजेबाचा आहे असें म्हटलें आहे. मादा भानुजी म्हणजे मादण्णा ही माहिती नसल्यानें ती चूक झाली आहे. कुत्बशाही फर्मानें–पहिलें चं. २४ रज्जब हि. १०८५ ( १५ आक्टोबर १६७४ इ. स. )चें, दुसरें चं. २५ साबान हि. १०८६ ( ४ नवंबर १६७६ इ. स. )चें–भा. इ. सं. मं. त्रैमासिक, व. १३, अं. ४, पृ. ७० व ७२.

३१०. देवीप्रसादजी मुन्सिफकृत औरंगजेबनामा, हिंदी, भा. २, पृ. ४७.

३११. मुंबई, पत्रें, २९ सप्तेंबर, १ व २३ आक्टोबर १६७३ इ. स., इंग्लिश रेकॉर्डस् ऑन शिवाजी, भा. १, पृ. २८७ व २९८.

१६७३ला हें सैन्य सेंट थोमला आलें. नंतर दोन दिवसांनीं पांचसहाशें डच व मुसलमानी घोडदळानें शहरावर हल्ला चढविण्याची भीति दाखविली. १४ सप्टेंबर रोजीं डच त्रिप्लिकेनला गेले व मुसलमानी सैन्य फ्रेंचांच्या उजव्या बाजूस जाऊन बसलें. ता. १९ सप्टेंबर रोजीं डच व मुसलमानी सैन्यानें सेंट थोमजवळील एक गांव जाळलें. दुसऱ्या दिवशीं डच आरमारानें फ्रेंचांच्या गलबतांवर तोफा झाडल्या. ३० सप्टेंबरला आणखी डच आरमार आलें. परंतु रिक्लोफ सीलोनला गेला व सेंट थोमवरील सेनापतित्व हर पविलनला दिलें. नंतर पावसाळ्यांत फारशा चकमकी उडाल्या नाहींत. ३ आक्टोबरला उत्तरेस एक चकमक झडली. १८ आक्टोबरला डी ला हाय आरमारी लढाई देण्याकरितां त्रिप्लिकेनला गेला. पुष्कळ लोक लढाई पाहण्याकरितां जमले. परंतु लढाई झाली नाहीं. ३० आक्टोबरला एक लहानशी चकमक उडाली. नंतर ११ व २५ नवंबरला आणखी चकमकी उडाल्या. त्यांत रिबरे मेला. डिसेंबरांत फार पाऊस पडला. २५ डिसेंबर १६७३ला आणखी एक चकमक उडाली व फ्रेंचांनीं एक तळें फोडलें. फ्रेंचांस दाणागोळा अगर बाहेरील मदत मिळूं न देण्याची सक्त खटपट केल्यानें फ्रेंचांचा निभाव लागणें कठीण झालें. मार्टिन स्वतः शेरखान लोदी, जिंजी व मदुरेचा नायक वगैरेंना भेटला. परंतु मदत मिळण्याचीं चिन्हें दिसेनात. इ. स. १६७४ च्या २५ जानेवारीस डी ला हायला आणखी एक जखम झाली. मार्चच्या दुसऱ्या आठवड्यांत किल्ला सोडून जाण्याची फ्रेंच तयारी करूं लागले. परंतु तीन गलबतें भरून तांदूळ घेऊन पोहोंचल्यानें थोडासा धीर आला.[३१२]

हि. १०८५ (२९ मार्च १६७४ ते १७ मार्च १६७५ इ. स.).—फ्रेंचांचा जोर दिवसेंदिवस कमी होत चालला. त्यांचे सैनिक त्यांस सोडून डचांकडे येऊं लागले. २१ एप्रिल १६७४ रोजीं जें वादळ झालें त्यांत बावटळीची भर पडली. त्यायोगानें बराच नाश झाला. ता. ११ जुलै रोजीं डचांचें बारा मोठ्या गलबतांचें आरमार त्रिप्लिकेनला आलें. रात्रीं त्यांनीं तोफांचा मारा केला. ता. २ ऑगस्टला फ्रेंचांनीं हल्ला देण्याचें ठरविलें. परंतु त्या दिवसाचा हल्ला चढविणारा मुख्य सेनापति डॅनव्हेल डचांस जाऊन मिळाला. फ्रेंचांत मुळींच त्राण राहिला नाहीं. धान्यहि राहिलें नाहीं. तेव्हां ता. २० आगस्ट रोजीं त्यांनीं डचांशीं तह करण्याचें

३१२. मार्टिन व इतरांच्या हकिकती, ओल्ड मद्रास व्हेस्टिजिस, भा. १, पृ. ३२७–३०.

ठरविलें व ता. २४ला बोलणें लावून ता. २७ आगस्ट १६७४ रोजीं तह केला. ता. १९ सप्टेंबर रोजीं फ्रेंच सेंट थोम सोडून मद्रासला निघून गेले व किल्ला कुत्बशाही सैन्याच्या ताब्यांत दिला.[३१३]

अबुल हसननें किवामउद्दिनाबरोबर नऊ लाख रुपयांची पेशकश, जवाहिर व हत्ती पाठविले. किवामउद्दिनास आल्यानंतर व जातांना औरंगजेबानें वस्त्रें दिलीं.[३१४]

या वर्षाच्या अखेरीस शिवाजीच्या सैन्यानें कुत्बशाहींतील भागानगराजवळील दोन शहरें लुटलीं. बरीच मालमत्ता नेली.[३१५]

हि. १०८६ ( १८ मार्च १६७५ ते ५ मार्च १६७६ इ. स. ).—चं. २५ साबान ( ४ नवंबर १६७५ इ. स. ) रोजीं कुत्बशाहानें खानापूरकर नागोजी व मुकुंदजी घोरपडे यांस अशी आज्ञा केली कीं, 'लतीफशाहाबरोबर तुम्ही जाऊन शत्रूच्या अल्लूर बालमपेठच्या गढीवरून घसरून तेथील हरामखोरांना योग्य शिक्षा दिलीत. गनीम मोड होऊन पळून गेला. तुम्ही शत्रूची जागा घेतलीत. आतां तुमच्या लष्करापासून दोन गांव अंतरावरील एका गढींत हरामखोरांनीं तळ दिला आहे. ती गढी घेऊं इच्छितां. तरी तुम्ही लतीफशाहाशीं संगनमत करून त्या गढीवर चालून जाऊन घ्यावी. शत्रु नेस्तनाबूद झाल्याचें कळवावें. म्हणजे तुमचा उत्कर्ष केला जाईल.'[३१६]

मुसाखानास कैद केल्यानंतर मुझाफरखानाला अगदीं मनमुराद कारभार करण्याची सवड मिळाली. अधिकाऱ्यांच्या नेमणुकी तानाशाहास न विचारतांच होऊं लागल्या. लोकांच्या नुकसानीबद्दल तक्रारी येऊं लागल्या. कोणाचीच दाद लागेना. असा भयंकर अव्यस्थित व अफरातफरीचा

---

३१३. मार्टिन व इतरांच्या हकिकती वगैरे, ओल्ड मद्रास व्हेस्टिजिस, भा. १, पृ. ३२७—३५.

३१४. देवीप्रसादजी मुन्सिफकृत औरंगजेबनामा, हिंदी, भा. २, पृ. ५६.

३१५. कारवार, पत्र, २२ एप्रिल १६७५ इ. स , इंग्लिश रेकॉर्डस् ऑन शिवाजी, भाग २, पृ. ४८.

३१६. कुत्बशाही फर्मान, चं. २५ साबान हि. १०८६ चें, भा. इ. मं. त्रैमासिक, व. १३, अंक. ४, पृ. ७२.

कारभार चालू लागला. तानाशाहानें शेवटपर्यंत दुर्लक्ष केलें.[317] परंतु मिर्झा अहमद इ. स. १६७४त वारल्यानंतर व सुलतान महंमद व औरंगजेब यांचा पुन्हां बेबनाव झालेला पाहतांच[282] व विशेषतः औरंगझेबानें अबुल हसन राज्यावर आल्याबद्दल तक्रार न करितां त्यानें पाठविलेली पेशकश स्वीकारलेली दिसतांच[314] तख्तास कोणीतरी वारस उभा करून राज्यांत यादवी उत्पन्न करण्याची अबुल हसनची भीति गेली. तेव्हां मुझाफरखानास त्यानें दरबारास बोलाविलें. तेथें प्रथम त्याची पुष्कळ स्तुति केली. नंतर त्याच्या सर्व चुकांची, दुर्वर्तनाची व अनिष्ट कारभाराची जाणीव करून दिली. नंतर त्यास कामावरून दूर केल्याचें व यापूर्वी चांगली सेवा केली असल्यानें एक लहान सुभा दिल्याचें सांगितलें. त्या सुभ्याची व्यवस्था पाहून कोणत्याहि रीतीनें गडबड न करितां राहावें अशी आज्ञा दिली. तोहि निमूटपणें निघून गेला.[318] हा प्रकार चं. २५ साबान हि. १०८६ (४ नवंबर १६७५ इ. स.) नंतर[319] व २६ जुलै १६७६च्या पूर्वी[320] घडून आला असावा. बहुधः तो इ. स. १६७५च्या डिसेंबरच्या अखेरीस घडला असावा. मुझाफरखानाचा मादण्णास कारभार मिळतांच त्यानें मोठा वाडा बांधण्यास सुमुहूर्तावर ता. १६ जानेवारी १६७६ इ. स. (बुधवार, माघ शुद्ध पंचमी)स सुरुवात केली व घाईघाईनें तीन महिन्यांनीं म्हणजे ता. १० एप्रिल १६७६ इ. स. (सोमवार, वैशाख शुद्ध सप्तमी)स तो पूर्ण केला.[321] मलिक मिष्क मियानची सरखैली व कर्नाटकाची सुभेदारी एक लाख दहा हजार पगोड्यांची पेशकश घेऊन महमद इब्राहिम यास दिली व त्याला नवाब असा किताब दिला.[320] मलिक मिष्कास पेशवाई

३१७. परिशिष्ट, पृ. १९–२०; मद्रास, पत्र, १६ जुलै १६७५ इ. स., ओल्ड मद्रास व्हेस्टिजिस, भाग. १, पृ. ३५५–६.

३१८. परिशिष्ट, १ पृ. २०–१.

३१९. नेगोजी व मुकुंदराव घोरपडे यांस चं. २५ साबान हि. १०८६ (४ नवंबर १६७५ इ. स.)चें फर्मान दिलें आहे. त्यांत मादो भानजी मज्मुदार असेंच नांव दिलें असून तें 'परवानगी'नें काढलें आहे. भा. इ. सं. मं. त्रैमासिक, वर्ष १३, अं. ४, पृ. ७२.

३२०. मद्रास, पत्र, २३ जुलै १६७६, ओल्ड मद्रास व्हेस्टिजिस, भा. १, पृ. ३५६.

३२१. परिशिष्ट ३, पृ. १९६ वरील २५ व २६ टीपांतून १६७२च्या तारखा असाव्यात म्हणून शंका प्रदर्शित केली होती. परंतु आतां मुझाफरखानाच्या बडतर्फीचा नक्की काल समजतांच व मादण्णाच्या मृत्युतारखेंतून पृ. १९८वर नमूद केलेलीं बारा वर्षें वजा देतां शकपद्धतीनें इ. स. १६७६च्या सुरुवातीचा काल नक्की असावासा वाटतो.

( Keeper of the Royal Seal ) दिली व हिशबतपासनीसाचें काम त्याचेकडे सोंपविलें.[322] पोडाला लिंगाप्पा ( मादण्णाचा पुतण्या ) यास कर्नाटकाची सरखैली दिली व महमद मिर्झा अमीनच्या जागीं पुन्हां बाबासाहेबास सरलष्कर केलें.[320]

हि. १०८७ ( ६ मार्च १६७६ ते २३ फेब्रुवारी १६७७ इ. स. ).— आदिलशाही सरदारांत भांडणें लागलीं व मोगली बहादुरखानानें शिवाजीशीं संगनमत करून आदिलशाही मुलुखावर सारखे हल्ले चढविले. ही अनिष्ट परिस्थिति पाहून तानाशाहानें आदिलशाहा व शिवाजी यांच्यांत इ. स. १६७६च्या जुलैंत तह घडवून आणला. त्यांत शिवाजीकडे कोल्हापुरापलीकडील पांच कोसांवरील कृष्णतीरापर्यंतचा मुलूख राहूं द्यावा व त्याबद्दल शिवाजीनें दोन लक्ष रुपये पेशकश व एक लक्ष होन वार्षिक खंडणी द्यावी असें ठरलें.[323] परंतु हा तह लवकरच मोडला व मोगल कुत्बशाहा व शिवाजी यांनीं एक होऊन आदिलशाहींतील पठाणांचें वर्चस्व मोडण्याचा विचार केला.[324]

हि. १०८८ (२४ फेब्रुवारी १६७७ ते १२ फेब्रुवारी १६७८ इ.स.).— शिवाजी व कुत्बशाहा यांच्यांत जें बोलणें झालें त्याचा आशय शिवाजीनें मालोजी घोरपडे यास कळविला. तो असा:—" हल्लीं आदिलशाही बहलोलखान पठाणीं घेतली. पादशाहा लहान लेंकरूं. नांव मात्र. ते आपले कैदेंत ठेवले आहेत. आणि तख्त व छत्र विजापूरचा कोट पठाणानें काबीज केला आहे. कांहीं गुवारून मिळाला नाहीं. ऐशियास दक्षिणचे पादशाहीस पठाण जाला. हे गोष्टी बरी नव्हे. पठाण बळावला म्हणचे एका उपरी एक कुली दक्षिणियांचीं घरें बुडवील, कोणास तगों देणार नाहीं. ऐसे आम्ही समजोन हजरत कुत्बशाहा पातशाहा यांसी पहिलेपासून रुजुवात राखली होती. त्यावरून सांप्रत हजरत कुत्बशाहानीं मेहेरबानी करून 'हुजूर भेटीस येणें'

---

३२२. परिशिष्ट १, पृ. २१; हि. १०८९ ( १६७८ इ. स. ) चें कुत्बशाही फर्मान, ए. इं. मॉ., १९१७–८, पृ. ५४. मिआन मिष्क याला रविवार चं. २९ रविलावल हि. १०९१ (१८ एप्रिल १६८० इ. स. ) रोजीं दफन केल्याचा त्याच्या कबरीवरील शिलालेखांत उल्लेख आहे. ए. इं. मॉ., १९१७–८, पृ. ५६.

३२३. राजापूर, पत्र, २४ जुलै १६७६, इंग्लिश रेकॉर्डस् ऑन शिवाजी, भाग २, पृ. ९४.

३२४. मुंबई, पत्र, १९ मार्च १६७७, इंग्लिश रेकॉर्डस् ऑन शिवाजी, भा. २, पृ. ११४.

म्हणून दस्तखत मुबारक व दस्त पंजीयानसी फर्मान सादर केला.[३२५] त्यावरून आम्ही येऊन हजरत कुत्बशाहाची बरोबर १२ हजार पायदळ व २४ हजार घोडदळ घेऊन ता. ४ मार्च १६७७ इ. स. रोजीं जाऊन भेटी घेतली.[३२६] भेटीचे समई पादशाही आदब आहे कीं शिरभोई धरावी, तस्लीम करावी. परंतु आम्ही आपणावरी छत्र धरिले असे, ही गोष्ट कुत्बशाहास मान्य होऊन शिरभोई धरणें व तस्लीम करणें हें माफ केलें. पादशाहा तिकडून आले; आम्ही इकडून गेलों.[३२५] राजे लोकांच्या वहिवाटीप्रमाणें स्वतंत्र दरवाजानें प्रवेश केला. विशेष आसन तयार केलें होतें.[३२६] पादशाहांनीं बहुतच इज्जती होऊन गळ्यास गळा लावून भेटले. आम्हांस हातीं धरून नेऊन जवळीं बैसविलें. किती एक मेहेरबानी जाहीर केली. आम्हीहि जैसी रुजुवात करून ये तैसी केली आणि कुत्बशाहाचा व आपला घटीं बरेपणा करून घेतला. या उपरी राजकारण विषयीं हजरत कुत्बशाहानीं महादण्णापंतास व आम्हांस एकचित्त करून ऐसा तह केला कीं, जो काय उभयवर्गीं तह व्हावा तो आपण कबूल करावाच. ऐसा कुल मनसबा व मदार आम्हांवरि टाकिला आहे कीं, ' आपली पादशाही जितकी वाढवूं ये तितकी वाढविणें. पठाणाची नस्तनाबूद करणें. दक्षणची पादशाही आम्हां दक्षणियांच्या हातीं राहे तें करावें ' म्हणून त्यास हा मनसुबा ये प्रसंगीं आमचे हातास आलिया उपरि आम्हीं हाच विचार केला कीं, जे कांहीं आपले जातीचे मराठे लोक आहेती ते आपल्या कटांत घेऊन कुत्बशाहासी त्यांची रुजुवात करावी. दौलत देवावी, त्यांचे हातें पादशाही काम घेऊन पादशाहाची दराज करावी. आणि तुम्हां लोकांच्या दौलताहि चालत, घरें राहत, तें करावें. आपल्या जातीच्या मराठिया लोकांचें बरें करावें हें आपणांस उचित आहे....तुम्ही मराठे लोक, कामाचे, तुमचें बरें करावें ऐसें मनीं धरून हजरत कुत्बशाहासी बहुत रीती बोलोन, तुम्हास हजरत कुत्बशाहाचा कौलाचा फर्मान घेऊन पाठविला आहे.... तुमचे पुत्रपौत्र आवदीत व दौलत थोर होए व हजरत कुतुबशाहाचें काम तुमचे हातें होऊन ये ऐसा समय असे. जरी पठाणाचीच चाकरी करून राहों म्हणाल, तरी पठाण कांहीं तुम्हांस थोर दौलत देणार नाहीं. आणि पठाणास तरी हजरती कुतुब-

---

३२५. मालोजी घारपडे यास शिवाजीचें पत्र, मार्च १६७७ इ. स. चें, सरस्वति मंदिर, इतिहासमंजरी, पृ. ९७.

३२६. जेधे शकावली, डाग रजिस्टर, पृ. ३१९-२३, २२, रुप्टेंबर १६७७चा अहवाल; डच वृत्तांत, ऑर्म, भा. २६८, पृ. १-११.

शाहा व आम्ही व तमाम दख्खनी मिळोन चालोन घेऊन बुडवीतच आहों."[325] मादण्णानें शिवाजीची उत्तम व्यवस्था ठेविली होती. दोन हजार होनांचा रोज खर्च होत होता.[326]

बहादुरखान, तानाशाहा व शिवाजी यांनीं एकजुटीनें आदिलशाहीचे लचके तोडण्याचें ठरविलें.[325] तानाशाहानें २ लक्ष पायदळ व २० हजार घोडदळ दिवाण मादण्णा आणि सरलष्कर इब्राहीमखान यांच्या हातांखालीं देऊन, त्यांना विजापुराकडे १६७७च्या मार्चांत रवाना केलें. बहादुरखान दिल्लेरखानासह गुलबर्ग्यावर गेला. कुत्बशाही सैन्य सरहद्दीवर थांबलें.[327] शिवाजी जिंजीवर चालून गेला[328]. शिवाजीबरोबर सरलष्कर मिर्झा महमद अमीन आपल्या १ हजार घोडदळ व ४ हजार पायदळासह स्वारीवर गेला.[329] याप्रमाणें सर्व बाजूंनीं उचल झालेली पाहतांच सिद्दी मसाउद आदिलशाही राजकारण घेऊन तानाशाहाकडे जून १६७७त आला. त्यामुळें[330] गोवळकोंड्याच्या राजकारस्थानांत जरा गडबड उडाली. जूनच्या अखेरीस बहादरखान, दिलेरखान व बहलोलखान गुलबर्ग्यापाशीं एकत्र येतांच ते कदाचित् एक होऊन कुत्बशाही हद्दींत शिरतील म्हणून महमद इब्राहिमास नीट खबरदारीनें राहण्याचा हुकुम झाला. सिद्दी मसाउदच्या विनंतीचा विचार करून आदिलशाहींतील यादवी मोडण्याचा तानाशाहानें बेत केला व त्याप्रमाणें सिदी मसाउद, कसलाकोटी, तिमराज व सय्यद मखदुम यांस सुलतानाच्या मदतीस पाठविलें. कसलाकोटीला सहा लाखांचा मुलूख देऊन एक लक्ष पायदळ उभारण्यास सांगून त्याला शिर्पीच्या मार्गानें जाण्यास सांगितलें.[331] परंतु इकडे गुलबर्ग्यास जुलै महिन्यांत मोगलांशीं बहलोलखानानें तह केला. त्यांत मोगलांनीं आदिलशाहाकडून आठ वर्षेपर्यंत नालबंदी घेऊं नये; दोघांनीं मिळून कुत्बशाहावर चालून जावें; त्याचा मोड केल्यानंतर सर्वांनीं

---

३२७. डाग रजिस्टर, १६७७, १ एप्रिल १६७७, भा. ११, पृ. ९८.

३२८. मद्रास, कन्सल्टेशन, ९ मे १६७७, इं. रे. ऑन शिवाजी, भा. २, पृ. ११७; मनुशी, व्हॉ. २, पृ. २०३-४.

३२९. मद्रास, पत्र, १९ जून १६७७, इं. रे. ऑन शिवाजी, भा. २, पृ. १२५.

३३०. गोवळकोंडा, पत्र, १६ जून १६७७, मद्रास, पत्र, १९ जून १६७७, इं. रे. ऑन शि., भा. २, पृ. १२३ व १२६.

३३१. गोवळकोंडा, पत्र, ३ जुलै, तिरुमदवाड, पत्र, १६ जुलै १६७७इ. स., इं. रे. ऑन शिवाजी, भा. २, पृ. १२९ व १३१.

मिळून शिवाजीवर चाल करून जावें; तो पुरा नम्र होईपर्यंत थांबू नये; अशी कलमें ठरलीं. ही बातमी कुत्बशाहास समजतांच त्यानें व शिवाजीनें कर्नाटकी व इतर दख्खनी राजांसमवेत एकमत करून युद्ध करण्याचा निश्चय केला.[३३२] आगस्ट-मध्यें बहलोलखान मोगलांस मिळाला व त्यांचीं जोड सैन्यें कुत्बशाहाशीं लढण्यासाठीं गुल्बर्ग्याजवळ तयार झालीं. त्यांनीं कुत्बशाहास सांगून पाठविलें कीं, मोगल आणि आदिलशाहा यांचा शत्रु शिवाजी त्यास गोवळकोंडेकरांनीं वाट दिली. तरी त्याला धरून मोगलांचे हवालीं करावा. तसाच आदिलशाही शेख मिनाजूसहि धरून पाठवावें.[३३३] गोवळकोंडेकरांनीं बहादरखानाशीं बोलणें लावलें. औरंगजेबाच्या हुकुमावरून शिवाजीस मदत केल्याच्या गुन्ह्याबद्दल कुत्बशाहानें दोन कोटी रुपये व दहा हजार घोडे द्यावेत अशी बहादरखानानें मागणी केली. नंतर ती दोन कोटींवरून एका कोटीवर आली. परंतु कुत्बशाहानें फक्त पांच लाख द्यावयाची तयारी दाखविल्यावरून मोगली सैन्य त्रिविनिकोजवळ आलें. ही बातमी कुत्बशाहास लागतांच सिद्दी मसाउद, सय्यद मखदुम, सर्जाखान वगैरे सरलष्कर, सरखैल व कर्नाटकांतील कांहीं फौज मिळून तीस हजार घोडदळ गिवर्नीस एकत्र जमविलें. मोगलांचे चारपांच हजार स्वार व बहलोलखानाचें सैन्य कुत्बशाहावर हल्ला करणार असें कळतांच कुत्बशाहानें मोगलांशीं लढाई देण्याचा हुकूम दिला. मोगली तळापासून एक कोसावर मंगलीग येथें कुत्बशाही सेना सज्ज झाली व हिडोलशा व इतर सरदारांनीं मोगल-आदिल फौजेची कुरापत काढून त्यांना अंगावर घेत घेत मुख्य सैन्याजवळ आणलें. १५ सप्टेंबर १६७७ रोजीं लढाई झाली, मोगलांकडील प्रोही (?) हसनखान शौर्यानें लढला. परंतु बहलोलखानाच्या स्वारांनीं माघार घेतली. दिलेरखानानें कुमक केली म्हणून बाजू सांवरली. कुत्बशाही थोडे लोक जखमी झाले; परंतु मोगलांचे ५०० घोडे मेले, ५-६ सेनापतीहि पडले. मोगल-आदिल सैन्याचा पराजय झाला. बहादरखानाचा हस्तक जखमी झाला. त्याचा खिदमतगार मारला व डेऱ्यास आग लावली. या लढाईची बातमी समजतांच तानाशाहानें मादण्णास खासाच कुमक जाण्यास सांगितलें. परंतु मादण्णानें पल्पेल येंगाणा, मिर्झा संजर, गुड चारुलो, शेख मिनाजू वगैरे सरदार सप्टेंबरच्या तिसऱ्या

---

३३२. सुरत, ३ आगस्ट १६७७ इ. स., इं. रे. ऑन शिवाजी, भा. २, पृ. १३४.

३३३. गोवळकोंडा, पत्र, २६ आगस्ट १६७७ इ. स., इं. रे. ऑन शिवाजी, भा. २, पृ. १३५; जेधे शकावली.

आठवड्यांत पाठविले. तीन दिवसांनंतर कुत्बशाही सिरेलोर येंगाणा वगैरे मोगलांवर चालून गेले. परंतु मोगल-आदिल सैन्यानें माघार घेऊन त्यांचा पाठलाग करणाऱ्या कुत्बशाही सैन्यास एका अडचणीच्या जागीं गांठलें. या वेळीं मोगली सैन्यास कुमकहि येऊन मिळाली. तेव्हां त्यांनीं कुत्बशाही बरेच लोक कापून काढले. नौबत व निशाणें काबिज केलीं. सेनापतींना कैद करणार तोंच कुत्बशाही सरलष्कर व त्याचें सैन्य मदतीला धांवून गेलें. त्यामुळें युद्धाचा रंग पालटला. मोगली सैन्य मागें हटूं लागलें. नंतर पुन्हां चकमकी उडाल्या. परंतु त्यांत कोणासच यश मिळालें नाहीं. कुत्बशाही सैन्यानें मोगल-आदिलशाही रसद मारून आणली. तेव्हां अडचणींत सांपडलेल्या मोगली फौजेनें ता. २० आक्टोबर १६७७ इ. स. रोजीं गोवळ-कोंड्याच्या गोटावर हल्ला करून मुलामाणसांची कत्तल करून दाणागोटा नेला. कुत्बशाही सरलष्कराचा मोड होऊन त्याला मागें हटावें लागलें. या वेळीं सजातीय लोकांशीं लढण्याचें पठाण सरदारांनीं नाकारलें. त्यावरून गोवळकोंड्यास त्यांच्या घरांवर पहारे ठेवले. लढाई चालू होती. तरी तहाची वाटाघाट चालूच होती.[३३४]

आदिलशाहींत दक्षिणी व पठाण सरदारांत यादवी माजून राहिली होती. त्यामुळें आदिलशाहीच्या ऱ्हासाचीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं. मसाउदखानानें या वेळीं उठाव करून आदिलशाही वांचविण्याचा निश्चय केला व त्यानें कुत्बशाहास मध्यस्थी करण्याचा आग्रह केला. तानाशाहानें अबदुल करीम उर्फ बहलोलखानाची भेट घेतली. त्याची समजूत घातली. या भेटींत असें ठरलें कीं, बहलोलखानानें आदिल-शाही कारभार मसाउदखानाच्या हवालीं करावा व पठाणांच्या पगाराचें देणें देण्यासाठीं तानाशाहानें मदत म्हणून सहा लक्ष होन द्यावेत. आक्कणास आदिलशाहाचा मुख्त्यार म्हणून विजापुरांत ठेवून घ्यावें. याप्रमाणें करार झाल्यानंतर आक्कणा व महमद इब्राहिमचा मुलगा मिर्झा संजर यांस कुत्बशाही तीनचार हजार स्वारां-निशीं मसाउदखान व बहलोलखानाबरोबर विजापुरास रवाना केलें. मसाउदखान व बहलोलखान दिलेरखानास भेटले. दिलेरखानानें या व्यवस्थेस मान्यता दिली. परंतु शिवाजीशीं लढण्याचें कलम मध्येंच लादलें. चं. ८ जिल्काद हि. १०८८

३२४. गोवळकोंडा, पत्रें, १९ सप्टेंबर व २८ आक्टोबर १६७७ इ. स., इं. रे. ऑन शि., भा. २, पृ. १३६-७, १४३-४; देवीप्रसादजी मुन्शिकृत औरंगजेबनामा, हिंदी, भा. २, पृ. ७४; डाग रजिस्टर, न्यू. भा. १८, ८ नवंबर १६७७, पृ. ३५५-६; मनुशी, व्हॉ. २, पृ. २२२-३.

(३ जानेवारी १६७८ इ.स.) रोजीं बहलोलखान वारला.[३३५] त्यामुळें मसाउदखानानें रचलेला व्यूह ढांसळला. दिलेरखानहि मोड झाल्यामुळें परत गेला. सर्जेखान व सिद्दी मसाउद ५० हजार घोडदळानिशीं विजापुरास जाऊं लागले. तेव्हां बहलोलखानानें आपल्या मागें विजापूरच्या संरक्षणार्थ ठेवलेल्या जमशिदखानानें मसाउदखानास कळविलें कीं, माझ्या कारभारांत तुम्हीं कांहींहि ढवळाढवळ न करतां कुत्बशाहा-कडील सहा लक्ष होनांची रक्कम तावडतोब आणून पोहोंचवाल तर किल्ला देईन. ही हकीकत तानाशाहास कळवून रकमेची मागणी केली. परंतु मसाउदखानाची धरसोडीची वागणूक पाहून त्यानें रक्कम देण्याचें नाकारलें.[३३६]

हि. १०८९ (१३ फेब्रुवारी १६७८ ते २ फेब्रुवारी १६७९इ.स.).— चं. ९ मोहरम गुरुवार (२१ फेब्रुवारी १६७८ इ. स.) रोजीं सिद्दी मसाउद विजापूरचे किल्ल्यांत आला व कारभार हातीं घेतला. नंतर दोनतीन दिवसांत कुत्ब-शाहीकडील बरोबर आणलेल्या लोकांची परत रवानगी केली व शिवाजी, कुत्ब-शाहा व आदिलशाहा यांनीं एकत्र होऊन दिलेरखानाची दक्षिणेंतून उचलबांगडी करण्याचा बेत मुक्रर करून कुत्बशाहाकडे सहा लाख होनांची मागणी केली. परंतु मसाउदखानाचा ओढा मूलतः मोगलाकडे असल्यानें कुत्बशाहानें हमी घेतलेली रक्कम दिली नाहीं. उलट जमशिदखानास पठाणांच्या देण्याची अत्यंत निकड लागली.[३३६] ते बहलोलखानाच्या नातेवाइकांस त्रास देऊं लागले. जमशिदखानानें विजापूरचा किल्ला बळकावून शिवाजीस देऊं केला. तेव्हां सर्जेखान कुत्बशाहाचा सल्ला घेण्याकरितां इ. स. १६७८च्या मार्चांत गोवळकोंड्यास गेला. किल्ला मसा-उदखानानें परत घेतल्याचें कळल्यावरून कुत्बशाहानें युद्धखर्चाकरितां कर्जाऊ दिलेल्या एक कोटी होनांची सूट दिली. परंतु दक्षिणेंतील या त्रयींचा संघ मोडला.[३३७] उलट मोगल व विजापूरकर यांनीं शिवाजीविरुद्ध कट केला.[३३८] यामुळें मादण्णा

---

३३५. बुसातिन सलातिन, हिंदी, पृ. ६५०–९; जेधे शकावली; कारवार, पत्र, १३ डिसेंबर १६७७, इं. रे. ऑन शि., भा. २, पृ. १४८

३३६. बुसातिन सलातिन, हिंदी, पृ. ६५९–६५; कारवार, पत्रें, १६ व २३ जानेवारी १६७८, मुंबई, पत्रें, १४ व २१ फेब्रुवारी १६७८, राजापूर, पत्र, २८ फेब्रुवारी १६७८, इं. रे. ऑन शि., भा.२, पृ. १५१, १५२, १५३, १५६ व १५७; मच्छलीपट्टण, पत्र, ११ मे १६७९, डाग रजिस्टर, न्यू. २१, पृ. २०५.

३३७. राजापूर, पत्र, ३ एप्रिल १६७८, इं. रे. ऑन शि, भा. २, पृ. १६०;

३३८. मच्छलीपट्टण, पत्र, २ जुलै १६७८, डाग रजिस्टर, न्यू. १२, पृ. ३६७.

व तानाशाहा यांना गोवळकोंडा सोडून जातां येणें धोक्याचें झालें व त्यामुळें त्यांना मच्छलीपट्टण वगैरे प्रांतांतील जुलै महिन्यांत ठरविलेला दौरा तहकूब करावा लागला.[३३९] नंतर डिसेंबरच्या अखेरीस तो मच्छलीपट्टणास गेला. तेथें डचांनीं सहा हजार होन व इंग्रजांनीं तीन हजार होनांची पेशकश दिली. परंतु सुलतान मुआझ्झम दक्षिणेंत आल्यावरून तानाशाहाला तांतडीनें ता. ४ जानेवारी १६७९ रोजीं परतावें लागलें.[३४०]

हि. १०९० (३ फेब्रुवारी १६७९ ते २२ जानेवारी १६८० इ. स.).— जानेवारीच्या सुरुवातीस दिलेरखान गोवळकोंड्याच्या सरहद्दीवर येऊन ठेपला. खंडणीची रक्कम जबरीनें वसूल करण्यासाठीं तो चालून गेला होता. खंडणींपैकीं ७ लाख (गिल्डर) होन वसूल व्हावयाचे होते. म्हणून तानाशाहानें सुलतान मुआझ्झम दक्षिणेंत आलेला समजतांच त्याच्या अभिनंदनार्थ एक वकील मोठा नजराणा घेऊन पाठविला व दिलेरखानाची मोहीम थांबविण्याबद्दल विनंति केली.[३४१] पावसाळ्यानंतर (आक्टोबर) मोगलांनीं कुत्बशाहाकडे बाकी राहिलेल्या खंडणीबद्दल सोन्याचीं ४० मोठीं पिपें, मुआझ्झमकरितां कुत्बशाहाची मुलगी व शिवाय हिरेजडित सलकडीं जोड इत्यादिकांची मागणी करण्याकरितां गोवळकोंड्यास वकील पाठविला. नंतर दिलेरखानानें आपल्या सैन्याच्या खर्चाकरितां २४ पिपें सोन्याची आणखी मागणी घातली व ती न दिल्यास गोवळकोंड्यावर चालून जाण्याची धमकी दिली. त्यास कुत्बशाहानें कळविलें कीं, 'मजजवळ इतकें द्रव्य नाहीं, राजकन्येचा दुसऱ्या तरुणाबरोबर आधींच वाङ्‌निश्चय झाला आहे, आणि सलकड्यांवर हिऱ्याऐवजीं स्फटिकाचीच योजना होऊं शकेल.[३४२] याप्रमाणें रोकडा जबाब मिळाल्यानें शाहाजादा मुआझ्झम व दिलेरखान यांनीं आपलीं सैन्यें गोवळकोंड्याच्या हद्दींत नेलीं. परंतु शिवाजीनें

---

३३९. मद्रास, पत्र, ८ जुलै १६७८, इं. रे. ऑन शि., भा. २, पृ. १६७.

३४०. मद्रास, पत्र, ६ व ८ जानेवारी १६७९, लेटर्स फ्रॉम फोर्ट सेंट जॉर्ज ते इतर अधिकारी, व्हॉ. १६७९, पृ. २ व १२; कन्सल्टेशन, १३ जानेवारी व ६ व १७ फेब्रुवारी १६७९, डायरी आणि कन्सल्टेशन बुक, व्हॉ. १६७९-८०, पृ. २, १५ व १७, मार्टिनचें मेमॉयर, पृ. २९९ अ.

३४१. मार्टिन मेमॉयर, पृ. २९९ अ; मच्छलीपट्टण, पत्र, ११ मे १६७९, डाग रजिस्टर, न्यू. २१, पृ. २०५.

३४२. मच्छलीपट्टण, पत्र, २५ आक्टोबर १६७९ इ. स., डाग रजिस्टर, न्यू. ४, पृ. ४९९.

आपल्या सैन्यानिशीं जाऊन त्यांच्या पिछाडीवरून हल्ले चढविल्यामुळें त्यांना माघार घ्यावी लागली.[३४३] दिलेरखान विजापुराकडे वळला. तेव्हां शिवाजीची मदत आपणास मिळत आहे हें पाहून तानाशाहानेंहि मुआइझम यास कळविलें कीं, आतां बाकी राहिलेली खंडणी देण्याचा आपला विचार नाहीं व कांहीं झालें तरी यापुढें आपण ती देणार नाहीं.[३४४] मोगलांनीं प्रथम विजापूरची मोहिम यशस्वी करण्यासाठीं सर्वस्व खर्चण्याचें ठरविल्यानें कुत्बशाहावर चालून न जातां ते तिकडेच गेले. त्यामुळें आदिलशाही सरदारांची त्रेधा उडाली. त्यांनीं व शिवाजीनें कुत्बशाहाकडे (नवंबर १६८०) मदत मागितली. कुत्बशाहानें सरलष्कर व दुसरे सेनापति यांस त्याप्रमाणें हुकूमहि दिला. परंतु इतक्यांत मोगलांचा हेजिब येऊन त्यानें 'तुम्ही विजापुरास मदत केल्यास मोगलांचें सैन्य विजापुरांत आहे तेंच पुढें येऊन गोवळकोंड्यावर स्वारी करील' अशी धमकी दिली. त्यामुळें कुत्बशाहानें आपलें सैन्य मदतीस न जाऊं देतां (डिसेंबर १६७९ इ. स.) गुप्तपणें शिवाजीकडे पैसा पाठविला व त्यास सैन्य उभें करण्यास सांगितलें.[३४५]

हि. १०९१ (२३ जानेवारी १६८० ते १२ जानेवारी १६८१इ.स.).—मोगली सैन्यास विजापूरच्या हल्ल्यांत यश येईना व शिवाजीनें त्यांना सतावून सोडलें. त्यानें खास मोगली मुलुखांत शिरून लुटालुट आरंभिली. शिवाय उत्तरेकडीलहि राजकारण आलें. दिलेरखानासहि कर्नाटकांतून त्याच्या अपेक्षेप्रमाणें मदत होईना. तेव्हां दिल्लीहून सुलतान मुआइझमास हुकूम आला कीं, नबाब खलिल-उल्ला-खान (महमद इब्राहीम) याचेतर्फे तह घडवून आणण्यासाठीं तानाशाहास विनंति करावी. परंतु त्याचा फारसा उपयोग झाला नाहीं. मोगली सैन्यास रसद न मिळाल्यामुळें तें परत विजापुराहून (फेब्रुवारी) निघून गेलें. विजापूरकरांना कुत्बशाहानें शिवाजीच्या तर्फे बरीच मदत दिली.[३४६]

---

३४३. कोरोमंडलचीं पत्रें, १६ नवंबर १६७९ इ. स., डाग रजिस्टर, न्यू. २६, पृ. ५४०.

३४४. डाग रजिस्टर, न्यू १, पृ. ५५४.

३४५. गोवळकोंडा, पत्र, १४ जानेवारी १६७९ इ. स., फॅ. रे., फो. सें जॉ., भा. २८, पृ. ३४.

३४६. कोरोमंडलची हकीकत, ७ व २१ फेब्रुवारी १६८०, डाग रजिस्टर, न्यू. १६, पृ. २४४., व पुलिकत, १३ मे १६८०, न्यू. २३, पृ. २८०-१.

एप्रिल १६८०त मदुरेच्या नायक व एकोजी यांचें वैनमस्य आलें. त्या वेळीं एकोजीकडील रघुनाथपंतानें कुत्बशाहाची मदत मागितली. परंतु जिंजी व त्या-खालील मुलुखावर कुत्बशाहानें आपला हक्क दाखवून तो परत देण्यास कळविलें. रघुनाथ पंडितानें कुशल वकील पाठवून मादण्णाबरोबर बोलणें लावलें.[३४७]

हि. १०९२ ( १३ जानेवारी ते ३१ डिसेंबर १६८१ इ. स. ).—इंग्रजांचें व पोडला लिंगप्पाचें नीट जमेना. मास्टरच्या जबरदस्तीचा कारभार सहन करण्याइतका तो भित्रा नव्हता. त्यानें मास्टर गडबड करूं लागतांच इंग्रजांची रसद व व्यापार बंद केला. त्यावरून एप्रिल १६८१त मादण्णा, आक्कण्णा व महमद इब्राहीम यांस त्यांनीं पत्रें लिहून लिंगप्पाच्या विरुद्ध तक्रार केली. आक्कण्णा जानेवारींत तिरुपतीवरून परत गोवळकोंड्यास गेला होता. पोडला लिंगप्पानें इंग्रजांस खरमरीत पत्र लिहिलें कीं तुम्हांस येथें राहाण्यास परवानगी दिली ती आमच्या लोकांस तुम्ही निर्बंध करावा म्हणून नाहीं. जर तुम्ही तसें कराल तर येथील ३-४ हजार सैन्यापेक्षां अधिक सैन्य चालून येईल. आक्कण्णानें दरबारातर्फे इंग्रजांच्या वकिलास समज दिली कीं, कोणत्याहि बाबतींत जें कांहीं बोलणें करावयाचें तें प्रथम तेथील सुभेदारापाशींच केलें पाहिजे. इतकेंच नव्हे तर वार्षिक पेशकशीची रक्कमहि तातडतोब भरली पाहिजे अशी ताकीद केली.[३४८]

नवंबर १६८१त मोगली सैन्य नर्मदापार आल्याचें समजल्यावरून आक्कण्णानें श्रीस्थलास जाण्याचा बेत रहित केला. मिर्झा संजर व इतर सरदारांस घोडदळासह सरहद्दीवर संरक्षणार्थ रवाना केलें. मोगलास करार केलेल्या वार्षिक खंडणींतील कांहीं भागाबद्दल पंधरा हत्ती, बरेच मण सोनें व चांदी पाठविण्याचें ठरलें.[३४९]

हि. १०९३ ( १ जानेवारी ते २० डिसेंबर १६८२ इ. स. ).—चं. १६ जमादिलाखल हि. १०९३ ( १४ मे १६८२ इ. स. ) रोजीं कुत्बशाहाचा

---

३४७. गोवळकोंडा, पत्र, एप्रिल १६८० इ. स., डाग रजिस्टर, न्यू ०, पृ. ७२४-९.

३४८. मद्रास, कन्सल्टेशन, ६ जानेवारी, २७ व ३१ मार्च, ७ एप्रिल १६८१ व पोडला लिंगापाचें कांजिवरमहून पत्र, १० जुलै १६८१; गोवळकोंडा, पत्र, २१ जुलै, १६८१ इ. स., डायरी आणि कन्सल्टेशन बुक, १६८०-८१, पृ. ८९; १६८१, पृ. १३ व १४ व १५, लेटर्स फ्रॉम फोर्ट सेंट जॉर्ज, व्हॉ. I-१-१६८१-२, पृ. १, ३ व १२.

३४९. गोवळकोंडा, पत्र, १९ सप्टेंबर १६८१ इ. स., लेटर्स टू फोर्ट सेंट जॉर्ज, व्हॉ. १, १६८१-२, पृ. ३७.

वकील मोहमद मासूम यानें गोवळकोंड्याहून आणलेली २ लाख ४४ हजार रुपयांची पेशकश बादशाहास नजर केली.[३५०]

ता. १ जानेवारी १६८२ इ. स. रोजीं मादण्णा व आक्कण्णा यांनीं पोडला लिंगाप्पाच्या शिफारसीवरून इंग्रजांस सालाबादप्रमाणें व्यवहार करण्यास परवानगी दिली. मास्टरच्या जागीं वुलियम गायफर्ड आल्यानें इंग्रजांचा कारभार सुरळीत चालूं लागला.[३५१]

मोगल दक्षिणेंत उतरल्यामुळें राज्यांत सर्वत्र अस्थिरता आली. हुकेरीच्या राजानें बसवापट्टण घेतल्यामुळें मार्च महिन्यांत कुत्बशाहाचा महमद इब्राहीमवर बराच रोष झाला. मोगली परचक्रामुळें सर्व मोठमोठे कारभारी चिंताक्रांत व राजकारस्थानांत व्यग्र होऊन गेले.[३५२]

ता. ११ मे १६८२ इ. स. रोजीं तानाशाहा मादण्णाच्या घरीं गेला व त्यानें महमद इब्राहीमची सरलष्करी आक्कण्णास दिली व कर्नाटकाची सुभेदारी पोडला लिंगाप्पास दिली. त्यामुळें नेकनामखानाकडे पूर्वी जो सुभा होता तो लिंगाप्पाकडे आला. लिंगाप्पास हत्ती, घोडे, तरवार, सन्मानाचीं वस्त्रें वगैरे पाठविलीं. महमद इब्राहीमकडे राहिलेली सरखैली मिळविण्यासाठीं मच्छलीपट्टणचा हवालदार हसन बेग जुलैंत गोवळकोंड्यास येऊन खटपट करूं लागला.[३५३]

इ. स. १६८२च्या जुलैअखेर मोगली सैन्यानें आदिलशाही मुलखांत शिरून लढाईची कुरापत काढली. तेव्हां गोवळकोंडेकर व संभाजी यांनीं विजापूरच्या मदतीस कांहीं सरदार व सैन्य रवाना केलें. आगस्टच्या अखेर मादण्णास मोगली परचक्रामुळें मुलकी कारभार पाहण्यास मुळींच वेळ मिळेना. तेव्हां तो कारभार आक्कण्णाकडे दिला.[३५४] त्यामुळें आक्कण्णास निरनिराळ्या प्रांतांत फिरून पाहाणी वगैरे

---

३५०. देवीप्रसादजी मुन्सिफकृत औरंगजेबनामा, हिंदी, भाग २, पृ. ११८.

३५१. मादण्णा व आक्कण्णाचीं फर्मानें, १ जानेवारी १६८२ इ. स., लेटर्स टु फोर्ट सेंट जॉर्ज, व्हॉ. २, १६८२, पृ. १८.

३५२. गोवळकोंडा, पत्र, मार्च-एप्रिल १६८२ इ. स., लेटर्स टु फोर्ट सेंट जॉर्ज, व्हॉ. २, १६८२, पृ. २६.

३५३. गोवळकोंडा, पत्र, १७ मे, व मद्रापोलम, पत्र, ३ जुलै १६८२ इ. स., लेटर्स टु फोर्ट सेंट जॉर्ज, व्हॉ. २, १६८२, पृ. ३९ व ५८.

३५४. गोवळकोंडा, पत्रें, २ आगस्ट व ६ सप्टेंबर १६८२ इ. स., लेटर्स टु फोर्ट सेंट जॉर्ज, व्हॉ. २, १६८२, पृ. ६८ व ९४.

करण्यास सवड होईना व त्याला आपल्या दौऱ्याचा कार्यक्रम वेळोवेळीं तहकूब करावा लागला.[३५५]

हि. १०९४ ( २१ डिसेंबर १६८२ ते १० डिसेंबर १६८३ इ. स. ).— इ. स. १६७५च्या अखेरीस सय्यद मुझाफरखान याचा दिवाणीचा कारभार काढून घेतला होता. त्यानंतर तो कैद झाला असावा. त्याला सोडण्याविषयीं औरंगजेबाकडून लिहून आलें. त्यावरून त्याला कुत्बशाहानें सोडलें. तो आपल्या दोन मुलांसह चं. २० जमादिलावल ( ८ मे १६८३ इ. स. ) रोजीं बादशहास भेटला. औरंगजेबानें त्यास सन्मानाचीं वस्त्रें व जडाऊ खंजर बक्षिस दिला. त्याच्या दोन मुलांस मनसबी व असलतखां व निजाबतखां असे किताब दिले.[३५६]

हि. १०९५ ( ११ डिसेंबर १६८३ ते २७ नवंबर १६८४ इ. स. ).— चं. १२ जमादिलाखर ( १८ मे १६८४ इ. स. ) रोजीं शुजाअत हैदराबादी औरंगजेबास जाऊन मिळाला. त्याला पांच हजारी, पांच हजार स्वारांची मनसब व शुजाअतखां हा किताब मिळाला.[३५७] चं. १८ जमादिलाखर ( २४ मे १६८४ इ. स. ) रोजीं हाजी महताब हैदराबादी मोगलांस जाऊन मिळाला.[३५८]

चं. २३ रज्जब ( २७ जुन १६८४ इ. स. ) रोजीं कुत्बशाहानें अलमगीर बादशाहाकडे ऐन उल्मुल्क नांवाचा वकील पाठविला. हा महमद जाफरचा मुलगा असून तो अकबराबरोबर बंड करून दक्षिणेंत पळून गेलेल्यांपैकीं एक होता असें कळल्यावरून त्यास चं. २५ रज्जब ( २९ जून ) रोजीं कोतवालानें कैद केलें व त्याची मालमत्ता जप्त केली. कुत्बशाहास त्यानें बऱ्याच थापा दिल्यावरून त्याला त्यानें नोकरींत घेतलें होतें. तो अकबराकडे होता ही गोष्ट त्याला माहित नव्हती. नंतर कांहीं दिवसांनीं अलमगीर बादशाहानें ऐन उल्मुल्कास तीनशेंची मनसब देऊन त्याला आपल्या नोकरींत ठेवून घेतलें.[३५९]

---

३५५. मदापोलम, पत्र, १४ सप्टेंबर, मच्छलीपट्टण, पत्र, १२ आक्टोबर, पेडापोलम, पत्र, २१ आक्टोबर १६८२ इ. स., लेटर्स टु फोर्ट सेंट जॉर्ज, व्हॉ. २, १६८२, पृ. ९६, १०२ व १०३.

३५६. देवीप्रसादजी मुन्सिफकृत औरंगजेबनामा, हिंदी, भा. २, पृ. १२४.

३५७. देवीप्रसादजी मुन्सिफकृत औरंगजेबनामा, हिंदी, भा. ३, पृ. ७.

३५८. देवीप्रसादजी मुन्सिफकृत औरंगजेबनामा, हिंदी, भा. ३, पृ. ८.

३५९. देवीप्रसादजी मुन्सिफकृत औरंगजेबनामा, हिंदी, भा. ३, पृ. ८.

चं. २९ साबान ( २ आगस्ट १६८४ इ. स. ) रोजीं मिर्झा महमद व बिहारीदास यांस कुत्बशाहानें दिलेले अठरा हजार रुपये व दोन हत्ती परत देण्याची आज्ञा झाली.[३६०]

सप्टेंबरच्या सुमारास कुत्बशाही व मराठा सैन्य मोगलांनीं विजापुरास वेढा घातला होता म्हणून आदिलशाहाच्या मदतीस गेलें.[३६१]

हि. १०९६ ( २८ नवंबर १६८४ ते १८ नवंबर १६८५ इ. स. ).—इ. स. १६८५च्या सुरुवातीस सर्व दक्षिणीयांनीं मोगलांशीं सामना देऊन त्यांना घालवून देण्याचें गुप्त कारस्थान जोरांत चालू केलें. संभाजीराजानें रामचंद्रपंतास कुत्बशाहाकडे पाठवून या गुप्त कारस्थानांत सर्वांस सामील करून घेण्याबद्दल बोलणें लावलें. या कारस्थानाची कल्पना कुत्बशाहानें आदिलशाहास लिहिलेल्या फर्मानावरून येते.[३६२] त्या पत्रांतील मजकुराचा सारांश असाः " अलमगीर पादशाहा दौलताबादेस आल्यानंतर त्यानें आम्हांकडे एक हेजिब पाठवून ' आम्ही मराठे छत्रपति संभावर डोळा ठेवून आलों आहोंत. तरी आपण आपला फौजफाटा आमच्या मदतीस देऊन नालबंदीहि देणें.' तेव्हां आम्ही जबाब पाठविला कीं, दख्खणची पातशाही व आमची पातशाही निरनिराळी नाहीं. त्यावरून मोगल आपलेवर चालून आला आहे. भिण्याचें कारण नाहीं. आम्ही पैसा पुरवूं. आपण सर्जाखानास दिलदिलासा देऊन त्यास सरसुभा करून मोगलावर रवाना करावा. महाराज छत्रपति संभाजी राजे यांचेकडे एक खत हेजिबाबरोबर धाडून त्यांचेकडून मोगलांचा फन्ना उडविण्यासाठीं घोडदळाची मदत मागावी. आम्ही खासे कंबर बांधून कुलबर्ग्यास जात आहोंत. तुम्हीहि कंबर बांधून यावें. संभाजी तयारीनें येतच आहेत. यांत तुमच्या राज्यास धक्का लागणार नाहीं. माधवराव हेजीब सर्व कांहीं सांगून पाठविला आहे. आदिलशाहाकरितां एकदोन मेवा, एकदोन घोडे व चार हत्ती, सहा सारंगी घोडीं पाठवीत आहें. मसुदखानास कोटाच्या रक्षणास ठेवलेत

३६०. देवीप्रसादजी मुन्सिफकृत औरंगजेबनामा, हिंदी, भा. ३, पृ. ९.

३६१. कारवार, पत्र, १५ सप्टेंबर १६८४ इ. स., फॅक्टरी रेकॉर्डस्, व्हॉ. १०९ ( मूळ ).

३६२. शिवसाहित्य, खंड २, ले. ३९४, पृ ३९५–९७. या फर्मानावरील पैवस्ती चं. ५ रबिलाखर ( १ मार्च १६८५ इ. स. ) आहे. यावरून हें फर्मान फेब्रुवारीच्या दुसऱ्या पंधरवडयांत लिहिलें गेलें असावें. बु. स., हिंदी, पृ. ७५१.

तरी पुरे आहे. संभाजीनें चार हिशे (?) करड्या घोड्यांची संचणी केलीच आहे. आम्हांस माल्गुजार वगैरे लोकांनीं कळविलेंच आहे कीं, याप्रमाणें कारस्थान करावें. म्हणून हा कारभार हातीं घेतला आहे. यांत यश आलें तर तुम्हांस आम्ही आपली मुलगी देऊन कायमची दोस्ती करूं. दख्खणची पादशाही सांभाळणें अवश्य म्हणून पैसे व हेजिब पाठविला आहे. तरी मुरीदखान व बहलोलखान यांस दिलदिलासा द्यावा. कर्नाटकी राजे राचेवाल यांस बोलावून घ्यावें. त्या योगानें आपणांस जोरच मिळेल. संभाजीनें आम्हांकडे रामचंद्रपंत हेजीब पुष्कळ गुप्त गोष्टी सांगून पाठवीला आहें. त्यास आपलेकडे पाठवीत आहें. त्याचें म्हणणें नीट ऐकून घेऊन त्यास इष्ट असाच जबाब द्यावा."[३६२] याप्रमाणें पत्र गेलें. नंतर लवकरच मार्चच्या अखेरीस कुत्बशाहानें विजापुराच्या मदतीस तीन हजार स्वार व तीन लाख होन खर्चासाठीं पाठविले.[३६३]

कुत्बशाहानें मोगलांशीं वैर स्वीकारल्याचें वर्तमान सोलापूर येथील हेजिब महमद मासूम व महमद जाफर यांस कळविलें. त्यांत, शिकंदर पोरका पाहून त्याचा नाश करण्यास औरंगजेब उद्युक्त झाल्यानें त्याच्या साहाय्यास जाणें जरूर म्हणून एका बाजूनें शिकंदर व संभाजी आपल्या अगणित फौजेनिशीं लढत आहेत, तरी आम्हीहि आमच्या ४० हजार घोडदळानिशीं खलिलउल्लाखान पलंग हम्ला यास दुसऱ्या बाजूनें पाठवित आहोंत वगैरे मजकुर होता. परंतु हें पत्र औरंगजेबाच्या हातीं चं. ४ साबान (२७ जून १६८५ इ.स.) रोजीं पडलें. तेव्हां औरंगजेबास राग आला. त्यानें खान जहान बहादुर व शहा अलम यांस गोवळकोंड्यावर चालून जाण्याचा हुकूम दिला[३६४].

चं. २४ रमजान (१५ आगस्ट १६८५ इ. स.) रोजीं अंबाजीपंत हैद्राबादेहून विजापुरास जाऊन आदिलशाहास भेटले. आदिलशाहास मदत दिली व संभाजी महाराजाकडून देवविली.[३६५]

औरंगजेबानें गोवळकोंड्यावर लढाई करण्याचें ठरविलेलें समजताच कुलबर्ग्याच्या किल्लेदाराचा मुलगा जान निसारखान आणि मालखेडच्या किल्लेदाराचा भाऊ परविझ बेग यांनीं सेरमची गढी घेतली. तेव्हां अबुल हसननें शेख मिनाज,

---

३६३. जेधे शकावली.

३६४. परिशिष्ट २, पृ. ९३-४; देवीप्रसादजी मुन्सिफकृत औरंगजेबनामा, भा. ३, पृ. २०-१; प्रो. सरकार, औरं., भा. ४, पृ. ३४२.

३६५. बु. स., हिंदी, पृ. ७५३.

रुस्तमराव व बराखान यांस ती गढी परत घेण्यास पाठविले. कुत्बशाही सैन्य आलेलें पाहतांच जान निसारखान सेरमच्या किल्ल्यांत जाऊन बसला. नंतर खान जहान बहादुर आपले दोन मुलगे हिम्मतखान व सिपेहदारखान, इराचखान व इतर उमरावांनिशीं जलदीनें धांवून आला. त्याला अडविण्यासाठीं कुत्बशाहानें महमद इब्राहिमास रवाना केलें. परंतु खान जहान बहादुर त्याची गांठ पडण्यापूर्वीच मालखेडास येऊन पोहोंचला. खलिलउल्लाखानहि त्या जागीं आला व त्यानें मोगली सैन्यास गराडा घातला. खान बहादुर मोर्चे बांधून व खंदक खणून बसला. किरकोळ हल्ले होत असत. याप्रमाणें एक महिना लोटला. आगस्टच्या सुरुवातीस कुत्बशाही सैन्यानें मोगली फौजेवर हल्ला चढविला. हिम्मतखान, सिपेहदारखान व इराचखान उजवीकडून, रजपूत व अफगाणी सैन्य डावीकडून व खान जहान बहादुर समोरून असे प्रतिकार करूं लागले. परंतु यापूर्वी शेख मिनाज व बराखान यांनीं दोनतीन बाजूंनीं मोगली मोर्चावर हल्ला चढविला. बरेच लोक मारले. तोफांचीहि पर्वा न धरतां मोगली फौजेचा बराच नाश करूं लागले. हें पाहून मोगली सरदार हत्तींवरून लढूं लागले. सिपेहदारखान, जगतसिंग हाडा व शर्झाखान यांचेवर शेख मिनाज धांवून गेला. मोठी धुमश्चक्री उडाली. शेख मिनाजनें एक बुणगा मारला. रुस्तुमराव हिम्मतखानावर चालून गेला. त्यांच्या हातघाईत हिम्मतखान, सफदारखान व जसवंत बुंदेला हे जखमी झाले. हिम्मतखानानें बापाजवळ मदत मागितली. परंतु या वेळीं खलिलउल्लाखानानें व बडेखानानें खान जहान बहादुरास घेरून टाकला होता. बडेखानाचा हात जखमी झाला म्हणून खान जहान वांचला. मोगलांची सर्व बाजूंनीं दाणादाण उडाली. इतक्यांत कर्मधर्मसंयोगानें राजा रामसिंहाचा हत्ती मस्तीस आला व त्यानें तीनचार मणाच्या सांखळीनें शत्रुसैन्यांत घुसून दिसेल त्यास झोडपून काढण्यास सुरुवात केली. बडेखान धाडशी व ताकदवान होता. तो त्या हत्तीवर चालून गेला. परंतु त्याचा घोडा भीतीनें बेफाम झाल्यानें तो घोड्यावरून खालीं पडला व तात्काळ मरण पावला. या गोंधळाचा फायदा घेऊन खान जहानानें कुत्बशाही सैन्यावर निकराचा हल्ला चढविला. कुत्बशाही सैन्य एकदोन कोस मागें हटलें.[३६६]

शहा अलम आपल्या सैन्यानिशीं कुलबर्ग्यास आला. कुत्बशाहानेंहि आणखी कुमक पाठविली. खान जहानानें शहा अलम यास तांतडीनें येण्यास लिहिल्यावरून

३६६. परिशिष्ट २, पृ. ९४-९; खाफीखान, इ. डॉ., व्हॉ. ७, पृ. ३१५-७; प्रो. सरकार, औरंगजेब, भा. ४, पृ. ३४१-३.

तो घाईनें आला व ते ताबडतोब कुत्बशाही सैन्यावर चालून जाऊं लागले. सूर्योदयाच्या सुमारास दोन्ही सैन्यांची गांठ पडली. हेरावळींत शहा अलमचा मोठा मुलगा मुईझउद्दिन व खान जहान होते. त्यांचेवर जोराचा हल्ला झाल्यानें तीन हत्ती, चारपांचशें घोडे व बरेंच पायदळ ठार झालें. कुत्बशाही सैन्य तोफांना न जुमानतां तळांत घुसलें व दाणादाण उडवूं लागलें. तेव्हां सय्यद अबदुल्ला, ख्वाजा अबदुल मकरम व राजा मानसिंग मदतीस आल्यानें कुत्बशाही सैन्य थोपवून धरलें गेलें. तीन दिवस लढाई झाली व दोन्हीहि सैन्यांचा बराच नाश झाला. शेवटीं कुत्बशाही सैन्यानें माघार घेतली. मोगलांनीं एकदीड कोस पाठलाग केला. परंतु सायंकाळ झाल्यानें मोगली सैन्य परत फिरलें.[३६७]

या लढाईनंतर कुत्बशाही फौजेनें मोगलांवर चोरटे हल्ले चढविले. याप्रमाणें चार महिने गेले. अलमगिराच्या रागावून लिहून आलेल्या पत्रांमुळें खान जहानाचा विरस झाला होता व शहा अलम अबुल हसनशीं शक्य तर तह घडवून आणण्याची सारखी खटपट करीत होता. मोगल सैन्यानें काबिज केलेली सेरमची गढी व कोहीरचा प्रांत यांवरील हक्क सोडून कुत्बशाही सैन्य परत जाईल तर मी तह घडवून आणतों, असें शहा अलमचें म्हणणें होतें. खलिलउल्लाखान तह करण्यास उद्युक्त झाला होता. परंतु शेख मिनाज, रुस्तुमराव वगैरे मंडळी प्रांत सोडण्याच्या विरुद्ध होती. याच वेळीं कुत्बशाहाकडून आणखी कुमकहि येऊन पोहोंचली. कुत्बशाही सैन्यानें हल्ला चढविण्याची तयारी केली.[३६८]

आक्टोबर १६८५च्या सुरुवातीस कुत्बशाही सैन्यानें तोफांच्या सरबत्तीस प्रारंभ केला. बुणगा पूर्वेकडे तीनचार कोसांवर नदीच्या पलीकडे नेला. मोगली हेरावळींत मुइझउद्दिन, खान जहान, सफदारखान व हिम्मतखान होते. चंद्रावळींत सय्यद अबदुल्लाखान व इतर सरदार होते. त्यांस कुत्बशाही दोन कटकांनीं घेरलें. शहा अलमनें कुमक म्हणून एक तुकडी मागें ठेवली होती. तिचेवरहि एका कुत्बशाही तुकडीनें हल्ला चढविला. खास शहा अलमच्या बरोबर बरेच रजपूत राजे होते. त्यांच्यावर कुत्बशाही मुख्य सैन्य चालून गेलें. भयंकर रण माजलें. शेवटीं कुत्बशाही सैन्य मागें हटूं लागलें. बुणग्यापर्यंत आलें. मोगलांनीं पाठलाग केला. शेख मिनाजनें मोगली हेरावळीचा सेनापति मुइझउद्दिन यास निरोप पाठवून इस्लामी रिवाजाप्रमाणें

---

३६७. परिशिष्ट २, पृ. ९९–१००.

३६८. परिशिष्ट २, पृ. १०१–३.

बायकामुलांस रणक्षेत्रापासून दूर पोहोंचविण्यापुरता तीनचार घटकांचा अवसर द्या नंतर आम्ही लढाई देऊं असें कळविलें. मुइझउद्दिननें विनंति मान्य केली व कुत्बशाही सरदारांस हत्तींवरून बायकामुलें व मालमत्ता शेजारील गढीवर पोहोंचवूं दिली. दुसरे दिवशीं पुन्हां घनघोर रण माजलें. दोन्ही बाजूंकडील बरेच लोक मारले गेले. कुत्बशाही शेख मिनाज व रुस्तुमराव जखमी झाले. मोगलांकडीलहि कांहीं सरदार जखमी झाले. दोन्हीहि बाजूंकडील सरदारांनीं आपल्या शौर्याची पराकाष्ठा केली. खलिलउल्लाखान व इतर पठाण सरदारांचा शहा अलमकडे ओढा होता. त्यामुळें त्यांनीं प्रथमपासूनच अंगचोरीनें काम चालविलें होतें. सायंकाळपर्यंत युद्ध झालें. रात्रीं सैन्यें आपापल्या तळांवर गेलीं. महमद इब्राहीम फितुर झाल्याचा संशय आल्यावरून त्याचा बंदोबस्त होऊन आला होता. परंतु (ता. ८ आक्टोबरच्या सुमारास) खलिलउल्लाखान रात्रींच पळून जाऊन मोगलास[३६९] मिळाल्यानें कुत्बशाही सैन्यानें रातोरात आपला मुक्काम हलवून हैद्राबादेची वाट धरली. शहा अलमहि त्यांचा पाठलाग करीत हैद्राबादेस आला.[३७०]

कुत्बशाही फौजेनें माघार घेतलेली समजतांच अबुल हसननें आपलें जडजवाहीर वगैरे रातोरात गोवळकोंड्याच्या किल्ल्यांत नेलें. हैद्राबादेंतील लोक नेतां येईल ती मालमत्ता घेऊन बाहेर गांवीं जाऊं लागले. ज्यांना किल्ल्यांत जाणें शक्य होतें ते रात्रीं किल्ल्यांत गेले. या गडबडींत चोर व दरवडेखोर लोकांनीं मनमुराद लूट व जाळपोळ करण्यास सुरुवात केली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं शहा अलमचें सैन्य हैद्राबादेस येऊन दाखल झालें. तेंहि लुटालुट व जाळपोळ करूं लागलें. कल्पनातीत लुटालुट झाली. बायकामुलांस त्रास झाला. शहा अलमनें सुझावेल नेमून बऱ्याच प्रयासानें स्थिरस्थावर केली. अबुल हसननें क्षमा मागून तहाचें बोलणें लावलें. शहा अलमनें मध्यस्थी करण्याचें कबूल केलें व तहाच्या अटी सांगितल्या कीं, अबुल हसननें दोन लाख होन खंडणी खेरीज एक कोटी वीस (कांहीं ठिकाणीं ५०) लक्ष रुपयांची पेशकश ताबडतोब भरावी. मोगली सैन्यानें घेतलेला सेरम व

---

३६९. महमद इब्राहिम खलिलउल्लाखानास अलमगिरानें सहा हजारी सरदारी व ६००० स्वार देऊन महाबतखान असा किताब दिला. इ. स. १६८६त त्याला वऱ्हाडची सुभेदारी दिली व इ. स. १६८७त सप्तहजारी देऊन प्रथम कर्नाटकांत व नंतर पंजाबच्या सुभ्यावर पाठविलें. तो इ. स. १६८८त वारला.

३७०. परिशिष्ट २, पृ. १०३-८; मनुशी, व्हॉ. २, पृ. २८८-९४.

कोहीर वगैरे प्रांत मोगलांकडे राहूं द्यावा. मादण्णा व आक्कण्णा यांस कारभारावरून दूर करावें. अबुल हसननें बहुतेक सर्व अटी कबूल केल्या.[३७१]

शहा अलमनें हैद्राबाद फत्ते केल्याची वगैरे बातमी अलमगिरास कळविली. ती सलख जिल्काद ( १९ आक्टोबर १६८५ इ. स. ) रोजीं अलमगिरास मिळाली. याच सुमारास कुत्बशाही फौजेच्या मदतीनें विजापुरच्या वेढ्यांत मोगलांचा पराजय झाला होता.[३७२] त्यामुळें कुत्बशाहाची मदत बंद करण्यासाठीं नाइलाजास्तव शहा अलमच्या विनंतीवरून अबुल हसनला वस्त्रें धाडलीं व तह मान्य केला. शहा अलम यास चाळीस हजारी व तीस हजार स्वारांची मनसब झाली. महमद इब्राहिमचे दोन दाऊद व अबुल हसनचा मेव्हणा शरीफुलमुल्क व इतर लोक शहा अलम यास मिळाले. त्यांसहि वस्त्रें वगैरे देण्याचा हुकूम झाला.[३७३]

सय्यद मुझाफरखानाचा मुलगा मीर हशम व नातू अबदुल करीम औरंगजेबाकडून शहा अलमसाठीं जडजवाहीर व अबुल हसनकरितां वस्त्रें वगैरे घेऊन आला. शहा अलमचा मुक्काम त्या वेळीं कोहीरला गेला होता. तेथून तो सैन्यासह अबुल हसनचीं वस्त्रें देण्यासाठीं हैद्राबादेस येत असतां तो औरंगजेबाच्या हुकुमावरून दर्शनी कारण निराळें दाखवून गोवळकोंड्याचा किल्ला घेण्यासाठीं येत आहे, अशी कंडी उठली. तेव्हां शेख निजाम चालून गेला व वाटेंत त्यास महकाल ( मुनगळ ) येथें गांठलें व हल्ला चढविला. मीर हशम व इतर लोक मारले गेले. बरोबर सौदागरहि होते. त्यांची मालमत्ता लुटली गेली. अबदुल करीम यास कैद केलें होतें. परंतु चार दिवसांनंतर त्यास अबुल हसननें शहा अलमच्या छावणीवर आणून सोडलें.[३७४]

चं. १६ जिल्हेज ( ४ नवंबर १६८५ इ. स. ) रोजीं महमद इब्राहीम, शरीफुल्मुल्क व मोहमदतकी वगैरे लोकांस मोगली नोकरींत घेतलें गेलें.[३७५]

तहांत ठरलेल्या खंडणीची भरपाई पुढें तीनचार महिने झाली नाहीं व मादण्णा व आक्कण्णाला कारभारावरून दूर करणेंहि अबुल हसनला जड गेलें.

---

३७१. परिशिष्ट २, पृ. १०८-११; मनुशी, व्हॉ. २, पृ. २९३-४.

३७२. कारवार, पत्र, ८ आक्टोबर १६८५ इ. स., फॅ. रे., व्हॉ. १०९.

३७३. देवीप्रसादजी मुन्सिफकृत औरंगजेबनामा, भा. ३, पृ. २६.

३७४. देवीप्रसादजी मुन्सिफकृत औरंगजेबनामा, भा. ३, पृ. २७; परिशिष्ट २, पृ. १२४.

विजापूरच्या हल्ल्याचें कामहि दिरंगाईनें व असमाधानकारकपणें चालल्यामुळें अलमगिरानें गोवळकोंड्याकडे कानाडोळा केला.[३७५]

हि. १०९७ (१८ नवंबर १६८५ ते ८ नवंबर १६८६ इ. स.).—खान जहान हैद्राबादेहून नऊदहा दख्खणी सरदारांसह परत गेला. त्यास व या नवीन मिळालेल्या सरदारांस चं. ७ सफर (२३ डिसेंबर १६८५ इ. स.) रोजीं बहुमानाचीं वस्त्रें मिळालीं.[३७६]

चं. १६ रबिउलअव्वल (३१ जानेवारी १६८६ इ. स.) रोजीं कुत्बशाहींतून पळून गेलेले महमद इब्राहीम, शरीफुल्मुल्क व त्याचे मुलगे हिदायतुल्लाह व इनायतुल्लाह आणि अबदुर कादिर यांस अल्मगिरानें मोठमोठीं बहुमानाचीं बक्षिसें व मनसबी दिल्या.[३७७]

जानेवारीच्या अखेरीस मादण्णानें लिंगाप्पास हैद्राबादेस परत बोलावून त्याचे जागीं अबदुल नबीची नेमणूक केली.[३७८]

मार्चच्या दुसऱ्या आठवड्यांत यल्लमतराय यानें गुप्त कट करून सेरोमा, जानीबेग व अबुल हसनच्या इतर नोकरांच्या साहाय्यानें मादण्णा व आक्कण्णा हे कामकाज आटोपून दुपारीं अकरा बारा वाजतां परत जात असतां त्यांस ठार मारलें. मादण्णाचें शीर शहा अलमनें चं. १ जमादिलावल (१६ मार्च १६८६ इ. स.) रोजीं बहादुर अलिखांबरोबर अलमगिराकडे पाठविलें.[३७९] याच दिवशीं अबुल हसनचा एक भाऊबंद जेनुल आबिदीन हा मोगलाकडे गेला. त्यास वस्त्रें व सोलापूरची फौजदारी मिळाली.[३७९]

चं. ३० रज्जब (१२ जून १६८६ इ. स.) रोजीं अबुल हसनकडून गेलेले शंभर हत्ती शहा अल्मनें आपला नोकर मोमिनखां याजबरोबर अलमगिराकडे पाठविले. अबुल हसनचा वकील मोहमद मासूम याची भेट करविली.[३८०]

---

३७५. परिशिष्ट २, पृ. ११५.

३७६. देवीप्रसादजी मुन्सिफकृत औरंगजेबनामा, भा. ३, पृ. २८.

३७७. देवीप्रसादजी मुन्सिफकृत औरंगजेबनामा, भा. ३, पृ. २९.

३७८. कन्सल्टेशन, मद्रास, ४ फेब्रुवारी १६८६ इ. स., डायरी अँड कन्सल्टेशन बुक, १६८६, पृ. १८.

३७९. देवीप्रसादजी मुन्सिफकृत औरंगजेबनामा, भा. ३, पृ. ३०.

३८०. देवीप्रसादजी मुन्सिफकृत औरंगजेबनामा, भा. ३, पृ. ३२.

जूनच्या सुरुवातीस कर्नाटकचा सुभा व्यंकटपतीस झाला. त्यानें घोरपडे वगैरे कर्नाटकांतील सरदारांस दिलदिलासा देऊन कुत्बशाही पातशाही कामावर त्यांनीं रुजू होण्यासाठीं प्रयत्न करण्यास सुरुवात केली.[३८०अ]

चं. ६ जिल्हेज (१४ आक्टोबर १६८६ इ. स.) रोजीं कासिमखानास बसवापट्टणवर जाण्यास अलमगिरानें आज्ञा केली.[३८१]

चं. २२ जिल्हेज (३० आक्टोबर १६८६ इ. स.) खान फिरूझ जंग यास औरंगजेबानें इब्राहिमगड घेण्यासाठीं जाण्याचा हुकूम दिला.[३८१]

हि. १०९८ (८ नवंबर १६८६ ते २८ आक्टोबर १६८७ इ. स.).—ता. १२ सप्टेंबर १६८६ रोजीं विजापूरची आदिलशाही बुडविल्यानंतर अलमगिरानें बाकी राहिलेली पेशकश वसूल करण्याकरितां सादतखान नांवाचा हेजीब कुत्बशाहाकडे पाठविला. नंतर आक्टोबर महिन्याच्या अखेरीस सुझावल नेमले. कासिमखान व खान फिरुझ जंग कुत्बशाही हद्दींत शिरले. तेव्हां अबुल हसननें पेशकशीच्या भरपाईसाठीं दागदागिने व जडजवाहीर देण्याचें सादतखानाच्या संमतीनें ठरविलें. परंतु सादतखानानें ते नेण्यास मुद्दामच दिरंगाई केली. चं. २९ मोहरम (६ डिसेंबर १६८६ इ. स.) रोजीं औरंगझेब हजरत सय्यद बंदे नवाज मुहम्मद गायसु दाराझच्या दर्शनासाठीं कुल्बर्ग्यास आला. अबुल हसननें अलमगीराकडे पांच लक्ष रुपये दानधर्मार्थप्रीत्यर्थ पाठविले. घाईघाईनें पेशकशीबाबत जडजवाहीर व दागदागिनेहि सादतखानाकडे पाठविले व त्याचेकडे अलमगिराचा माफीचा कौल व ऐवजाची पावती मागितली. परंतु ती मिळाली नाहीं. उलट अलमगीर गोवळकोंड्यावर चालून येत असल्याची बातमी आली. अलमगिरानें कुल्बर्ग्याहून चं. १० सफर (१६ डिसेंबर १६८६ इ. स.) रोजीं कूच केलें. अबुल हसननें अलमगीर कुत्बशाही बुडविण्यासाठीं उद्युक्त झाला आहे हें पाहून सादतखानास दिलेलें जडजवाहीर सक्तीनें परत घेण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यांत यश आलें नाहीं. नंतर अबुल हसननें क्षमा करण्याबद्दल अलमगीराकडे नजरनजराण्यासह विनंति केली. परंतु तिचाहि उपयोग

---

३८०अ. कन्सल्टेशन्स, मद्रास, १८ जून व ४ आगस्ट १६८६, डायरी व कन्सल्टेशन बुक, १६८६, पृ. ४८ व ६०; कुत्बशाही फर्मानें—घोरपडे यांस—चं. ११ रमजान १०९७ (२३ जुलै १६८६), भा. इ. सं. मं. त्रैमासिक, व. १३, अंक ४, पृ. ७३, व इंग्रजांस, २४ मार्च १६८७, लेटर्स टु फोर्ट सेंट जॉर्ज, व्हॉ. ४, १६८६–७, पृ. ११६.

३८१. देवीप्रसादजी मुन्सिफकृत औरंगजेबनामा, भा. ३, पृ. ३८-९.

झाला नाहीं. संभाजीराजास मदत केल्याचा व त्यास एक लाख पगोडे दिल्याचा मुख्य आरोप ठेवून अबुल हसन याची विनंति अमान्य केल्याचें सादतखानाकडून कळविलें. तेव्हां तहाची आशा सुटली. शेख मिनाज, सर्जाखान व अबदुर रझ्झक लारी ऊर्फ मुस्तफाखान यांस मोगली सैन्यावर चालून जाण्यास सांगितलें. दुसऱ्याच मुक्कामावर त्यांची मोगली आघाडीच्या सैन्याशीं चकमक उडाली. परंतु येथें इब्राहीमगड फत्ते करून फिरूझ जंग जलदीनें कूच करून येत आहे असें समजतांच कुत्बशाही सैन्य मागें फिरलें. चं. २४ रबिलावल (२९ जानेवारी १६८७ इ. स.) रोजीं मोगली सैन्य हैद्राबादेहून एक कोसावरील कलारसला आलें व मोर्चे वगैरे बांधण्यास सुरुवात केली. रोजचे रोज हल्ल्यांवर हल्ले चढतच होते. किल्ल्याभोंवतीं कुत्बशाही सैन्य होतें. त्यांच्यावर हल्ला चढविण्यासाठीं औरंगजेबानें हुकूम दिला. त्यावरून फिरूझ जंगचा बाप कुलीजखान बहादूर थेट दरवाजापर्यंत चालून गेला. परंतु तेथें तोफेचा गोळा लागल्यानें त्याचा हात जाया झाला. तीनचार दिवसांनीं तो मेला. नंतर मोर्चे पुढें ढकलणें, डमडमे रचणें वगैरे काम जारीनें चालू होतेंच. अबदुर रझ्झक, शेख निजाम वगैरेंनीं आपल्या ४०-५० हजार स्वारांनिशीं बाहेरून सारखे हल्ले चढविण्याचाहि सपाटा चालू ठेवला होता. एके दिवशीं फिरूझ जंग मोर्चा पुढें सरकावीत असतां कुत्बशाही सैन्यानें मोगली सैन्याची दाणादाण उडविली. किशोरसिंग हाडा वगैरे जखमी झाले. दोन्ही बाजूंचे बरेच लोक मारले गेले. कुत्बशाही सैन्यहि मागें फिरलें. चं. ७ रबिलाखर ( ७ फेब्रुवारी १६८७ इ. स. ) रोजीं सफशीकनखानें किल्ल्यावरील तोफांचा मारा थांबविण्यासाठीं एका मोठ्या तोफेकरितां डमडमा रचला व नंतर तो फिरूझ जंगाच्या ताब्यांत दिला. परंतु कुत्बशाही सैन्यानें अर्ध्या रात्रीवर हल्ला चढवून तो जमीनदोस्त केला व इज्जतखां, सलाबतखां वगैरे मोगली सरदारांस कैद करून नेलें.[३८२] दोन दिवसांनीं पुन्हां डमडमा उभारला व पुढें दोन दिवसांनीं अबुल हसननें कैद केलेल्या मोगली सरदारांस मोगली सैन्यापाशीं नेऊन मुक्त केलें. नंतर सफशीकनखानाकडे मोर्चाचें काम दिलें. त्यांनीं तें पुन्हां तितक्याच यशस्वी रीतीनें पार पाडलें. ७-८ मार्च १६८६ला एक चकमक उडाली. तींत ४०० लोक ठार झाले. बहुतेक मोगलाकडीलच होते.

---

३८२. मच्छलीपट्टण, गोवळकोंडा, पत्र, २२ फेब्रुवारी १६८६, लेटर्स टु फोर्ट सेंट जॉर्ज, व्हॉ. ४, १६८६–७, पृ. ९३.

मोगली थोर सरदार मारला गेला.[३८३] किल्ला एकदोन दिवसांत अलमगिराच्या हवालीं होणार म्हणून वाटत होतें. परंतु आतां पावसाळा संपपर्यंत तरी तो पडत नाहीं अशी खात्री वाटूं लागली. त्याचप्रमाणें किल्ला उत्तम रीतीनें लढविला जात आहे असेंहि सर्वांस वाटूं लागलें. तेव्हां फितुरीनें अगर लबाडीनें किल्ला हातीं आणण्याची खटपट चालू झाली. तींतहि यश येईना. किल्ल्यावरील लोकांनीं चांगलीच जाग राखली.[३८४] चं. १२ रज्जब ( १४ मे १६८७ इ. स. ) रोजीं फिरूझ जंगनें रात्रीं शिड्या लावून किल्ल्यांत शिरण्याचा प्रयत्न केला. परंतु रुस्तुमखां व फिरूझ जंग जखमी झाले. पुष्कळ लोक मारले गेले. मोगली सैन्याची बरीच नासाडी झाली. चं. १४ रज्जब ( १६ मे १६८७ इ. स. ) रोजीं कुत्बशाही सैन्यानें डमडम्यावर हल्ला चढविला व इज्जतखानानें हल्ला परतविण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यांत त्याचे ७० लोक मारले गेले. दुसरे दिवशीं किल्ल्याच्या बुरुजावर मोठी तोफ आणल्यानें व मारा सुरू केल्यानें मोगली सैन्यांत नेमके गोळे पडूं लागले. खास औरंगजेबाच्या डेऱ्यावरच गोळे येऊं लागले. तेव्हां त्या बुरुजासमोर मोठा डमडमा रचून त्यावर तोफा चढवून बुरुज उडविण्याचा हुकूम झाला. त्यांतहि यश आलें नाहीं. नंतर एक मोठी शिडी तयार करून ती लावून हल्ला चढविण्याचा हुकूम दिला. प्रथम औरंगजेबच शिडीवर चढला. परंतु पाय निसटल्यानें खालीं आला.

मोगली सैन्यानें गोवळकोंड्यास वेढा दिला. परंतु त्यांत यश येणें कठीण झालें. दुष्काळानें धान्याचा पुरवठा मुळींच होत नसे. संभाजीनें कुत्बशाहाच्या मदतीसाठीं १२००० घोडदळ व ५० हजार पायदळ पाठविलें. तें २५ मार्चच्या सुमारास मोगली सैन्यावर हल्ले चढवूं लागलें.[३८५] त्यांनीं मोगली सैन्याची बाहेरून येणारी रसद अजिबात बंद केली. रोगराई वाढल्यामुळें लोकहि फार मरूं लागले. सैन्याची व्यवस्था पाहण्याचें कामहि कोणी अंगावर घेण्यास धजेना, इतकी मोगली सैन्याची

३८३. गोवळकोंडा, पत्र, १२ मार्च १६८७ इ. स., ले. टु फो. सें. जॉर्ज, व्हॉ. ४, १६८६–७, पृ. १०३.

३८४. गोवळकोंडा, पत्र, २४ एप्रिल, मच्छलीपट्टण, पत्रें, २२ मे १६८७ इ. स, व २ जून १६८७, ले. टु. फो. सें. जॉ., व्हॉ. ४, १६८६–७, पृ. १४९–५१.

३८५. गोवळकोंडा, पत्र, २५ मार्च १६८७, मद्रास, पत्र, २९ सप्टेंबर १६८७, ले. टु. फो. सें. जॉर्ज, व्हॉ. ४, १६८६–७, पृ. ११२ व O.C. ५६२१, इं. ऑ. लायब्ररी.

हलाखी झाली. सुल्तान अकबराच्या साथीदारांनीं उत्तर हिंदुस्थानांत धुमाकूळ घातला. तेव्हां अलमगिरास उत्तर हिंदुस्थानच्या राजकारणाबद्दल विशेषच काळजी लागली व दक्षिणेंतील कारभाराकडे थोडेंसें दुर्लक्ष करून परतावें कीं काय या चिंतेंत तो पडला. औरंगजेबानें कुत्बशाही सरदार फोडण्याची पराकाष्ठा केली. त्यांत त्याला थोडें यश आलें. चं. २६ रज्जब ( २१ मे १६८७ इ. स. ) शेख निजाम मोगलास जाऊन मिळाला. त्यास मुकर्रबखान असा किताब, पांचशें मोहरा व एक हजार रुपये नजर दिले. सहा हजारी व सहा हजार स्वारांची मनसब दिली. मोत्यांची तलवार, रत्नजडित खंजर, सरपेच, घोडे वगैरे दिले. मलिक मुनाव्वर व शेख अबदुल्ला यांस व त्यांच्या इतर भाऊबंदांस मोठमोठे किताब व मनसबी दिल्या. याप्रमाणें मोठा बहुमान केल्यानें अबुल हसनचा भाचा मोगलास मिळाला. उलट मोगली सैन्याची हलाखी पाहून मोगली सैनिक व सरदार कुत्बशाहाकडे जाऊं लागले. ज्यांना जातां येईना ते कुत्बशाहास आंतून मदत करूं लागले. किल्ल्यावरून तोफांचा मारा चालू होता. त्यामुळें मोगली सरदार सारखे जखमी होत किंवा भाजले जात. त्यांतून पावसाळा सुरू झाल्यानें वेढ्याचें काम तसेंच रेंगाळत चाललें. चं. १४ साबान ( १६ जून १६८७ इ. स. ) रोजीं रात्रीं मोठें वादळ झालें व मुसळधार पाऊस पडला. पुष्कळ सामानसुमान वाहून गेलें. माणसांना आधार न राहिल्यानें बरींच माणसें पुरांत बुडालीं. जिकडे तिकडे चिखल झाला. डेरे, राहुट्या जमीनदोस्त झाल्या. मुद्दाम रचलेला मातीचा डमडमा समूळ वाहून गेला. याप्रमाणें मोगली सैन्य संकटांत पडलेलें पाहून पहाटे ( १७ जून १६८७ इ. स. ) कुत्बशाही सैन्यानें हल्ला चढविला. अबदुर रझ्झकच्या शौर्यापुढें कोणाची मात्रा चालेना. मोगली सरदार पळूं लागले. कोणी चिखल आंगाला लावून निसटले. कोणी लपले. पुष्कळ मोगली सैनिक कापून काढले व कैद केले गेले. पुरामुळें फिरूझ जंगास या सैन्याच्या मदतीस येतां येईना. तेव्हां ७०-८० हत्ती पाण्यांत घालण्याचा प्रयत्न केला. परंतु वाट मिळेना. अर्ध्या रात्रीवर फिरूज जंग सैन्यास येऊन मिळाला. कुत्बशाही सैन्यानें मोगली सरदारांस कुत्बशाहाकडे नेलें. तेव्हां अबुल हसननें त्यांस फार सन्मानानें वागविलें. इज्जतखान व सरबराहखान यांस मोगली सैन्यांत परत पोहोंचविलें. सरबराहखानास अबुल हसननें आपली धान्यसामग्री व दारुगोळा दाखविला व त्याची खात्री करून दिली कीं, आणखी वर्षसहा महिने तरी किल्ला लढविण्याचें सामर्थ्य कुत्बशाहींत आहे. परंतु त्याच वेळीं अबुल हसननें अलमगिराजवळ तहाबद्दल

वाटाघाट करण्यासाठीं त्यास सांगितलें व पत्रहि दिलें. त्यांत निष्कारण इस्लामियांचें रक्त न सांडण्याबद्दल व सुभेदार म्हणूनहि म्हणवून घेण्यास राजी असल्याचें कळविलें. उलट किल्लाच लढाविणें जरूर असेल तर तोहि लढविण्याचें सामर्थ्य असल्याचें व मोगली सैन्यांतील विपद्ग्रस्त लोकांसाठीं ५-६ लाख पोतीं धान्य पुरविण्याचें अंगिकारलें. परंतु औरंगजेबानें या विनंतीचा अव्हेर केला. सफशीकनखानास पुन्हां डमडमे व मोर्चे बांधण्याची आज्ञा झाली होती. त्यानें तीन दिवस सारखी मेहनत घेऊन हातची गेलेली सर्व जागा काविज केली. चं. १९ साबान (२० जून १६८७ इ. स.) रोजीं किल्ल्याचे बुरुज उडविण्यासाठीं खणलेले सुरुंग पेटविण्याची आज्ञा झाली. सुरुंग उडतांच हल्लेहि चढविण्यास सैन्याची तयारी होती. बुरुजावर किल्ल्यांतील लोकांनीं जमावें म्हणून मोगली सैन्यांत ओरडाओरड सुरू केली. परंतु सुरुंग लावल्याची बातमी अबदुर रझ्झाक यास लागल्यापासून त्यानें आंतले बाजूनें खणून सुरुंगांतील दारू काढून घेतली व कांहींत पाणी ओतून भिजवून फुकट घालविली होती. हुकूम होतांच पहिला सुरुंग लावला. परंतु त्यांतील तोंडावरील दारूनें फक्त पेट घेतल्यामुळें जो कांहीं किल्ल्याचा भाग उडाला तो मोगली सैन्यावरच जाऊन पडला. त्यामुळें मोगली सैन्याचें फार नुकसान झालें. जवळजवळ १२०० लोक ठार झाले. याप्रमाणें मोगली सैन्यांत गोंधळ झालेला पाहतांच कुत्बशाही सैन्यानें हल्ला चढविला. मोर्चे मारून काढले. नंतर औरंगजेबानें अधिक कुमक पाठविली. तेव्हां कुत्बशाही सैन्य माघारी गेलें. दोन्ही बाजूंचे बरेच लोक प्राणास मुकले. मोगली सैन्यानें स्थिरस्थावर करतांच व मोर्चे बांधतांच दुसरा सुरुंग उडविला. या वेळींहि फक्त तोंडावरील दारू पेटल्यानें जे दगड धोंडे उडाले त्या योगें मोगली सैन्यांत हलकल्लोळ उडाला व जवळ जवळ २००० लोक मेले. पुन्हां या गोंधळाचा फायदा घेऊन कुत्बशाही सैन्यानें हल्ला चढविला. परंतु फिरूझ जंग आपल्या लोकांनिशीं मदतीस आल्यानें फारसें नुकसान झालें नाहीं. तरी ५३४ लोक मारले गेले. याप्रमाणें दोन वेळां झालेल्या नाशाची बातमी ऐकून अलमगीर रागावला व कलारसला आला व तेथून निकरानें हल्ला चढविण्याचा हुकूम दिला. मोगली सरदारांनींहि आपली पराकाष्ठा करून दाखविली. परंतु इतक्यांत वादळ झालें व पाऊस पडला. खंदक पाण्यानें भरून गेले. डमडमे वाहून गेले. कुत्बशाही फौजेनें मोर्चा मारून काढला. तोफा नेल्या व मोठ्या तोफांस खिळे ठोकले. खंदक भरण्यासाठीं आणलेलीं पोतीं बुरुजाचीं

खिंडारें भरून काढण्याकडे लावलीं. अशा तऱ्हेनें मोगली सैन्याचा पाडाव झाल्यानें त्यांची फारच निराशा झाली. दुसऱ्या दिवशीं ( २१ जून १६८७ इ. स. ) औरंगझेब तसाच तिसरा सुरुंग उडविण्यासाठीं निघाला. सुरुंगाला बत्ती देण्याचा प्रयत्न केला. परंतु तो पेटेना. तेव्हां तपासून पाहातां त्यांतील दारू काढून नेल्याचें व बात तोडून टाकल्याचें दिसून आलें. या दंगलींत किल्ल्यावरून तोफांचा व बाणांचा मारा होत होता. फिरूझ जंगास दोन जखमा झाल्या व इतरहि सरदारांस दुखापती झाल्या. नंतर वेढ्याचें सेनापतित्व महमद अझमकडे देण्यांत आलें.

कुत्बशाहींतील इतर मोठमोठीं शहरें घेण्यासाठीं सरदार रवाना केले. जुलै १६८७त कुत्बशाहींतील महत्त्वाचा कोंडपल्लीचा किल्ला फितुरीनें मोगलांचे हवालीं झाला. पुष्कळ संपत्ती मोगलांस मिळाली. इतरत्रहि सैन्याच्या तुकड्या रवाना झाल्या होत्या. त्यांनीं मुलुख काबिज करण्याचा सपाटा लावला.[३८६] वेढ्याचें काम मात्र अगदींच संथ होतें. कुत्बशाही सरदारांस फितुर करण्याचा सारखा प्रयत्न चालू होता. शेख निजाम मोगलास मिळणार अशी खास बातमी लागतांच अबुल हसननें त्यास कैद केलें. कुत्बशाहीकडे फक्त अबदुर रझ्झाकखान लारी व अबदुल्लाखान पणी असे दोघेच काय ते नांवाजलेले सरदार बाकी राहिले होते. त्यांस सहा हजारी व इतर मनसबी वगैरे देण्याबाबतचे कौल व फर्मानेंहि अलमगिरानें पाठविलीं. परंतु अबदुर रझ्झाक अढळ राहिला. चं. ७ रमजान (८ जुलै) रोजीं अलमगिरानें मोर्चे व डमडमे खासा पाहिले. नंतर फितुरीचे जारीनें प्रयत्न सुरू झाले. शेवटीं रुहुल्लाखानानें अबदुल्लाखान पणीशीं संधान बांधलें. ठराविक वेळेस किल्ल्याचा खिडकी दरवाजा उघडून देण्याचें त्यानें कबूल केलें. त्याप्रमाणें चं २४ जिल्काद ( २२ सप्टेंबर १६८७ इ. स. ) पहाटे मोगली सैन्य खिडकी दरवाजानें आंत शिरलें. अबदुर रझ्झाकनें कपड्यांचीहि पर्वा न करितां धांवून जाऊन तो शत्रुवर तुटून पडला. किल्ला-इ-आर्कपर्यंत लढत गेला. हजारों तरवारी व भाले त्याच्यावर पडत असतांहि त्यानें मोगली सैन्याची दाणादाण उडविली. सर्व शरीर जखमांनीं भरून गेलें. तोंडावरच बारा जखमा झाल्या. डोळ्यावर मांस लोंबलें. घोडाहि जखमी झाला. लगाम ढिली पडली व घोडा पळत जाऊन एका झाडाखालीं उभा राहिला. त्यास तेथें कोणीं ओळखलें व बेशुद्ध स्थितींत घरीं नेलें. या अवर्णनीय शौर्याचें व नेकीचें औरंगजेबानें

३८६. कन्सल्टेशन, मद्रास, २९ जुलै १६८७ इ. स., डायरी व कन्सल्टेशन बुक, १६८७, पृ. १०६.

कौतुक केलें. त्याला बहुमानानें वागविलें. त्याची चांगली सुश्रूषा करविली. अबुल हसननें अशा रीतीनें शेवट झालेला पाहतांच येणाऱ्या संकटास स्वस्थ चित्तानें तोंड देण्यासाठीं स्वस्थ राहिला. रुहुल्लाखानादि सरदार त्याच्याकडे गेले असतां त्यानें स्वस्थपणं राज्य सोडल्याचें सांगितलें व तो सज्या घोड्यानिशीं अझमशाहास जाऊन भेटला. गळ्यांतील मोत्याचा कंठा अझमास दिला. नंतर औरंगजेबाची भेट घेतली. औरंगजेबानें त्यास चांगल्या रीतीनें वागविण्याचा हुकूम दिला. दरबारांत येण्याची माफी दिली. याप्रमाणें औरंगजेबानें कुत्बशाहीचा नाश केला.[३८७]

चं. २९ जिल्काद (२७ सप्टेंबर १६८७) रोजीं अबुल हसनचा मानलेला मुलगा अब्दुल्ला यास ४ हजारी व ४ हजार स्वारांची मनसब दिली.[३८८]

हि. १०९९ (२८ आक्टोबर १६८७ ते १६ आक्टोबर १६८८ इ.स.).—चं. १४ रबिलाखर (७ फेब्रुवारी १६८८ इ. स.) रोजीं अबुल हसन यास जान सिपहारखानाबरोबर दौलताबादेस रवाना केलें. सर्व व्यवस्था योग्य प्रकारें ठेवण्याबद्दल व खर्चास वार्षिक ५० हजार रुपये देण्याची आज्ञा झाली.[३८९]

चं. १९ जिल्काद (७ सप्टेंबर १६८८ इ. स.) रोजीं औरंगजेबानें अबुल हसनच्या तीन मुलींचीं लग्नें लाऊन दिलीं. पहिलीस शिकंदर आदिलशाहास पूर्वी ठरल्याप्रमाणें दिली. दुसरीचें शेख महमदाचा मुलगा मोहमद उम्मर याजबरोबर लग्न लावलें. तिसरी असदखानाचा मुलगा इनायतखान यास दिली. लग्नाचे वेळीं बहुमानाचीं वस्त्रें, घोडा व हत्ती अलमगिरानें प्रत्येकास आहेर दिले.[३९०]

अबुल हसननें १४ वर्षे कारागृहवास सोसला असा समज आहे. तो बहुधः हि. ११११–१२ (१७०० इ. स.)त आंवेच्या विकारानें वारला असावा. त्याला दौलताबादेस सय्यद राजू कातलच्या शेजारीं दफन केलें.[३९१]

---

३८७. परिशिष्ट २, पृ. १२०–७०; देवीप्रसादजी मुन्सिफकृत औरंगझेबनामा, भा. ३, पृ. ४०–५०; मुंतकब-उल-लुबाब, इ. डॉ., व्हॉ. ७, पृ. ३२३-३६; प्रो. सरकार, औ., व्हॉ. ४, पृ. ३५६–८६; मनुशी, व्हॉ. ३, पृ. २५२; व्हॉ. २, पृ. ३०५–०८; कन्सल्टेशन, मद्रास, १२ व १४ नवंबर १६८७; डा. व कन्स. बुक, १६८७, पृ. १७५–७.

३८८. देवीप्रसादजी मुन्सिफकृत औरंगजेबनामा, भा. ३, पृ. ५०.

३८९. देवीप्रसादजी मुन्सिफकृत औरंगजेबनामा, भा. ३, पृ. ५४.

३९०. देवीप्रसादजी मुन्सिफकृत औरंगजेबनामा, भा. ३, पृ. ५६; बु. स., हिंदी, पृ. ७५६.

३९१. परिशिष्ट २, पृ. १८१–२.

अबुल हसन यास बंदी सुलतान या नांवाचा एक मुलगा होता. तो औरंगजेबाच्या गोटांत राहात असे. मोठा झाल्यावर त्याला दरबारांतहि जावें लागे. परंतु दक्षिणी सरदार त्याला पादशाहासारखा लवून मुजरा करीत. हें पाहून त्यास दरबार मना केला.[३९२]

अबुल हसनची एक बहीण त्याचे जवळच होती. तिचा नवरा व मुलगा मात्र शेवटीं अलमगिरास जाऊन मिळाला. अबुल हसननें एका धनगरिणीच्या मुलीबरोबर लग्न लावलें होतें व ती त्याची फार आवडती होती. त्यामुळें त्याची पट्टराणी ताज महाल हिला तिचे विषयीं असूया उत्पन्न झाली. अबुल हसन शिकारीस गेला असतां तिनें तिला ठार मारलें. त्यानंतर ताज महाल आजारीच होती.[३९३]

कर्नाटकाचा सुभा महमद इब्राहिमास झाल्यानें त्या प्रांतांतील किल्ले वगैरे आक्टोबर १६८७तच मोगलांच्या हवालीं झाले.[३९४]

कुत्बशाही सरदारांना फितूर करून घेऊन त्यांना मोठमोठ्या मनसबी दिल्यानें अबुल हसन पकडला गेल्यानंतर कुत्बशाहीचा अभिमान धरून तिचे पुनरुज्जीवनाचा प्रयत्न करण्यास कोणींच मागें राहिला नव्हता. उलट पठाणांचा मोगलांकडे ओढा अधिक. हिंदूंनीं स्वतंत्र प्रयत्न करावयाचा तर हिंदूंची सत्ता नाहींशी झाल्याला बरींच वर्षे झालीं होतीं. त्यामुळें त्यांचें स्वतंत्रपणें वजन वाढेल अशी परिस्थिति राहिली नव्हती. संभाजीहि अचानक पकडला गेल्यानें आधार राहिला नाहीं. पिरीया नायकानें थोडीशी मदत व मेहनत घेतली. परंतु त्याचा किल्ला ता. २८ नवंबर १६८७ रोजीं मोगलांच्या हातीं जातांच त्यालाहि मोगली चाकर व्हावें लागलें. मागें कुत्बशाहींतील कलाकौशल्य व थोरवी दाखविणाऱ्या कांहीं इमारती मात्र शिल्लक राहिल्या.

**२३. मादण्णा व आकण्णा:**—मादण्णा यास शिवाजीनें महादण्णा[३२५] व त्याच्या फर्मानांत मांदों[३०९] किंवा मादो[३१९] असें म्हटलें आहे. आकण्णास आधुनिक इतिहासकारांनीं अंकण्णा असें संबोधलें आहे. परंतु परदेशीय, मराठी व संस्कृत तत्कालीन पत्रांतून आकण्णा असेंच म्हटलें आहे. अंकण्णा हें नांव बरोबर दिसत नाहीं.

३९२. परिशिष्ट २, पृ. १८२–३.

३९३. मनुशी, भा. ४, पृ. १९७–८.

३९४. मद्रास, मच्छलीपट्टण, वगैरे ठिकाणचीं पत्रें, १५–२८ आक्टोबर १६८७, ले. टु फो. सें. जॉ., व्हॉ. १६८७.

मादण्णाच्या घराण्याची फारशी माहिती उपलब्ध नाहीं. त्याचे वडील भानुपंत हे वारंगळ प्रांतांत हनुमकोंडा गांवीं राहात असत. हे ब्राह्मण गृहस्थ तेथील मुलकी कारभाराचें व करवसुलीचें काम पहात असत. त्यांची बायको भागम्मा हीहि एका कुलीन ब्राह्मण घराण्यांतील होती. तिचेपासून भानुपंतांस चार पुत्र झाले. त्यांतील आक्कण्णा हे थोरले, मादण्णा दुसरे, विसण्णा तिसरे व मुर्तुजय चवथे होत.[३९५] त्यांस एक मुलगी होती. तिचींहि मुलें येंगण उर्फ रुस्तुमराव व गोपण्णा उर्फ रामदास हीं मोठीं शूर व कर्तबगार झालीं. मादण्णाचा पुतण्या पोडल लिंगाप्पा हाहि कर्नाटकाच्या सुभेदारीपर्यंत चढला.[३९६] मादण्णास एक मुलगा होता. त्याची मुंज ता. ४ जानेवारी १६८२ रोजीं झाली व लग्न नंतर १२ आक्टोबर १६८२ रोजीं झालें.[३९७] मादण्णाचा खून झाला तेव्हां आक्कण्णाचा एक मुलगा दोन वर्षांचा होता. त्यास त्याच्या दाईनें आक्कण्णाचा एक हसन नांवाचा मित्र होता त्याच्या आश्रयास नेऊन त्यास वांचविलें.[३९८] मादण्णाच्या कुटुंबासंबंधीं एवढीच माहिती सध्यां उपलब्ध झाली आहे.

भानुपंतानें मादण्णा व आक्कण्णास त्या वेळच्या रिवाजाप्रमाणें हिशेबाचें वगैरे काम आपल्या नजरेखालीं शिकविलें. योग्य वेळीं त्यांच्या मुंजी व लग्नेंहि केलीं. मादण्णानें हिंदवी, फारसी व इतर भाषांत चांगलेंच प्राविण्य मिळविलें होतें. आक्कण्णा व मादण्णा जेव्हां वयांत आले तेव्हां आपल्या बापाच्या कारभारांत केवळ भागीदार राहाणें त्यांच्या आकांक्षी स्वभावास पटेना. म्हणून व्यवहाराची चांगली माहिती होतांच मोठ्या नोकरीच्या शोधार्थ ते हैद्राबादेस इ. स. १६६०पूर्वींच आले.[३९९] इ. स. १६६०च्या सुमारास ते मीर जाफरकडे पोतदारीच्या कामावर (Shroff) असावेत. अबुल हसन याचें अबदुल्ला कुत्बशाहाच्या मुलीशीं लग्न घडवून आणण्यांत याच पोतदारांची मीर जाफरनें नेमणूक केलीसें दिसतें.[४००] त्यामुळें

---

३९५. परिशिष्ट ३, पृ. १८७–८

३९६. मद्रास, पत्रें, व्हेस्टिजिस व फोर्ट सेंट जॉर्ज रेकॉर्डस.

३९७. गोवळकोंडा, पत्रें, २१ जानेवारी १६८२ व नवंबर १६८२ व १ जानेवारी १६८३; ले. डु. फो. सें. जॉ., पृ. १६६.

३९८. परिशिष्ट ३, पृ. २०२.

३९९. परिशिष्ट ३, पृ. १८८.

४००. परिशिष्ट १, पृ. ९.

अबुल हसनची व यांची प्रथमपासूनच मैत्री जडली होती. त्यांनीं या वेळीं अबुल हसनवर एक प्रकारें मोठेंच उपकार केले होते. सैय्यद मीर जाफर इ. स. १६६३त वारल्यानंतर[२६६अ] त्याची सरखैली सय्यद मुझाफराकडे आली.[३०३] तेव्हां मादण्णा व आक्कण्णा त्याचे हाताखालीं काम करूं लागले. इ. स. १६६६त ते पोतदारीचेंच (Shroff) काम करीत होते.[४०१] नंतर वाढत वाढत इ.स. १६७२च्या सुरवातीस मुझाफरखानाचे मुख्य पेशकार (Secretaries) झाले होते.[२७८] अबुल हसन २१ एप्रिल १६७२ रोजीं तख्तावर आला. त्या वेळीं मुझाफरखानाबरोबर या पेशकारांनींहि बरीच मेहनत घेतली. सय्यद मुझाफराकडे दिवाणीचा कारभार आला त्याच वेळीं मादण्णास मज्मुदारी व आक्कण्णास सबनिविशी मिळाली.[३०३] इ.स. १६७३च्या जून महिन्यांत मुझाफरखानाकडील मीर जुम्लतीचा कारभार दूर झाला व सरखैलीचें काम अबुल हसन स्वतःच पाहूं लागला. तेव्हां फर्मानें वगैरे काढणें तीं मादो भानजी 'परवानगीनें' काढूं लागला.[३०९] इ. स. १६७५च्या अखेरीस मुझाफरखानासहि दिवाणीवरून दूर केलें. त्या वेळीं राज्याचा सर्व कारभार मादण्णाकडे आला. सूर्यप्रकाशराव असा किताब मिळाला.[४०२] मादण्णा व आक्कण्णांनीं हैद्राबादेंत इ. स. १६७६च्या सुरुवातीस मोठा वाडा बांधला.[३२१] मुसाखान व मुझाफरखानाच्या चढाओढींत कर्नाटक प्रांतांतील वसूल बराच थकला होता व तेथील कांहीं पुंडपाळेगार लोकांनीं बंडाचें निशाण उभारलें होतें. मादण्णाकडे कारभार येतांच प्रथम त्यांनें कर्नाटकाची व्यवस्था लाविली.[४०३] आपल्या खात्रीचे व चांगले कारभारी नेमले. त्यांतच त्यानें आपल्या नातलगांस सर्वत्र कारभार देऊन पाठविले होते. धाकटा भाऊ विसण्णा यास सेनेची बक्षीगिरी दिली. मुर्तुजयाला आपला कारभारी अगर पेशवा केलें.[४०४] एका भाच्यास - येंगण्णास - रुस्तुमराव असा किताब देवून दुय्यम सेनापती केलें. दुसरा भाचा गोपण्णा ऊर्फ रामदास यास भद्राचलमची तर्फदारी देवविली. पुतण्या पोडला लिंगाप्पा यास निरनिराळीं कामें देऊन शेवटीं कर्नाटकाची सुभेदारी दिली.[४०५] इ.स. १६७५-७६त

---

४०१. हॅवर्ट जर्नल, जर्नल ऑफ दि इंडिअन हिस्टरी, व्हॉ.१०,भा.२,नं.२९, पृ.९२.

४०२. हॅवर्टचा मादण्णाच्या चित्रावरील लेख, कामकोटी पीठाचे ताम्रपट, पृ. १३०.

४०३. परिशिष्ट ३, पृ. १९४.

४०४. परिशिष्ट ३, पृ. १९५.

४०५. राव बहादुर कृष्णस्वामी आयंगारचा लेख 'अबुल हसन व त्याचे वजीर मादण्णा व आक्कण्णा', जर्नल ऑफ दि इंडिअन हिस्टरी, अं. २९, पृ. ९२ व ९४.

राज्यांत जिकडे तिकडे चांगली व्यवस्था व स्थिरस्थावर केल्यानंतर परराष्ट्रीय कारभाराकडे ते लक्ष देऊं लागले.

आदिलशाहींत पठाणांचा वरचष्मा झाला. मोगली पठाणांकडे त्यांचा दिवसेंदिवस जास्तच ओढा ओढूं लागला. कुत्बशाहींतील पठाण उमराव मोगलांस सामील होऊं लागले. त्यांतून आदिलशाहींत शिकंदर अगदींच अल्पवयी असल्यानें मोगलांच्या तडाख्यांतून दक्षिणी राज्यें वांचविण्याची मोठीच चिंता उत्पन्न झाली होती. या वेळीं मादण्णानें कुत्बशहास पुढें करून शिवाजीच्या साहाय्यानें आदिलशाहींतील पठाणांचें प्राबल्य कमी केलें. इ. स. १६७८-९त मोगलांविरुद्ध लढण्यास सिद्ध नसलेल्या पठाणांची संख्या पाहून दक्षिणेंतील पठाणांविरुद्ध दक्षिणीयांच्या कारस्थानास बराच नेट लावला. कुत्बशाहींतील बऱ्याच जागा दक्षिणीयांना दिल्या गेल्या. आदिलशाहींतहि तशीच व्यवस्था लावण्यास भाग पाडलें. मोगलांच्या विरुद्ध मराठेच मदत करतील व शेवटपर्यंत टिकतील या आशेनें मराठ्यांस शक्य ती मदत देण्याचा सपाटा टेविला व अशा तऱ्हेनें दक्षिणी राजांनीं संघ निर्माण केल्यामुळें मोगलांस अफाट सेना आणून तीनचार वर्षे कोठेंच यश मिळवितां आलें नाहीं. मादण्णा व आक्कण्णा यांच्या मसलती चालू होत्या तोंपर्यंत यश मिळण्याची आशा मोगलांस नव्हती. दक्षिणी मोहरीं व प्यादीं हातांशीं ठेवून आपल्या बुद्धीच्या जोरावर डाव चांगलाच रंगविला. डाव उलटलेला पाहातांच औरंगजेबास मात्र मादण्णाच्या नाशाची आवश्यकता भासली. त्याचा खून झाल्यानंतर अवघ्या एका वर्षांतच मोगलांनीं दोन मोठ्या पातशाह्या धुळीस मिळविल्या व दुसऱ्या वर्षांत महाराष्ट्रराज्य व कर्नाटक पादाक्रान्त केलें. यावरून मादण्णाच्या परराष्ट्रीय ममलतींतील महत्त्व व त्याचें कर्तृत्व यांचा बोध होतो.

मादण्णा आक्कणांची मूळची गरिबी होती. नोकरीची सुरुवात वार्षिक शंभर होनांपासून झालेली. शेवटीं वाढत वाढत वीस हजार सैन्य खास त्यांच्या सेनापतित्वाखालीं आलें व तैनातहि ७५ हजार होनांपर्यंत वाढली. संपत्ती हातीं येऊं लागतांच मादण्णा आक्कण्णा दानधर्महि जोरांत करूं लागले. काशीपासून रामेश्वरापर्यंत मुख्य मुख्य तीर्थांचे ठिकाणीं सदावर्तें घातलीं व देवळें बांधलीं. तिरुपती वगैरेंच्या यात्रेस सवडीनुसार जातच असत. हैद्राबादेस एक तळें व त्याच्या

कांठावर बांधलेल्या विश्वेश्वराच्या देवळांत ते नित्य नेमानें दोनदां दर्शनास जात. अशा तऱ्हेनें मोठ्या इतमामानें बारा वर्षे काढलीं. सर्वांस त्यांचेबद्दल विशेष आदर वाटे.[४०६] परंतु याच वेळीं असूया व स्वार्थ यांनीं पीडित झालेल्या शत्रूंचीहि संख्या वाढत होती. अबुल हसनची बाजू घेतल्यानें मादण्णा आकण्णांस अबदुल्लाच्या मोठ्या मुलीचें व तिच्या नवऱ्याचें पारिपत्य करितांना तिची आई त्यांची कायमची शत्रू बनली. दुसरी मुलगी अबुल हसनच्या धनगरीण बायकोमुळें क्षुब्ध झाली होती. पठाणांचा कावा ओळखून त्यांस चतुराईनें नामोहरम केल्यानें पठाण उमराव आंतून चरफडूं लागले. सर्व दक्षिणी शाह्यांचीं सूत्रें हातीं धरल्यानें मोगलांस मादण्णाच्या शिराखेरीज कांहींहि प्रिय वाटेना. त्यामुळें कुत्बशाहानें शहा अलमशीं तह करतांच मोगलांस मादण्णाविरुद्ध कट बळावण्यास चांगलेंच फावलें. मादण्णाविरुद्ध अबुल हसनचें मन कलुषित करण्याचे सारखे प्रयत्न होऊं लागले. अबुल हसननें त्यांचेवरील विश्वास अढळ ठेवण्याचाहि शक्य तो प्रयत्न केला. मोगलांचा हस्तक यल्लमतराव व अबुल हसनच्या महालांतील जानी बेग, सेरोमादि बाया व इतर पठाण यांनीं कट केला. मादण्णाला हा कट समजला.[४०७] परंतु मोगलांच्या सान्निध्यामुळें त्याला त्यांचा नीटसा बंदोबस्त करतां आला नाहीं. त्यानें आपल्या जहागिरीचे कोलकुंडा, हसनाबाद व राजगोपाळपेठ हे तीन तर्फ आपल्या भावादिकांस दिले. जवळील संपत्तीहि दूर केली.[४०८] अशा तऱ्हेनें कांहीं दिवस जातात न जातात तोंच कटवाल्या लोकांनीं ते राजवाड्यांतून काम आटोपून बाहेर पडत असतां दुपारीं ११-१२च्या सुमारास त्यांस ठार केलें. अबुल हसनला फार विषाद झाला. त्यानंतर तो अत्यंत बेदरकारीनें वागूं लागला. कटवाल्यांनीं मादण्णा आकण्णांचीं प्रेतें रस्त्यांतून फरपटत नेलीं. त्यांच्या बायकामुलांस ठार केलें. घर जाळलें.[४०९] मादण्णाचें शीर शहा अलमकडे पाठविलें व शहा अलमनें तें १६ मार्च १६८६ इ. स. रोजीं औरंगजेबाकडे रवाना केलें.[३७८]

सारांश, मोगली परचक्राविरुद्ध दक्षिणी राज्यांचीं सूत्रें यशस्वी रीतीनें

४०६. परिशिष्ट ३, पृ. १९४-५, २००-२; कामकोटी पिठास आग्रहार, कामकोटी पिठाचे ताम्रपट, पृ. १३३-६; डच जर्नल वगैरे.

४०७. परिशिष्ट ३, १९८-२०२.

४०८. परिशिष्ट ३, पृ. १९९, २०१.

४०९. परिशिष्ट ३, पृ. २०२; डच जर्नल, मनुशी वगैरे.

